: प्रकाशक :
रघुनाथ दिपाजी देसाई,
नवभारत प्रकाशन संस्था,
६, केळेवाडी, मुंबई ४



किंमत २ रुपये
आवृत्ति पहिली १९४१
पुनर्मुद्रण १९४७

मुद्रक:
रघुनाथ दिपाजी देसाई,
न्यू भारत प्रिन्टिंग प्रेस,
६, केळेवाडी, मुंबई नं. ४

# प्रस्तावना

केवळ बंगाल्यांतीलच नव्हे, तर भारतवर्षांतील कथावाङ्मयाचे सर्वश्रेष्ठ निर्माते म्हणून ज्यांचा निर्देश करतां येईल अशा डॉ० शरच्चंद्र चट्टोपाध्याय यांच्या 'श्रीकांत' या कादंबरीचा हा चौथा आणि शेवटचा भाग पुरा झाल्याचें पाहून मला समाधान वाटत आहे.

'श्रीकांतेर भ्रमण काहिनी' या नांवानें ही कादंबरी 'भारतवर्ष' मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध होत होती. या कादंबरीचा पहिला भागही याच नांवानें म्हणजे 'श्रीकांताच्या प्रवासाची हकिकत' या शिरोलेखाखालीं प्रसिद्ध झाला होता. पुढें कांहीं काळानंतर हें लांबलचक नांव जाऊन नुसतें 'श्रीकांत' हेंच नांव प्रसिद्ध होत आलें. या कादंबरीच्या पहिल्या भागाचें इंग्रजींत भाषांतर झालेलें आहे आणि त्यावरूनच फ्रेंच भाषेंतही एक भाषांतर झालें आहे असें कळतें. मूळ कादंबरींतील वातावरण नुसतें भारतीयच नव्हे—तर इतकें वंगदेशी आहे, कीं त्याचें भाषांतर इंग्रजींत करणें जवळ जवळ अशक्य होतें. रविंद्रनाथ टागोरांच्या साऱ्या कादंबऱ्यांचीं इंग्रजी भाषेंत झालेलीं भाषांतरें भारतीयेतर वाचकांना जशीं आकर्षक झालीं तसा 'श्रीकांत' झाला नाहीं. याचें कारण पहिल्या भागाच्या प्रस्तावनेंत मी दिलेंच आहे. टागोरांच्या कादंबऱ्या ज्या प्रकारच्या इंग्लिशसंस्कृतीनें सुसंस्कृत झालेल्या वातावरणांतून निर्माण झालेल्या आहेत, त्याप्रमाणें शरद्बाबूंच्या कादंबऱ्या अगदीं अस्सल बंगाली वातावरणाचें यथातथ्य निदर्शन करणाऱ्या असल्यामुळें, इंग्रजीभाषेच्या संस्कारानें भारतीय वातावरणाशीं अपरिचित झालेल्या आणि भारतीयेतर वाचकवर्गाला शरद्बाबूंच्या कादंबऱ्यांचें स्वारस्य कळलें नाहीं.

बंगाल प्रांतांतील विशिष्ट प्रकारचें वातावरण महाराष्ट्रीयालासुद्धां अपरिचित आहे. बंगाली लोक भारतीय संस्कृतींतूनच जन्म पावलेले असले, मनुयाज्ञवल्क यांच्या स्मृतींतून त्यांची संस्कृति निर्माण झालेली असली, तरीही त्यांच्यांतील रूढी, आचारविचार, संप्रदाय आणि क्वचित् चातुर्वर्णांतील पोटभेदांची समाजरचनासुद्धां महाराष्ट्रीयांपेक्षां अगदींच भिन्न स्वरूपाची आहे. मनोभावनेच्या दृष्टीनें पहातां बंगाली हा जितका भावनात्मक आणि भावनावश आहे तितकाच महाराष्ट्रीय हा काव्यात्मक कोमल भावनेला पारखा आहे.

बंगाल आणि महाराष्ट्र या दोन्ही प्रांतांतील स्वातंत्र्यप्रीतीच्या भावना इतर कोणत्याही भारतीय प्रांतांपेक्षां जरी समानार्थी असल्या तरीही भावनाविवश होण्याची वंगीय प्रवृत्ति महाराष्ट्रीयाच्या कांटेकोर व्यवहारी वृत्तीशीं अगदींच विसंगत आहे. महाराष्ट्रीयाचें महाराष्ट्रप्रेम आणि बंगाल्याचें वंगप्रेम या दोहोंची तुलना करतां येणार नाहीं. पूर्वेतिहासाच्या वैभवांतील स्वातंत्रतेच्या अभिमानामुळें दोन्ही प्रांतांची राजकीय मनोभूमि आज जरी एकस्वरूपाची दिसत असली, तरी सामाजिक संस्कारांच्या बाबतींत बंगाल महाराष्ट्रापेक्षां जास्त परंपरावादी आहे.

सुधारणेचा अंमल जितका महाराष्ट्रांत चालला तितका बंगाल्यांतील विशिष्ट समाजापलिकडे तो जाऊं शकला नाहीं. सुधारणेच्या अतिरेकांतसुद्धां भावनावश बंगाल महाराष्ट्राच्यापुढें जाण्याइतका सदोष ठरला आहे. सुधारणेचा अतिरेक— थोड्याच प्रमाणांत कां होईना—भारतीय संस्कृतीचा विपर्यास होण्याइतक्या स्वरूपांत जितका बंगाल्यांत अंमलांत आला तितका तो महाराष्ट्रांत बिघाड करूं शकला नाहीं. बंगाल जितका भावूक आहे तितकाच महाराष्ट्र विचारी आहे— अतिविचारी आहे. आजचा नवमतवादसुद्धां महाराष्ट्र आणि बंगाल या दोन प्रांतांच्या तुलनेंत त्या त्या प्रांतांचें वैशिष्ठ्य दाखवण्याइतका भिन्न स्वरूपाचा राहिला आहे म्हणूनच दोन्ही प्रांतांच्या कथावाङ्मयांत जमिनअस्मानाचें अंतर असल्याचें दिसून येतें. महाराष्ट्राचे आद्य कथावाङ्मयकार कै. हरि नारायण आपटे हे शरद्-बाबूंच्या पूर्वी अस्तित्वांत येऊन आपलें कथावाङ्मय निर्माण करीत राहिले असले, तरी त्यांच्यामागून एक तपापेक्षां जास्त कालाने अस्तित्वांत येणाऱ्या शरद्बाबूंचा दृष्टिकोण अगदीं भिन्न स्वरूपाचा आहे. सामाजिक कथावाङ्मयांत हरिभाऊ पांढरपेशा समाजापलिकडे केव्हांही गेले नाहींत. त्या उलट शरद्बाबूंनीं पांढरपेशा समाजाकडे आपल्या सर्व कथावाङ्मयांतून बहुधा दुर्लक्ष केलें आहे आणि ज्या ठिकाणीं शरद्बाबूंनीं पांढरपेशा समाजाचीं चित्रें हाताळलीं आहेत त्या ठिकाणीं हरिभाऊपेक्षा त्यांनीं कितीतरी पुढली मजल मारली आहे.

सुमारें वीस वर्षांच्या कालावधींत ही कादंबरी क्रमशः प्रसिद्ध होत आलेली असल्यामुळें त्या मुदतींत नकळत झालेल्या भाषेच्या रचनापद्धतीचा फरक या भाषांतरांत सुद्धां जाणवल्यावांचून राहाणर नाहीं. मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत असें एकादें उदाहरण नसल्यामुळें तूलनेसाठीं बोट दाखविणें अशक्य झालें आहे. तरीही कोणत्याही भाषेच्या विकासाचा आणि परिवर्तनाचा इतिहास ज्यांनीं संशोधक

दृष्टीनें निरीक्षिला असेल त्यांना या पुस्तकांतील भाषेंत क्रमशः होत असलेला फरक तुलनेनें अजमावणें उद्बोधक वाटेल.

ग्रामीण जीवनाचें यथातथ्य स्वरूप अखिल भारतीय वाङ्मयांत शरद्बाबूंनीं जेवढ्या प्रमाणांत चित्रित केलें आहे तेवढें भारतीय लेखकांतील कोणत्याच लेखकानें केलेलें नाहीं, असें म्हणण्यांत यत्किंचितही अतिशयोक्ति होणार नाहीं. या ग्रामीण जीवनाच्या चित्रणांत ते कांटेकोरपणानें प्रामाणिक राहिले आहेत. तें चित्रण करतांना इतर भारतीय लेखकांप्रमाणें त्यांनीं कल्पनासृष्टींत निरंकुशपणें वावरण्याचा काव्यमय हक्क कधींही वापरला नाहीं. ग्रामीण जीवनांतील निरनिराळ्या थरांत ज्या निरनिराळ्या प्रकारच्या व्यक्ति आहेत, भारतीय चातुर्वर्ण्याच्या पोटभेदांतील व्यवसायपरत्वे निर्माण झालेले जे अनेक सूक्ष्म भेद आहेत, त्या सर्व भेदांतील सर्व प्रकारच्या व्यक्तींचीं अंतरंगें आपुलकीच्या जिव्हाळ्यानें बखर करण्यांत शरद्बाबूंचा हात धरणारा एकही लेखक अजून भारतवर्षांत निर्माण झालेला नाहीं.

‘ श्रीकांत ’ हें बंगालचें एक आधुनिक महाभारत आहे. या महाभारताचा व्याप केवळ ग्रामीण जीवनापुरताच आंखला गेला असला, तरी तें तेवढेंच क्षेत्र या ग्रंथाच्या द्वारें त्यांनीं यथातथ्य स्वरूपांत चित्रित केलें आहे.

गीतेनें वर्णन केलेल्या ‘ स्थितप्रज्ञा ’ आधुनिक स्वरूप ‘ श्रीकांत ’ या भूमिकेंत अवतरलें आहे. पहिल्या भागांतील श्रीकांताचें बाल्य इंद्राच्या सहवासात ज्या स्वरूपांत उत्क्रांत झालें, त्या स्वरूपाचें प्रतिबिंब पुढील तिन्ही भागांतील त्याच्या चरित्रांत व्यापक स्वरूपानें विकास पावलें आहे.

अन्नदा, राजलक्ष्मी, अभया आणि कमललता या पतिता, आणि सुनंदा ही संस्कृत गृहिणी, या सर्व स्त्रीभूमिकांच्या द्वारें बंगालचें विशिष्ट वातावरण या चारी भागांत वर्णिलें गेलें आहे. या निरनिराळ्या स्त्रीभूमिकांचा श्रीकांताशीं जो संबंध आला आहे, तो संबंध आला असतांही तटस्थाच्या दृष्टीनें अलिप्त राहून श्रीकांतानें या सर्व स्त्रीभूमिकांचीं चरित्रें आणि चारित्र्यें ज्या दृष्टीनें अवलोकन केलीं आहेत, तीं पाहिलीं म्हणजे शरद्बाबूंच्या अत्यंत सूक्ष्मतर अशा अवलोकनशक्तीचें कौतुक वाटल्यावांचून रहात नाहीं.

सामाजिक धर्मप्रवृत्तिमुळें उत्पन्न होणारे मानवी जीवनांतले संस्कार आणि स्वाभाविक वृत्तींतून निर्माण होणारा त्या संस्काराबद्दलचा संस्कृतिशून्य विरोध, या दोहोंचा झगडा श्रीकांत आणि या सर्व स्त्रीभूमिका यांच्या परस्परसंबंधाच्या चित्र-

णांतून दाखवला गेला आहे. श्रीकांत स्वतः परंपरेचा भोक्ता नाहीं; भावनावश असला तरी ईश्वरनिष्ठ नाहीं, भावप्रवण असला तरीही तो स्थितप्रज्ञ आहे, आणि म्हणूनच त्याची द्रष्ट्याची भूमिका अद्वितीय आहे. रामायणांतील जनक राजाचें ' श्रीकांत ' हें आधुनिक स्वरूप आहे.

श्रीकांत आणि राजलक्ष्मी या दोघांच्या परस्परसंबंधांतून माणसांच्या स्वाभाविक जीवनावर होणारे धार्मिक भावनेचे दुष्परिणाम [illegible] लेखणीनें वर्णिले गेले आहेत. पहिल्या भागांतील अन्नदाअक्काच्या पतितजीवनाच्या उज्वल स्वरूपांतून श्रीकांतानें या कथेंतील निरनिराळ्या स्त्रीभूमिकांच्या जीवनाकडे पाहिलें असल्यामुळें, राजलक्ष्मीच्या स्वाभाविक आणि मौलिक अशा मधुर प्रेमाच्या कोमल बंधनापासून तो सदोदित अलिप्त राहिला आहे. या त्याच्या अलिप्त जीवनाचा राजलक्ष्मीच्या साऱ्या चरित्रावर जो परिणाम झाला, त्यामुळेंच सुनंदेच्या पारंपरिक धर्मभावनेच्या पकडींत सांपडलेली राजलक्ष्मी, संन्यासी जीवनाच्या विशिष्ट प्रकारच्या त्यागवृत्तींतून स्वाभाविक जीवनांतील मधुर प्रेमाच्या त्यागवृत्तींत येऊन सुप्रतिष्ठित झाली आहे.

राजलक्ष्मीचें हें स्वभावचित्र कोणत्याही देशांतील, कोणत्याही कथावाङ्मयांत अद्वितीय आहे. सुनंदेच्या प्रभावानें क्षणभर दिपून गेलेली राजलक्ष्मी श्रीकांताच्या उपेक्षेमुळें ज्या प्रकारानें जागी झाली, त्या जागृतीमुळें उत्पन्न होणाऱ्या स्वाभाविक मानवी प्रवृत्तींचा तिच्या ठायीं जसा उदय झाला, आणि या अद्वितीय माणुसकीच्या प्रभावानें शेवटीं श्रीकांत आणि राजलक्ष्मी यांचें जें स्वाभाविक मीलन झालें, त्या सर्व प्रसंगांचें यथातथ्य चित्रण करण्यांत शरद्बाबूंच्या लेखनकौशल्याची निस्सीम मानवी प्रवृत्ति प्रतीत होत आहे.

तिसरा भाग ग्रामीण जीवनाच्या दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे. खेडेगांवचे सज्जन, खेडवळ दुर्जन, खेडवळ गृहस्थ आणि खेडवळ शेतकरी या सर्वांचीं अस्सल भारतीय स्वरूपाचीं चित्रें या भागांत दिसून येतात. ग्रामोद्धाराच्या विशिष्ट प्रकारच्या कल्पना आणि त्या कल्पनांच्या पायीं त्यागी वृत्तीनें कार्य करीत पुढें जाणारा वज्रानंदासारखा संन्यासी, त्याबरोबरच त्यागाच्या लोभांत गुंतून जाऊन न फसण्याचा प्रयत्न करणारा स्थितप्रज्ञ श्रीकांत, असल्या श्रीकांताच्या स्थितप्रज्ञतेचा वज्रानंद आणि राजलक्ष्मी यांच्या ग्रामीण जीवनांत त्याच्या चारित्र्यावर झालेला परिणाम, आजवर प्रसिद्ध झालेल्या कथावाङ्मयांत दिसून न येण्याइतका स्वाभाविक आणि म्हणूनच अद्वितीय आहे.

बंगाल्यांतील हिंदु आणि मुसलमान यांचे परस्पर संबंध दाखवितांना अन्नदा-आक्का आणि गोहर, त्याचप्रमाणें गंगामाटींतील रयत लोक, यांचा जो कलात्मक समावेश या कथेंत केला आहे, तो जितका नाजुक स्वरूपाचा आहे तितकाच धर्मभेदनिरसनाला अनुकूल असा आहे. असलें उदाहरण मराठी कादंबरीग्रंथांत शोधून सांपडणेंही अशक्य आहे.

प्रचारात्मक कलेचा उत्कृष्ट नमुना म्हणजेच 'श्रीकांत' ही कादंबरी होय. या सुमारें साडेसहाशें पानांत दिग्दर्शित होणाऱ्या भिन्न भिन्न व्यक्तींच्या जीवनांतून आणि त्या भिन्न भिन्न व्यक्तींच्या परस्परसंबंधांपासून उत्पन्न होणाऱ्या प्रसंगांतून जो सर्वांगीण प्रचार करण्यांत आला आहे, तो इतका कलात्मक आहे, कीं चिकित्सक वाचकांच्या नजरेलासुद्धां ही कादंबरी प्रचारात्मक आहे असें सहसा वाटणार नाहीं.

'श्रीकांत प्रचारात्मक आहे हें सिद्ध करण्यासाठीं मुळांतील अत्यंत प्रभावी आणि सुंदर अशा प्रसंगाचीं आणि वाक्यांचीं कितीतरी अवतरणें देतां आलीं असतीं पण तीं तशीं देऊन शुद्ध बुद्धीनें या ग्रंथाचें परिशीलन करणाऱ्या वाचकांची नजर पूर्वग्रहदूषित करणें मला इष्ट वाटत नाहीं. 'श्रीकांत' या कादंबरीचें सर्वांगीण समालोचन या भागाच्या प्रस्तावनेंत करावें असा माझा संकल्प होता खरा, पण त्या दृष्टीनें ज्यावेळीं मी विचार करूं लागलों त्यावेळीं या समालोचनाचा व्याप साऱ्या शरद् वाङ्मयाचा संपूर्ण आढावा घेतल्याशिवाय पुरा होणार नाहीं असें मला वाटलें.

म्हणूनच 'श्रीकांत' या कादंबरीपुरतेंच शरद्बाबूंच्या प्रचारात्मक लेखन-कौशल्याचें समालोचन न करतां '**शरच्चंद्र—व्यक्ति आणि वाङ्मय**' या नांवानें स्वतंत्र ग्रंथ लिहिण्याची लालसा 'श्रीकांता'च्या या भाषांतरकार्यांतून जी निर्माण झाली आहे ती पुरी करण्याचा उद्योग सुरू करीत आहें. अनुकूल परिस्थिति प्राप्त झाली तर चालू वर्षींच हा ग्रंथ वाचकांच्या हातीं देण्याचा संकल्प आहे.

शरच्चंद्राच्या वाङ्मयाचें भाषांतर करण्याचें कार्य माझ्यावर सोंपवून एक सुहृद्-ऋण फेडण्याची सुसंधि श्री. रघुनाथराव देसाई यांनीं मला दिली त्याबद्दल त्यांचे पुन्हां एकदां आभार मानून मी ही प्रस्तावना पुरी करतों.

हाजी कासम वाडी,
मुंबई.
४ जुलै १९४१

**भा. वि. वरेरकर**

# भारती

[ लेखक : शरच्चंद्र चट्टोपाध्याय; अनुवादक : पु. वा कुळकर्णी; प्रकाशक : नवभारत प्रकाशन संस्था; पृष्ठें : ४०८; किंमत ६ रु. ]

शरद्बाबूंच्या ' पथेर दाबी ' या विख्यात राजकीय कादंबरीचा हा अनुवाद शरद् साहित्य-मालेंतून ६ वर्षांपूर्वीच प्रसिद्ध झालेला होता. नंतर ही कादंबरी : सरकारजमा झाली होती. सध्यांचें कॉंग्रेस मंत्रिमंडळ अधिकारावर आल्यानंतर ती बंधमुक्त होऊन द्वितीयावृत्तीच्या रूपानें वाचकांपुढें येत आहे. बंगालीमध्येंहि १९३८ पर्यंत कादंबरीवर बंदी घातली होती. " अर्वाचिन साहित्यांत कोणत्याहि राजकीय कादंबरीला ' पथेर दाबी'ची उंची गांठतां आली नाहीं " असे उद्गार अनेक विचारवंतांनीं ज्या कादंबरीविषयीं काढले, त्या कादंबरीची शिफारस आणखी कोणत्या शब्दांनीं करायला हवी ? कै. शिवरामपंत परांजपे यांचें वाङ्मय वाचण्यासाठीं उत्सुक असलेले मराठी वाचक, या कादंबरीचीहि तितक्याच उत्सुकतेनें वाट पाहात होते. या द्वितीयावृत्तीचें ते योग्य तें स्वागत करतील अशी आशा आहे.

मौजः ता. ८ जानेवारी १९४७

# श्रीकांत

## १

माझं आजपर्यंतचं आयुष्य एकाद्या उपग्रहासारखं होऊन राहिलंय्. ज्या केंद्रावर दृष्टि ठेवून फिरतोंय् त्याच्याजवळ जायचा अधिकार मिळाला नाहीं, कीं त्यापासून दूर व्हायची अनुमतिही मिळाली नाहीं. पराधीन नाहीं, पण स्वतःला स्वाधीनही म्हणवत नाहीं.

काशीहून परत येतांना गाडींत बसल्यावर पुन्हा पुन्हा हेच विचार मनांत येत होते. असं वाटत होतं, पुन्हा पुन्हा असंच व्हायचं माझ्या नशिबीं कां म्हणून ? स्वतःचं म्हणून म्हणायला मरेपर्यंत कुणी मला मिळणारच नाहीं का ? असंच का सारं आयुष्य जायचं ?

लहानपणची आठवण झाली. बालपणापासून तारुण्य येईपर्यंत दुसऱ्याच्या घरीं दुसऱ्याच्या मर्जीप्रमाणें वर्षांमागून वर्षं काढण्यांत आयुष्य गेलं पण तेव्हां मन मात्र कुठल्या तरी रसातळांत गाडून पडलं होतं. आज किती हाकाहाकी केली तरी तें निरोप घेऊन निघालेलं मन उत्तर देत नाहीं. कदाचित् जर कुठल्या तरी क्षीण आवाजाच्या धोरणानं कान दिला, तर आपलाच शब्द आपल्यालाच निश्चित ओळखतां येत नाहीं—आपलाच म्हणायला भीति वाटते.

माझ्या जीवनांतून राजलक्ष्मी आज मेली असंच ठरवून निघून आलों. विसर्जन केलेल्या प्रतिमेचं शेवटचं चिन्ह नाहींसं होत असलेलं नदीकिनारीं स्वतःच्या डोळ्यानं पाहून मागं फिरलों. आशा करायला, कल्पना करायला, स्वतःला फसवायला कुठंही कुठल्या सुताचासुद्धां आधार शिल्लक न ठेवतां निघून आलों. आतां ती दिशा निःशेष झाली—निश्चिन्ह झाली. पण हा शेवट कितीसा

शवटच्या तें सांगू तरी कुणाला नि सांगू तरी कशासाठीं ?

पण ह्याच तो ' तो दिवस '! कुमार साहेबांबरोबर शिकारीला जायचा दिवस ! दैववशात् प्यारीचं गाणं ऐकायला बसलों असतां एक भाग्याची घडी लाभली. ती जितकी आकस्मिक तितकीच अद्वितीय होती. स्वतःच्या सामर्थ्यानं ती मिळवली नाहीं कीं स्वतःच्या दोषानं हरवलीही नाहीं. तरीही हरवल्याचं कबूल केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. सारं जग हरवल्यासारखं झालं आहे मला !

निघालोंय कलकत्याला, पण पुन्दां ब्रह्मदेशाला जायच्या उद्देशानं पण या भुलभुलैय्यांत सांपडलों आहें. घराचं चित्र अस्पष्ट झालं आहे—अनैसर्गिक झालं आहे. मुक्काम खोटा--मार्गच काय तो खरा. असं वाटतं, कीं ही वाटचाल कधींच थांबू नये.

' आंऽ ! कोण ? श्रीकांत वाटतं ! ' कुठल्या तरी स्टेशनवर गाडी थांबली, पण माझ्या तें ध्यानीं आलं नव्हतं. पाहिलं, आमच्या गांवचे आजोबा नि रंगा-आक्का, बरोबर एक सत्रा अठरा वर्षांची मुलगी, डोक्यावर नि खांद्यावर एकएक बोजा घेऊन प्लॅटफॉर्मवर धांवाधांवी करतां करतां एकदम माझ्या खिडकीसमोर येऊन थांबली. आजोबा म्हणाले, ' अरे काय गर्दी ! सुई ठेवायला सुद्धां जागा नाहीं, नि आम्हीं हीं तीन माणसं. तुझा डबा बराच रिकामा दिसतो. येऊं का आंत ? '

' या ना ! ' असं म्हणून मी दरवाजा उघडला. त्या तीन माणसांनीं धापा टाकीत वर चढून असलं नसलेलं सामानसुमान खालीं आदळलं. आजोबा म्हणाले 'हा जादा तिकीटाचा क्लास तर नव्हे ? आणखी दंड भरावा लागणार नाहीं ना ?'

मी म्हटलं, ' नाहीं. मी गार्डला सांगून येतों. '

मी गार्डला भेटून त्याची समजूत घालून ज्यावेळीं परत आलों त्यावेळीं सारी मंडळी आरामांत बसून गेली होती. गाडी सुरू होतांच रंगाआक्का माझ्याकडे पाहून चमकून म्हणाली, ' अरे तुला झालंय तरी काय श्रीकांत ? तोंड सुकून एकदम आमसूल होऊन गेलंय. होतास कुठं इतके दिवस ? आतां तुला म्हणावं तरी काय ? सरळ निघून गेलास-पण एक पत्र तरी पाठवायचं ? घरांत सर्वांचा आरवा उडाला. '

या असल्या प्रश्नांचीं उत्तरं मिळायची कुणी पर्वाही करीत नाहीं, कीं उत्तर दिलं नाहीं म्हणून कुणी दोषही देत नाहीं.

आजोबा सहकुटुंब गयेची तीर्थयात्रा करून आले होते. बरोबर असलेली मुलगी त्यांच्या मेहुणीची नात. ते म्हणाले,'हिचा बाप हजार रुपये मोजून द्यायला तयार

आहे पण मनाजोगतं स्थळ अजून कुठं जुळत नाहीं. ही सोडीना तेव्हां हिला बरोबर आणावं लागलं. पूंटू, पेढ्यांची हंडी खोल पाहूं. नि असं पहा, दह्याचं गाडगं फेंकून दिलं नाहीं ना? इकडे दे, पानावर थोडं थोडं वाढ—दोन पेढे, एवढं दहीं—असलं दहीं कधीं पाहिलंसुद्धां नसशील भैय्या! अगदीं शपथेवर सांगतों. नाहीं—नाहीं—नाहीं आधीं तांब्यांतलं पाणी घेऊन हात धुवून घे पाहूं पूंटू—हा असा तसा का माणूस आहे?—असल्या माणसाला कसं वाढायचं तें शीक आधीं.'

हुकूमाप्रमाणें पूंटूनं सर्व व्यवस्था ठाकठीक केली. आगगाडींत अवेळीं पेढा नि दहीं अयाचित मिळालं. खात असतांना माझ्या मनांत येत होतं, कीं यांतून माझं कमनशिब न डोकावो म्हणजे झालं. नाहींतर पूंटूसाठीं हजार रुपयांचं स्थळ म्हणून माझ्याकडेच नजर वळायची. ब्रह्मदेशांत मला चांगला पगार मिळतो ही खबर त्यांना आधींच लागली होती.

रंगाअक्का मोठी माया दाखवीत होती, नि मी आपल्यांतलाच आहें हें कळतांच घंटाभऱ्यांत पूंटूसुद्धां संकोच मानीनाशी झाली. मी परका नव्हतों ना!

मुलगी छान होती. साधारण मध्यम स्थितींतल्या गृहस्थाची मुलगी. फारशी गोरी नसली तरी दिसायला बरी होती. तिच्या गुणांची यादी वाचायला ज्यावेळीं आजोबांनीं सुरवात केली तेव्हां त्यांना ती बरोबर सांगतां आली नाहीं.

लिहिण्यावाचण्याच्या बाबतींत रंगाअक्का म्हणाली, 'असं जमवून पत्र लिहिते ही, कीं त्यापुढं आजकालच्या नाटक कादंबऱ्या कांहींच नव्हत. त्या आमच्या नंदराणीला तिनं असं एक पत्र लिहून दिलं, कीं सात दिवसांचा जांवई पंधरा दिवसांची सुट्टी घेऊन धांवत आला.'

राजलक्ष्मीचा उल्लेख कुणी एवढासुद्धां केला नाहीं. तसं कांहीं झालं होतं, याची कुणाला आठवणसुद्धां नव्हती.

दुसऱ्या दिवशीं आमच्या गांवच्या स्टेशनवर गाडी थांबतांच मी उतरलों तेव्हां साधारण दहा वाजले होते. वेळींच स्नान भोजन झालं नाहीं तर पित्त-प्रकोप होईल या भीतीनं दोघांचाही जीव खालीं वर होत होता.

घरीं येऊन पोंचतांच माझ्या आदरसत्काराची धूमधाम सुरू झाली. पांच सात दिवसांच्या आंत साऱ्या गांवांत पूंटूचा वर मीच अशी बातमी फैलावली. कुणालाच संशय वाटत नव्हता—पूंटूलासुद्धां.

येत्या वैशाखांत कार्य उरकून घ्यायचं अशी आजोबांची इच्छा. पूंटूचीं जीं

कुणी माणसं होतीं त्यांना इकडे बोलावून आणायची गोष्ट निघाली. मोठ्या उल्हासानं रंगाअक्का म्हणाली, ' काय गंमत पहा, कुणाच्या हंडींत कुणाचे तांदूळ पडतील हें केव्हांच कुणाला सांगतां यायचं नाहीं. '

पहिल्यानं त्या बाबतींत मी उदासीन होतों, पुढं मला काळजी वाटूं लागली, त्यानंतर मी घाबरून उठलों. मी होय म्हटलं कीं काय याची माझी मलाच शंका वाटूं लागली. गोष्ट एवढ्या थराला गेली, कीं नाहीं म्हणण्याची छाती होईना.—पुढं काय प्रसंग येईल कोण जाणे !

पूंटूची आई तिथंच होती. एका रविवारीं एकदम तिचा बाप येऊन हजर झाला. मला कुणी कुठं जाऊं देईना.—थट्टामस्करीचीं बोलणीं सारखीं सुरू झाली. —पूंटू माझ्या मानगुटीवर बसणारच !—मुहूर्तच मिळायचा अवकाश होता— उत्तरोत्तर अशींच लक्षणं चारी बाजूंनीं स्पष्टपणें दिसूं लागलीं.

जाळ्यांत अडकलों खरा—मन बेचैन झालं होतं—जाळं तोडून बाहेर निघता येत नव्हतं—इतक्यांत अकस्मात् एक सुयोग आला. माझी जन्मपत्रिका आहे कीं नाहीं म्हणून आजोबांनीं विचारलं. ती तर हवीच होती ना ?

सारा संकोच बाजूला ठेवून मनाचा निर्धार करून मी एकदांच बोलून टाकलं, ' आपण पूंटूबरोबर माझं लग्न लावून द्यायचं खरोखरच का ठरवलंय् ? '

आजोबा नुसते बघत राहिले नि नंतर म्हणाले, ' खरोखरच ? हें काय बोलणं झालं ? '

' पण मी कांहींच ठरवलं नाहीं अजून ? '

' ठरवलं नाहीं ? मग ठरवून टाक. मुलीचं वय बारा तेरा आहे असं म्हणतों खरं पण तिला आतां सत्रा-अठरा होऊन गेलीं आहेत. यापुढं एवढ्या मोठ्या मुलीचं लग्न व्हायचं कसं ? '

' पण तो कांहीं माझा दोष नव्हे ? '

' तर मग कुणाचा ? माझा वाटतं ? ' हें बोलणं चाललं आहे तोंच मुलीची आई नी रंगाआक्कापासून शेजारपाजारच्या साऱ्या बायकापर्यंत एकदम गर्दी गोळा झाली. रडणं, ओरडणं, विनंती, काकूळतीला पारावार राहिला नाहीं. शेजारचे पुरुष म्हणाले, ' असला सैतान अजून कुणी पाहिला नाहीं. असल्या माणसाला चांगलीच शिक्षा दिली पाहिजे. '

पण शिक्षा देणं वेगळं नि मुलीचं लग्न होणं वेगळं. अर्थात् आजोबा स्वतः

गप्प राहिले. मग सुरू झाल्या कुकुळत्या ! पूंटू समोर येईना. बिचारी लाजेनं कुठंतरी तोंड लपवून बसली होती.

माझ्या मनाला तें जाणवूं लागलं. कसलं दुर्दैव गांठीला बांधून आम्हां लोकांच्या घरीं या पोरी जन्म घेतात ? तिची आईसुद्धां असंच म्हणत होती म्हणून कळलं. ती म्हणे, 'आतां ही दळभद्री सर्वांचं वाटोळं करणार. मेलीचं नशीबच असं. हवं म्हटलं तर सात समुद्र सुकून जातील. असं व्हायचं नाहीं तर व्हायचं तरी काय ?'

कलकत्त्याला जायला निघण्यापूर्वी आजोबांना तिथला पत्ता देऊन मी म्हणालों, 'एका माणसाचं मत मला घेतलं पाहिजे. तिथली कबुली मिळाली की मीं होय म्हणेन.'

आजोबा गहिंवरले नी माझा हात धरून म्हणाले, 'असं पहा बाबा, पोरीला मारूं नकोस. ज्याला कुणाला विचारायचं त्याची संमति मिळेल असं कांहीं तरी सांग.'

मी म्हटलं, 'ती संमति मिळेल असं मला वाटतं—एवढंच नव्हे, तर मोठ्या खुषीनं मिळेल तिथली संमती.'

मला आशिवाद देऊन आजोबा म्हणाले, 'तर मग केव्हां येऊं तुझ्या तिकडे ?'

'पांच सहा दिवसांनीं या.'

पूंटूची आई नी रंगाअक्का रस्त्यापर्यंत पोंचवायला आल्या. भरलेल्या डोळ्यांनीं त्यांनीं मला निरोप दिला.

मी आपल्याशींच म्हणालों, 'नशिबानं सुटलों ! एकप्रकारें होकार देऊन आलों. तेंच बरं झालं म्हणायचं.' राजलक्ष्मी या लग्नाला एवढासुद्धां विरोध करणार नाहीं असाच माझा समज होता.

## २

स्टेशनांत पाऊल टाकतों आहें तोंच गाडी चालू झाली. दुसरी गाडी यायला दोन तास अवकाश होता. वेळ कसा काढावा या विचारांत होतों तोंच एक जोडीदार मिळाला. एक तरुण मुसलमान माझ्याकडे किती तरी वेळ सारखा टक लावून पहात होता. त्यानं पुढं येऊन मला विचारलं, 'श्रीकांत कां ?'

'हो.'

'मला ओळखलं नाहींस ? मी गोहर–' असं म्हणून त्यानं जोरानं माझा हात दाबला, थाड्कन माझ्या पाठीवर थाप मारली नी एकदम माझ्या गळ्याला मिठी

घालून म्हणाला, ' चल आमच्या घरीं. कुठं निघाला होतास ? कलकत्त्याला ? कांहीं नाहीं जायचं ! चल. '

तो माझा लहानपणाचा शाळासोबती होता. माझ्यापेक्षां चार एक वर्षांनीं मोठा होता. पहिल्यापासूनच तो अर्धवट होता—मला वाटलं वयाबरोबर त्याचा हा अर्धवटपणा वाढावयचा कांहीं थांबला नाहीं. त्याच्या जबरदस्तीपुढं माझा इलाज चालेना. आजची रात्र तरी जाऊं देणार नाहीं म्हणून तो हट्ट धरून बसला, तेव्हां माझा जीव अगदीं सुकून गेला.

त्याची आपुलकी नि उत्साह मोठा जबर होता. पण त्याला जोड देण्या-इतकी ताकद त्यावेळीं माझ्याठायीं नव्हती.

पण तो कसला वस्ताद ! त्यानं माझी बॅग उचलली, हमाल बोलावून माझा बिछाना त्याच्या माथीं दिला. माझा हात धरून मला ओढीत स्टेशनच्या बाहेर घेऊन आला नि गाडी ठरवून म्हणाला, ' चल बैस. '

आतां इलाज नव्हता. नाहीं म्हणणं कठीण होतं

मी पूर्वींच सांगितलंय कीं गोहर माझा शाळा सोबती. त्याचं घर एका नदीच्या कांठीं आमच्या गांवापासून एक कोस दूर होतं. बंदूक चालवायला मी लहानपणीं त्याच्याकडेसच शिकलों. त्याच्या बापाची एक जुनीपुराणी बंदूक होती. ती घेऊन आम्हीं नदीच्या कांठीं, आंबराईतून, झाडाझुडपांतून पाखरं मारीत फिरत असूं. लहानपणीं मी त्याच्या घरीं रात्रीच्या रात्री काढल्या होत्या त्याची आई पोहे, गूळ दूध नि केळीं देऊन माझ्या फराळाची व्यवस्था करी. त्याची जमिनजुमला शेतवाडी बरीच होती.

गाडींत बसल्यावर गोहरनं विचारलं, 'एवढे दिवस होतास कुठं श्रीकांत ?"

कुठं होतों, काय करीत होतों, याची हकिकत थोडक्यांत सांगून मी विचारलं, ' सध्यां तूं काय करतोस गोहर ? '

कांहींच नाहीं. '

' तुझी आई खुशाल आहे ? '

' आई बाप दोघंही वारलीं. घरीं मी एकटाच असतों. '

' लग्न केलं नाहींस ? '

' तीही मरून गेली. '

तरीच ! जो सांपडेल त्याला पकडून धरधरून हा घरीं घेऊन जातो तो याच

कारणामुळं ! आतां मला अंदाज आला !

काय बोलावं तें सुचेना म्हणून मी सहज विचारलं, ‘ तुझी ती जुनी बंदूक आहे का ? ’

गोहर हंसून म्हणाला, ‘ तीसुद्धां आठवते ना तुला ! ती आहे, शिवाय आणखी एक नवीन बंदूक घेतलीय्, शिकारीला जायचं असलं तर येईन तुझ्याबरोबर—पण पाखरं मारणार नाहीं—मोठं जीवावर येतं आतां. ’

‘ म्हणतोस काय गोहर ? तेव्हां तर रात्रंदिवस तेंच चाललं होतं तुझं ! ’

‘ तें खरंच, पण हल्लीं बरेच दिवस तें सारं सोडून दिलंय् मी. ’

गोहरची आणखी एक माहिती द्यायची राहिली—तो कवी होता. त्या पूर्वीच्या काळांत वाटेल त्या वेळीं, वाटेल त्या विषयावर सारख्या कविता जुळवून आपल्या शीघ्रकवित्वाची साक्ष देत असे. साधरणपणें गाथेंतल्या कवितांसारख्या. छंद, मात्रा, ध्वनी वगैरे काव्यशास्त्राचे नियम तो पाळीत असे कीं नाहीं, तें ज्ञान मला त्यावेळीं नव्हतं—आतांही नाहीं. पण मणीपुरचं युद्ध, टीकेंद्रजिताची शौर्याची कहाणी, त्याच्या तोंडच्या काव्यांतून ऐकतांना त्या काळांत आम्हीं पुन्हा पुन्हा थरारून जात होतों. अजूनही तें आठवतं. मी विचारलं, ‘ कृत्तिवासापेक्षां देखील अधिक चांगलं रामायण लिहायची तुझी जी महत्त्वाकांक्षा होती, तो संकल्प आहे कीं गेला ? ’

‘ गेला ? ’ गोहर त्या क्षणीं गंभीर होऊन म्हणाला, ‘ तो काय जाणारा संकल्प होता रे ? त्याच्याच जोरावर तर अजून जगलोंय्! जिवंत आहें तोंपर्यंत तोच आधार घेऊन रहाणार आहें. किती तरी लिहिलं आहे, चल ना–आज तुला रात्रभर ऐकवतों–तरी पुरं पडायचं नाहीं. ’

‘ म्हणतोस काय गोहर ? ’

‘ नाहींतर काय खोटं सांगतों तुला ? ’ प्रदीप्त कविप्रतिभेनं त्याचा चेहरा झळाळूं लागला, शंका नव्हतीच—नुसतं आश्चर्य प्रदर्शित केलं होतं मात्र. तरीही पुढं कच्च्या बिळांतून साप बाहेर येईल, मला पकडून धरून बसवून गोहर रात्रभर काव्यचर्चा करीत बसेल, या भीतीनं शंकेला सीमा राहिली नाहीं.

त्याला खूष करण्यासाठीं मी म्हटलं, ‘ नाहीं गोहर, मी तसं म्हणत नाहीं. तुझ्या विलक्षण शक्तीवर माझा पूर्ण विश्वास आहे. पण बाळपणची भाषा आठवणींत आहे कीं नाहीं, तेवढंच नुसतं मी विचारलं बरं. एकूण बंगाली भाषेचं नांव गाजणार म्हणायचं. ’

' नांव गाजणार ! स्वतःच्या तोंडानं काय सांगू भाई–आधीं ऐक अन् मग काय तें बोलूं ! '

आतां कोणतीच पळवाट राहिली नव्हती. क्षणभर उगीच राहून स्वतः-शींच बोलल्यासारखा बोललों. ' सकाळपासून कसं अंग मोडून आल्यासारखं वाटतंय्. थोडीशी झोंप मिळाली तर—'

गोहरनं माझ्या बोलण्याकडे लक्ष दिलं नाहीं. तो म्हणाला, ' पुष्पक विमानांतून जात असतां सीतेनं रडत रडत ज्यावेळीं आपल्या अंगावरचे दागिने खालीं फेंकले, तो भाग ज्यांनीं ज्यांनीं ऐकलाय् त्यांना डोळयांतलं पाणी आवरतां आलं नाहीं रे श्रीकांत ! '

डोळयांतलं पाणी मला आवरतां येईल हेंसुद्धां संभवनीय नव्हतं. मी म्हटलं, ' पण—'

गोहर म्हणाला, ' आपला तो म्हातारा नयनचांद चक्रवर्ती—तो आठवतो ना तुला ? तो सारखी पाठ घेत असतो माझी ! केव्हांना केव्हां येऊन म्हणतो, गोहर, तेवढा तो भाग वाचून दाखव पाहूं ? म्हणतो, बाबा तूं कांहीं मुसल-मानाचा नव्हेस ! तुझ्या देहांत अस्सल ब्रह्मरक्त आहे. अगदीं माझ्या डोळयांना दिसतंय ! '

नयनचांद हें नांव फारसं प्रचलित नाहीं म्हणून मला आठवलं. त्याचं घर गोहरच्याच गांवीं होतं. मी विचारलं. ' तो चक्कोत्ती म्हातारा ना ? म्हणजे ज्याच्याबरोबर तुझ्या बापाची मारामारी अन् फिर्यादीआर्यादी झाल्या होत्या तोच का ? '

गोहर म्हणाला, ' हो. पण आमच्या बाबाबरोबर काय त्याचा टिकाव लागणार होता ? त्याचा जमीनजुमला, बागबगीचा, झाडझाडोरा नि चीजवस्त सारं कांहीं बाबांनीं लिलांव करून काबीज केलं होतं. मी मात्र त्याची विहीर नि घर परत दिलं. फार गरीब माणूस ! दिवसरात्र रडत बसे, तें बरं का रे श्रीकांत ? '

बरं तर नव्हेच. चक्रवर्तीच्या काव्यप्रीतीचा अंदाज हा असा कळल्यामुळं मी म्हटलं, ' आतां तरी त्याचं रडं थांबलं का ?

गोहर म्हणाला, 'माणूस खरोखरच सज्जन ! देण्याच्या कटकटीमुळं जें त्यानं केलं होतं तसं पुष्कळ करतात. त्याच्या घराच्या शेजारींच दीड एक बिघ्याची एक आंब्याची बाग आहे. त्यांतलं प्रत्येक झाड चक्कोत्तीनं स्वतःच्या हातानं लावलेलं. बिचाऱ्याला इतक्या नातनाती आहेत. विकत घेऊन खायला पैसा

नाहीं. नि माझं तरी कोण आहे ?—कोण खाणार ते आंबे ?'

'तें बरोबर आहे, तींहीं देऊन टाक एकदां!'

'दिलींच पाहिजेत रे श्रीकांत! डोळ्यांसमोर आंबे लागताहेत. पोरंपाळं ते बघून सुस्कारे सोडताहेत—ते बघून भारी दुःख होतंय् रे भाई! आंब्याचा मोसम आला कीं साऱ्या बागा व्यापाऱ्यांना देऊन टाकीत असतों—तेवढीच बाग विकीत नाहीं. मीं म्हणतों, चक्रोत्तीबाबा, तुमचीं नातवंडं पाडून खातील आंबे! कसं? बरं नव्हे?'

अर्थात् बरं! मी मनांतल्या मनांत म्हटलं, 'वैकुंठच्या खात्याचा जय होवो! गरीब बिचारा नयनचांद—याच्या आशिर्वादानं जर थोडं बहुत कांहीं संपादन करीत असेल तर त्यांत नुकसान कसलं? शिवाय गोहर तर कवी! कवीमाणसाला एवढी धनदौलत हवीय् कशाला? ती रसग्रही नि रसिक सज्जनांच्या कामीं कां लागूं नये?'

चैत्र महिन्याचा मध्यकाल होता. गाडीचा दरवाजा सताड उघडून डोकं गाडी-बाहेर काढून गोहर म्हणाला, 'दक्षिण वायू कसा वाहतो पाहिलास श्रीकांत?'

'पाहिला!'

गोहर म्हणाला, "'वसंताला हांक मारून' कवी म्हणाला—उघडीं दक्षिणद्वार आतां—'

माळावरचा कच्चा रस्ता—एका झपाट्यासरशीं त्या मलयानिलानं रस्त्यावरची सारी कोरडी धूळ रस्त्यावर राहूं दिली नाहीं. त्या धूळीनं आमचं नाक तोंड भरून गेलं. मी त्रासून म्हटलं, 'कवीनं वसंताला हांक मारली नाहीं. तो म्हणाला असेल, आतां यमाचं दक्षिणद्वार उघड म्हणून—आतां हें गाडीचं दार आधीं बंद करून घे. नाहींतर यमच येईल इथं.'

गोहर हंसला नि म्हणाला, 'चल तुला दाखवतों. तिथं दोन वातापी लिंबाचीं झाडं आहेत. अशीं मोहरलीं आहेत, कीं अर्ध्या कोसावर वास येतो त्यांचा. समोरचं जांभाचं झाड माधवीच्या फुलांनीं भरून गेलंय. त्याच्या एका फांदीवर मालतीचा वेल आहे पण तो अजून फुलला नाहीं. बारीक बारीक कळ्या आल्या आहेत. आमच्या तिथं चारी बाजूंला आंब्याच्या बागा आहेत. अशा दरदरून मोहरल्या आहेत! जिकडे तिकडे लहान मोठीं झाडंझुडपं विखुरलीं आहेत. मधमाशांचा पोळं पण दाखवतों उद्यां तुला. किती कोकिळा, किती बुलबुल, किती मैना, सारख्या गात असतात! सध्यां चांदण्याची रात्र आहे कीं

नाहीं, तेव्हां रात्रीसुद्धां कोकिळा बोलायच्या थांबत नाहीत. बाहेरच्या खोलीच्या उजवीकडची खिडकी जर उघडी राखलीस तर तुझ्या डोळ्याची पापणीसुद्धां हलायची नाहीं. यावेळीं मीं आतां तुला सोडणार नाहीं भैय्या. तें आधींच सांगून ठेवतों. तसं पाहिलं तर खाण्यापिण्याची काळजी नाहीं. चक्रोत्ती महाशयाला नुसती कळायची खोटी, कीं तो तुला डोक्यावर घेऊन नाचवील '

त्याच्या आमंत्रणांतील निष्कपट जिव्हाळा पाहून मी थक्क झालों. किती तरी दिवसांनीं भेट झाली पण तेव्हांचा गोहर अजूनही तसाच होता—एवढासुद्धां बदलला नव्हता. तसाच पोरस्वभाव—तसाच मित्रमंडळीबद्दलचा अकृत्रिम उल्हास नि तशीच धामधूम !

गोहरचं घराणं मुसलमानांतील फकीर संप्रदायाचं होतं. मीं ऐकलं होतं कीं त्याचा आजोबा बाऊल होता. रामप्रसादी नी तसलींच भजनं म्हणत भिक्षा मागत असे. त्यानीं एक शालपक्षी पाळला होता. त्या पक्षाच्या संगीतज्ञानाची कहाणी त्यावेळीं तिकडे सर्वांमुखीं होती.

पण गोहरच्या बापानं आपल्या बापाचा पेशा सोडून तागाचा व्यापार सुरू केला. त्यावर खूप पैसे मिळवले नि मुलांसाठीं खूप इस्टेट खरेदी करून ठेवली. पण बापाची ती व्यवहारी बुद्धि मुलाच्या ठायीं नव्हती—आजोबाची काव्यसंगीताची आवड त्याच्या ठायीं उतरली होती. म्हणूनच एवढ्या परिश्रमानं बापानं मिळविलेला जमीनजुमला नि शेतवाडीची दशा काय होईल याची सर्वांना शंका वाटत होती.

तें कांहीं असो, त्याचं घर मीं लहानपणीं पाहिलं होतं. चांगलंसं आठवत नाहीं आतां. आतां कदाचित् त्याचं रूपांतर झालं असेल. कवीच्या सरस्वतीपूजेचं तपोवन बनलं असेल. पुन्हां एकदां प्रत्यक्ष पहायची इच्छा म्हणूनच प्रबल झाली.

त्याच्या गांवचा रस्ता माझ्या ओळखीचा होता. तो बिकट होता असं आठवत होतं. पण थोडक्याच वेळांत मला कळून आलं, कीं लहानपणची ती आठवण नि आज प्रत्यक्ष डोळ्याला जें दिसत होतं तें, याची तुलना करणं शक्य नव्हतं.

बादशाही अंमलांतला राजरस्ता ! अतिशय जुनापुराणा—विटादगडांची ओळख या बाजूला कुणी ठेवलीसुद्धां नव्हती. पण दुरुस्ती करण्याची कल्पनासुद्धां केव्हांच नाहींशी होऊन गेली होती. दुरुस्ती करा म्हणून सांगून पाहण्यांत कांहीं अर्थ नव्हता हें गांवच्या लोकांना माहित होतं. या कामासाठीं सरकारच्या तिजोरींत केव्हांही पैसा नसायचाच. लोकांना माहीत होतं, कीं बाडवडिलांपासून चालत

आलेला रस्त्याचा कर नुसता भरायचा ! पण तो रस्ता कुणासाठीं, कुठून आणि कसा दुरुस्त करायचा याची काळजी कुणालाच नव्हती.

अनादिकालापासून सांचत आलेल्या धुळीच्या राशींना धक्के देत आमची गाडी त्या रस्त्यावरून केवळ चाबकाच्या जोरावर पुढं जात होती. इतक्यांत एकदम गोहर आरडाओरडा करीत उठला नि म्हणाला, ' अरे गाडीवाला, अरे नाहीं नाहीं—थांब थांब, एकदम थांब ! '

जशी कांहीं पंजाब मेलचीच भानगड आहे असा आव त्यानं आणला होता. एकदम व्हॅक्यूम ब्रेक लावला नाहींतर सत्यानाश होईल असं त्याला वाटत होतं.

गाडी थांबली. त्याच्या गांवाला जायची वाट डाव्या बाजूनं होती. खालीं उतरून गोहर म्हणाला, ' खालीं उतर श्रीकांत, मी बॅग घेतों, तूं बिछाना घे. चल. '

' पुढं जायची नाहीं का गाडी ? '

' नाहीं. दिसत नाहीं—पुढं रस्ता नाहीं. '

खरंच ! उजव्या डाव्या बाजूला शिवळीचीं नि वेताचीं झाडं एकमेकांना चिकटून वाढलीं होतीं. त्यांच्या फांद्यांनीं सारा रस्ता अडवून टाकला होता. गाडी जायचा प्रश्न तर दूरच राहो, माणूस सावधपणें गेला नसता तर त्याचे कपडे कांट्यांनीं फाडून निघाल्यावांचून राहिले नसते. पण कवीच्या मताप्रमाणें निसर्गाचं सौंदर्य अनवद्य होतं.

त्यानं बॅग उचलून खांद्यावर घेतली. बगलेला बिछाना घेऊन मीं त्या गोरज मुहुर्तावर गाडीखालीं उतरलों.

कवीच्या घरीं येऊन पोंचलों त्यावेळी संध्याकाळ झाला होता. वसंतकाळच्या रात्रींतला चंद्र वर आला होता असं मी अनुमान केलं. पूर्णिमेच्या जवळपासची तिथि असावी. भर मध्यान्हीला चंद्र माथ्यावर आला तर निश्चितपणें तिथि सांगतां येईल असं वाटलं.

घराच्या चारी बाजूला गर्द कळकीचीं बेटं होतीं. त्यांत कोकीळ, बुलबुल वगैरे पक्ष्यांचे थवे सदोदित शीळ देत गात गात कवीला व्याकुळ करीत असावे. कळकीचीं पिकलेलीं असंख्य पानं वाऱ्यानं भुरभुर उडत ओटीवर पसरलीं होतीं. तीं पहातांच गळलेल्या पानांचं गाणं गाण्याची स्फूर्ति अंतःकरणांतून गाजून उठे.

बाहेरची खोली उघडून नोकरानं दिवा लावला. चौकी दाखवून गोहर म्हणाला, ' ही तुझी खोली ! पाहिलीस कशी सुंदर हवा येतेय् ? '

शक्य आहे! दक्षिण वायूच्या राज्यांतला सुकलेला पानपाचोळा खिडकींतून आंत शिरून खोलीभर पसरला होता, चौकीभर विखुरला होता. जमिनीवर पाय ठेवला तर शिरशिरी भरत होती. खाटेच्या पायाजवळ उंदरांनीं बिळ पोखरून मातीचे पुंजके करून ठेवले होते. ते दाखवून मी म्हणालों, 'गोहर, या खोलींत तुम्हीं कुणी कधीं येत नाहीं वाटतं?'

गोहर म्हणाला, 'नाहीं. जरुरीच पडत नाहीं. मी आंतच असतों. उद्यां सगळी साफसफाई करून टाकूं!'

'हो-होईल म्हणा, पण बिळांत सापबिप तर नसतील?'

नोकर म्हणाला, 'पूर्वीं होते एक दोन. आतां नाहींत. या दिवसांत ते बिळांत रहात नाहींत. हवा खायला बाहेर पडतात.'

मी विचारलं, 'हें तुला कसं कळलं मियां?'

गोहर हंसून म्हणाला, 'हा मियां नाहीं. हा आमचा नवीन. बाबाच्या वेळचा माणूस आहे. गुरंवासरं, शेतवाडी वगैरे हाच पहातो. घरची व्यवस्थाही हाच पहातो. इथं कुठं काय आहे, काय नाहीं, तें सारं याला माहीत आहे.'

नवीन हिंदू होता-बंगाली होता-वाडवडिलांच्या वेळचा माणूसही असेल. या घरचीं गुरंवासरं शेतीवाडीपासून घरादारांतल्या साऱ्या गोष्टीही याला माहीत असणं अशक्य नसेल! तरी पण सापाच्याबद्दल त्यानं जें कांहीं सांगितलं तें कांहीं मला पटलं नाहीं. घरच्या साऱ्या माणसांना दक्षिणदिशेची हवा भरपूर मिळत असे. मला वाटलं, हवेच्या आशेनं सापाची जोडी बाहेर गेली असेल हें सुद्धां जरी कबूल केलं, तरी पण ती केव्हां परत येईल तें कुणी सांगावं?

माझं समाधान झालं नाहीं हें गोहरच्या ध्यानीं आलं. तो म्हणाला, 'तूं असणार खाटेवर, तुला कसलं आलंय भय? नि तसं पाहिलं तर हे साप नाहींत कुठं? नशिबींच असलं तर परिक्षिती राजाला सुद्धां मरण चुकवतां आलं नाहीं. मग आमची कथा काय? नवीन, खोली झाडून काढलीस कीं या बिळाच्या तोंडावर एक वीट ठेवून दे. विसरूं नकोस. बरं, आतां खाण्याची व्यवस्था काय करूं श्रीकांत?'

'जें मिळेल तें' मीं म्हटलं.

नवीन म्हणाला, 'दूध, पोहे नि खजुरीचा गूळ आहे. आजच्या दिवसापुरतं-'

'छान छान,' मी म्हटलं, 'या घरीं हेंच खायचा सराव होता माझा! आणखी कांहीं नकोय मला. नि असं पहा बाबा, कुठून तरी एक वीट पाहून

आण नि या बिळाच्या तोंडावर चांगली ठाकून ठोकून बसवून दे. हवा खाऊन ते परत येतील तेव्हां चटकन् बाहेर तरी यायला नकोत.'

हातीं दिवा घेऊन नवीननं चौकीखालीं वांकून निरखून पाहिलं नि तो म्हणाला, 'छे नाहीं जमायचं !'

'काय जमायचं नाहीं रे ?'

तो मान हालवून म्हणाला, 'छे नाहींच जमायचं ! बिळाच्या तोंडाशीं एक वीट ठेऊन काय होणार आहे बाबू ? एक टोपलीभर विटा हव्यात ! उंदरांनीं जमीन पोंखरून खालीं तळघर करून ठेवलंय !'

गोहरला त्याचं विशेष कांहीं वाटलं नाहीं. माणसं लावून उद्यां सारं ठीक-ठाक करून टाकायचा हुकूम त्यानं दिला. हातपाय धुवायला पाणी देऊन फराळाची व्यवस्था करण्यासाठीं नवीन आंत गेला तेव्हां मी विचारलं, 'तुझ्या जेवणाचं काय गोहर ?

'माझ्या होय ? माझी एक म्हातारी मावशी आहे, ती करते माझ्या जेवणाची व्यवस्था. तें जाऊं दे,तुझा फराळ झाला कीं माझं लिखाण तुला वाचून दाखवणार आहें.'

आपल्या काव्याच्या विवंचनेंतच तो निमग्न होता. पाहुण्याच्या सोईगैर-सोईचा विचार त्याच्या आठवणींत सुद्धां नव्हता. तो म्हणाला, 'माझा बिछाना इथंच टाकायला सांगूं का ? रात्रीं दोघेही मजेंत वेळ काढूं ? कसं ?'

हें आणखी एक संकट ! मी म्हटलं. 'नको बाबा, तूं आपल्याच खोलींत झोंप तिकडे. मी आज फार थकलोंय. उद्यां सकाळीं ऐकूं तुझ्या कविता.'

'उद्यां सकाळीं ? उद्यां होईल का सवड ?'

'खात्रीनं होईल.'

क्षणभर विचार करून नंतर गोहर म्हणाला, 'किंवा आपण असंच करूं श्रीकांत. मी वाचतों नि तूं पडल्यापडल्या ऐक. तुला झोंप लागली कीं मी उठून जाईन. कसं ? हें ठीक जुळेल, नाहीं ?'

मी काकुळतीला येऊन म्हणालों, 'नाहीं गोहर, तसं केलं तर तुझ्या कवितेचा मी अपमान केल्यासारखं होईल. उद्यां अगदीं मन लावून ऐकेन तुझ्या कविता.'

तोंड वांकडं करून गोहरनं माझा निरोप घेतला. पण त्याला निरोप देतांना मला सुद्धां बरं वाटलं नाहीं.

तो एक वेडा होता. अंदाजाअंदाजानं मीं पूर्वीच ताडलं होतं कीं आपला काव्यग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याचा त्याचा इरादा होता. हें पुस्तक प्रसिद्ध झालं कीं जग थक्क होऊन जाईल अशी त्याची अपेक्षा होती. तो फारसा शिकलेला नव्हता. बंगाली नि इंग्रजीचा अभ्यास जेवढा कांहीं शाळेंत झाला होता तेवढाच! शिकायची त्याला आवडही नव्हती, नि मला वाटतं, सवडही नव्हती.

केव्हां कुठं लहानपणापासून कवितेचं वेड त्याला लागलं होतं!—कदाचित् हें वेड त्याच्या रक्तांतच असावं—त्यानंतर या एका विषयापुढं जगांतल्या साऱ्या गोष्टी त्याला तुच्छ वाटत होत्या. स्वतःच्या पुष्कळशा कविता त्याला तोंडपाठ होत्या. गाडींतून येत असतां मधून मधून तो कविता गुणगुणत होता. वाग्देवीनं आपल्या सुवर्णकमळाची एक पाकळी या साध्याभोळ्या भक्ताला बक्षिस दिली असावी याची कल्पना त्या कविता ऐकतांना मला आली नव्हती. कवितादेवीच्या तीव्र आराधनेमुळं नि एकाग्र आत्मनिवेदनामुळें त्या बिचाऱ्याला विश्रांतीचा एक क्षण सुद्धां मिळत नव्हता.

बिछान्यावर पडल्या पडल्या मी विचार करूं लागलों, बारा वर्षांनंतरची ही भेट! या बारा वर्षांच्या मुदतींत साऱ्या व्यावहारिक स्वार्थाला तिलाजली देऊन शब्दांत शब्द गुंफीत या गृहस्थानं श्लोकांचा जो पहाड उभारलाय् त्याचा उपयोग काय? उपयोग कांहींच नाहीं हें मला कळत होतं. आज गोहर हयात नाहीं. त्याची ती कठोर तपश्चर्या फुकट गेली हें आठवून आजसुद्धां मला दुःख होतं. साऱ्या जगाच्या दृष्टीआड, किती शोभाहीन, गंधहीन फुलं फुलून सुकून गेलीं आहेत! या जगाच्या उळाढालींत त्या फुलाचं जीवन जर सार्थकीं लागलं असेल तर गोहरची साधना फुकट गेली नाहीं असं म्हणतां येईल.

भल्या पहाटे आरडाओरडा करून गोहरनं मला जागवलं. त्यावेळीं सातसुद्धां वाजले नव्हते. वंग देशांतल्या वसंतऋतूंतील आडवळणांतील खेडेगांवांत सृष्टी सौंदर्य कसं दिसतं हें मी पहावं अशी त्याची इच्छा! जसा काय मी विलायतेहून आलों होतों असं त्याला वाटत असावं. त्याचा आग्रह अगदीं माथेफिरुपणाचा असे. नाहीं म्हणायची सोयच नव्हती. तोंड धूणं उरकून निघायला तयार झालों.

भिंतीच्या बाहेर एका अर्ध मेलेल्या जांभाच्या झाडावर एक अर्धवट माधवी लतेचा नि अर्धवट मालतीचा वेल लोंबकळत होता. कवीची ही अगदीं स्वतःची आवड होती. त्या वेली अत्यंत निर्जिव होत्या तरीही एकीवर थोडीशीं फुलं

फुललीं होतीं नि दुसरी नुकतीच फुलत होती. चार दोन फुलं काढून मला द्यावीं असं त्याला वाटत होतं. पण झाडावर इतक्या मुंग्या जमा झाल्या होत्या कीं हात लावायची सोय नव्हती. ' दिवस थोडा वर आला कीं आंकडीनं फुलं काढून घेतां येतील. आतां चल. ' असं म्हणून त्यानं माझं समाधान केलं.

सकाळचे विधी उरकण्यापूर्वींची पूर्व तयारी म्हणून तंबाकुचा दम मारल्या-मुळं नवीन जोरजोरानें खोकत होता. खाकरे टाकून, आंवढे गिळून स्वतःला सांवरीत हातानं खूण करीत तो ' नको ' म्हणत होता. तो म्हणाला, ' यावेळीं जंगलांतून जाऊं नका. सांगून ठेवतोंय्. '

' कां रे ? ' गोहरनं रागानं विचारलं.

' एकदोन कोल्हे पिसाळले आहेत—' नवीननं उत्तर दिलं, ' माणसांगुरांना चावत सुटले आहेत. '

घाबरून मागं हटत मी म्हणालों, ' कुठं रे नवीन ? '

' कुठं तें काय मी पाहून ठेवलंय् ? असतील कुठं तरी झाडाझुडपांत ! जातांना नीट बघून चला म्हणजे झालं. '

' तर मग आज नको बुवा गोहर ! '

' वा रे ! या दिवसांत कोल्हे कुत्रे पिसळायचेच! म्हणजे काय लोकांनीं रस्त्यांतून चालूं सुद्धां नये ? हें काय बोलणं झालं ? '

हा सुद्धां दक्षिणवायूचा परिणाम ! अर्थात निसर्गाचं सौंदर्य पहात त्याच्या बरोबर जावं लागलं.

जवळ येतांच रस्त्याच्या दोन्हीं बाजूंना असंख्य लहान लहान किडे चटचट पटपट आवाज करीत आंब्याचा मोहर सोडून नाकातोंडांत, कोटासदऱ्यांत घुसूं लागले. रस्त्यावर पडलेल्या वाळलेल्या पानांवर आंब्याचा तवंग सांचून जमला होता. तो पायांतल्या वहाणांना चिकटत होता. त्या चिंचोळ्या रस्त्यांत पुष्कळशीं झुडपं फुलांफळांनीं बहरलेलीं असल्यामुळं रस्त्यांतून जाणं कठीण होत होतं. नवीनचा इशारा मला आठवला. गोहरच्या मतें कालचक्राची गती बदलतां येत नव्हती. अर्थात् वनपुष्पांची शोभा केव्हांतरी दुसऱ्या वेळीं पाहूं असा विचार करून मी नि गोहर, अर्थात नवीनच्या हिशेबीं माणूस नि गुरुं, झपाझप पावलं उचलीत पुढं निघालों.

आमच्या गांवची नदी याच गांवच्या कडेनं वहात होती [illegible]च सांगि-

तलंय्. पावसाळयांत जी नदी दुथडी भरून जायची ती या वसंत काळांत अगदीं निरुंद झाली होती. त्यावेळीं स्रोताबरोबर वहात आलेलीं पानें नि शेवाळ आज कोरडया नदीकाठांवर अडकून पडून उन्हांत तापत राहिल्यामुळं जिकडून तिकडून दुर्गंधीचं नरककुंड उभारलं गेलं होतं. पलिकडच्या किनाऱ्यावर दूर कित्येक शिवळीच्या झाडावर मोठमोठीं तांबडीं फुलं फुलून उठलीं होतीं. डोळयांनं तीं पहात होतों. पण त्यांच्याकडे दृष्टि लावून पाहणं कवीला सुद्धां जसं कांहीं कठीण होत होतं असं वाटलं. तो म्हणाला, ‘ चल आतां घरीं जाऊं. ’

‘ चल तर मग. ’

‘ मला वाटलं होतं, हें सारं बघून तुला आनंद होईल. ’

‘ होईल बाबा, होईल आनंद ! ’ मी म्हटलं, ‘ सुंदर सुंदर शब्द गुंफून याच्यावर एक कविता लिही, मी नुसता वाचूनच खूष होईन ! ’

‘ म्हणूनच वाटतं खेडयांतल्या लोकांना फारसं फिरायला नको असतं. ’

‘ तसं नव्हे. पाहून पाहून त्यांना वीट येतो याचा ! डोळयांची रुचि नि कानांची रुचि यांच्यांत भेद आहे. कवीनं केलेलं वर्णन डोळयांनीं पाहिलं म्हणजे लोक चकित होऊन जातात असं ज्यांना वाटतं, त्यांना हें कळत नाहीं कीं दुनियेंतले सारे व्यवहार असतात असेच ! पाहून डोळयाला जें विशेष वाटत नाहीं, अगदींच सामान्य वाटतं, तीच कवीच्या भाषेंत कवीची ‘ नूतन सृष्टि ’ असते. तुला जें दिसतं, तेंही खरं. मला जें दिसत नाहीं, तेंही खरं या बाबतींत वाईट वाटून घेऊं नकोस गोहर ! ’

तरीही परत येतांना तो मला काय काय दाखवायचा प्रयत्न करीत होता त्याला अंत नाहीं. रस्त्यांतलं प्रत्येक झाड, प्रत्येक झुडुप, प्रत्येक वेल जशी कांहीं त्याच्या परिचयाची होती. कित्येक झाडांच्या साली कुणी औषधासाठीं तासून नेल्या होत्या. त्यांतून चीक गळत होता. तो पाहून गोहर शहारून उठला. त्याचे डोळे आंसवांनीं भरून आले. तें दृश्य पाहून त्याच्या हृदयाला होणाऱ्या वेदना त्याच्या चेहऱ्यावर उमटलेल्या मला स्पष्ट दिसत होत्या.

चक्रवर्तीनं आपली हातसोड झालेली इस्टेट परत मिळविली ती केवळ बुद्धीच्या कौशल्यानं नव्हे. त्याचं मूळ कारण गोहरच्या स्वतःच्या स्वभावांतच होतं. त्या ब्राह्मणावरचा माझा बराचसा राग आपोआप मावळला. चक्रवर्तीच्या भेटीचा योग आला नाहीं. कारण कुणी सांगितलं कीं, त्यांच्या घरीं त्यांच्या दोन नातींवर

देवीची कृपा झालीय म्हणून! गांवांत सगळ्याच घरांतून अजून देवींनीं आपला पसारा मांडला नव्हता. तळ्याचं कुचकट पाणी आणखी थोडं सुकेल म्हणून त्या वाट पहात होत्या.

तें कांहीं असो, घरीं येऊन पोंचतांच गोहरनं आपल्या चोपड्या बाहेर काढल्या. त्या चोपड्यांची चळथ पाहिल्याबरोबर घाबरून जाणार नाहीं असा माणूस जगांत कुणी असेल असं मला वाटत नाहीं. तो म्हणाला, 'आतां तुला हें वाचून दाखवल्याशिवाय सोडीत नाहीं श्रीकांत. तुझं खरं खरं मत पाहिजेय मला.'

मलाही संशय होताच. उघडपणें बोलून दाखवण्याचं धैर्य मला होत नव्हतं. या काव्यश्रवणांत कवीच्या घरीं एकएक म्हणतांना सात दिवस निघून गेले. काव्य राहो बाजूला पण निकट सहवासामुळं या माणसाच्या स्वभावाचा मला अंत लागला. ती जितका सुंदर तितकाच मोठा विलक्षण होता.

एके दिवशीं गोहर मला म्हणाला, 'ब्रह्मदेशांत कशाला जातोयूस श्रीकांत? आपणां दोघांनाही आपलं म्हणायला कुणी नाहीं. दोघेही इथं भाऊ भाऊ म्हणून मजेंत दिवस काढूं.'

मी हंसून म्हटलं, मी 'कांहीं तुझ्यासारखा कवी नाहीं बुवा! झाडांपानांची भाषा कांहीं मला कळत नाहीं. त्यांच्याबरोबर बोलायचं मला जुळत नाहीं. या जंगलात राहून माझा निभाव कसा लागणार? दोन दिवसांत श्वास कोंडून निघेल माझा.'

गंभीर होऊन गोहर म्हणाला, 'खरंच सांगतों तुला, खरोखरच त्यांची भाषा कळतेय मला. खरोखरच तीं बोलतात माझ्याबरोबर! नाहीं पटत तुला?'

मी म्हटलं, 'असल्या गोष्टीवर कुणाचा विश्वास बसायचा नाहीं, हें तुला नाहीं का कळत?'

एकदम कबूली देत गोहर म्हणाला, 'हो तेही खरंच!'

एके दिवशीं सकाळीं त्याच्या रामायणांतल्या अशोकवनाचा अध्याय कांहीं वेळ मला ऐकवल्यावर तो एकदम चोपडी बंद करून माझ्या तोंडाकडे पहात म्हणाला, 'बरं श्रीकांत, कधीं कुठं तुझं प्रेम बसलं होतं का?"

काल रात्रभर जागून राजलक्ष्मीला शेवटचं पत्र मी लिहून टाकलं होतं. आजोबाची हकिकत, पुंटूची हकिकत, त्यांच्यावर आलेल्या संकटाचं सारं वर्णन त्यांत मी केलं होतं एका माणसाची अनुमति मिळाली पाहिजे असं मी त्यांना

सांगितल्याचं त्यांत लिहिलं होतं—तें पत्र पाठवलं गेलं नाहीं–तसंच खिशांत पडून राहिलं होतं—गोहरच्या प्रश्नाला उत्तरार्थी हंसून मी म्हटलं, ' नाहीं. '

गोहर म्हणाला, ' जर कधीं प्रेम केलंस, जर कधीं तो दिवस आला, तर मला मुद्दाम कळव श्रीकांत. '

' तुला कळवून काय होणार ? '

कांहीं नाहीं. नुसता तिथं तुम्हीं मंडळींत चार दिवस आनंदानं काढायला येईन मी. '

' बरं आहे. '

' जर त्यावेळीं तुला पैशाची जरूर लागली तर मला कळव. बाबांनीं खूप पैसा ठेवून दिला आहे. त्याचा मला कांहींच उपयोग झाला नाहीं. तो तुझ्या तरी कामीं लागेल. '

तो अशा कांहीं चमत्कारिक रीतीनं बोलत होता कीं तें ऐकतांना माझ्या डोळ्यांत आसवं डोकावूं लागलीं. मी म्हटलं, ' बरं आहे. तेंही कळवीन तुला. पण तशी वेळ न येवो एवढाच मला आशिर्वाद दे. '

मी जायला निघालों त्यावेळीं माझी बॅग खांद्यावर चढवून गोहर हजर झाला. असं करायची जरुरी नव्हती. बिचारा नवीन शरमेनें अर्धमेला झाला पण त्यानं तें ध्यानीं घेतलं नाहीं. आगगाडींत बॅग चढवून दिल्यावर त्यानं बायकांप्रमाणं रडायला सुरुवात केली. तो म्हणाला, " माझ्या गळ्याची शपथ आहे श्रीकांत, जायच्यापूर्वी पुन्हां एकदां एक दिवस आलं पाहिजे तुला !—आणखी एकदां तरी भेट झाली पाहिजे. "

मला नाहीं म्हणवेना. पुन्हां येण्याची मी कबूली दिली.

" कलकत्त्याला गेल्यावर खुशाली कळवशील ना ? "

तीही कबुली दिली. असा कुठं दूरवर जाणार होतों मी ?

कलकत्त्याला घरीं जाऊन पोंचलों तेव्हां संध्याकाळ झाली होती. उंबरठ्याच्या आंत पाऊल टाकलं तोंच रतन आलेला दिसून आला.

" हें काय ? तूंच का ? "

" हो, मीच ! कालपासून वाट पहातोंय. एक पत्र आहे. "

माझ्या पत्राचंच उत्तर असावं ! मी म्हटलं, " डाकेनं पत्र नसतं का पाठवतां आलं ? "

रतन म्हणाला, " ती व्यवस्था कुणबीमाळी, हमालमजूर, गृहस्थ लोकांसाठीं !

पांचशें मैलांची मजल मारून न खातां न पितां आल्याशिवाय का आमच्या बाईचं पत्र पोंचणार आहे ? तुम्हीं सारं कांहीं जाणतां, मग उगीच विचारतां कशाला ?'

नंतर मला कळलं, कीं रतनची ही तक्रार खोटी होती. त्यानं आपण होऊनच स्वतः पत्र नेऊन द्यायचं पत्करलं होतं. त्यावेळीं, मला वाटतं, गाडींतल्या गर्दीमुळं आणि खाण्यापिण्याची गैरसोय झाल्यामुळं त्याची तब्येत बिघडलेली असावी. म्हणून तो तसं बोलला.

मी हंसून म्हटलं, "चल वर ये. पत्र मग पाहूं. आधीं तुझ्या खाण्यापिण्याची व्यवस्था करूं दे मला."

माझ्या पायाला हात लावून नमस्कार करून तो म्हणाला, "चला वर!"

## ३

ढेंकरा देत रतन आला तेव्हां मी चमकलों.

"काय रतन, पोट भरलं ?"

"जी, होय ! कांहीं म्हणा बाबू, या आमच्या कलकत्त्याच्या बंगाली बामणाखेरीज चांगलं जेवण कुणाला करतांच येत नाहीं. ते तिकडले आमचे महाराज म्हणजे शुद्ध जनावरं आहेत."

या किंवा त्या प्रांतांतल्या जेवणाच्या बाबतींतील किंवा स्वैपाक्यांच्या रंधनकौशल्याची चर्चा रतनबरोबर कधींच केल्याचं मला आठवेना. एवढं खरं, कीं भरपूर जेवायला मिळालं म्हणजे रतन मोठा खुषींत येत असे. नाहींतर पश्चिमेकडच्या सैपाक्यांच्या बाबतींत त्यानं असं निरपेक्ष मत दिलं नसतं. तो म्हणाला, "काय ती गाडींतली धक्काबुक्की ! गर्दीतून घुसून जागा काढल्याशिवाय—"

"तें राहूं दे रतन. खोलींत पहा, नाहींतर व्हरंड्यावर पहा, बिछाना अंथरून आधीं आडवा हो पाहूं. उद्यां बोलूं सावकाश."

कां कुणाला ठाऊक, पत्र वाचायला मी फारसा उत्सुक नव्हतों. तिनं काय लिहिलं असेल याची मला चांगली कल्पना होती.

फतोईच्या खिशांतून एक लखोटा काढून रतननं माझ्या हातीं दिला. त्या लखोट्यावर चोहोंबाजूंनीं सीलं केलेलीं होतीं. तो म्हणाला, "व्हरांड्याच्या डावीकडच्या खिडकीच्या बाजूला बिछाना अंथरतों. मच्छरदाणीची कांहीं जरुरी नाहीं इथं. कलकत्त्याखेरीज इतर कुठं आहे ही सोय ? येतों तर—"

" बरं, तिकडली सारी मंडळी खुशाल ? "

मुद्रा गंभीर करून रतन म्हणाला, " असं वाटतं खरं. गुरुदेवांच्या कृपेनं घराबाहेर सारं ठीकठाक आहे. आंत दासदासी आहेत, बंकुबाबू आहेत, नवी सून घरीं आल्यापासून उजळलं आहे सारं घर—आणि सर्वांत विशेष म्हणजे स्वतः आमच्या बाई आहेत घरच्या गृहिणी—असल्या संसाराची निंदा कोण करील ? मी पूर्वीपासूनचा नोकर, जातीचा न्हावी,—रत्नाला काय असं सहज विसरतां येतं बाबू ? त्या दिवशीं स्टेशनवर म्हणूनच डोळयांतलीं टिपं आवरेनात—म्हणूनच म्हणालों होतों, कीं परदेशीं नोकर मिळत नसला तर मला बोलावून घ्या. आपली चाकरी तीच बाईची चाकरी, असं मी समजतों. नाहीं तर धर्म बुडेल ना ? "

एक शब्दसुद्धां न बोलतां मी नुसता पहात राहिलों. तो बोलत होता, " बंकूबाबू आतां मोठा झाला. शिकवूनसवरून आतां त्याला माणसांत आणलाय. आतां दुसऱ्याच्या ताब्यांत कां रहावं असं त्याला वाटूं लागलं आहे वाटतं. बक्षिसपत्राच्या जोरावर तो सारं कांहीं बळकावून बसलाय. एकंदरींत जें विशेष म्हणून कांहीं आहे तें सारं त्यानं आवरलं आहे. पण हें किती दिवस चालणार बाबू ?"

त्याच्या भाषणांतून मला स्पष्ट असं जरी कांहीं कळलं नाहीं तरी नजरेसमोर साधारण अंदाज आला.

तो पुढं बोलत होता, " महिन्यांतून निदान दोन वेळ तरी माझी नोकरी जाते, तें आपण स्वतःच पाहिलंय. तसं माझं बरं आहे. डोक्यांत राख घालून गेलों निघून तरी चालेल. पण कां जात नाहीं ? जाववतच नाहीं. ज्याच्या कृपेनं हें सारं कांहीं झालंय त्याच्या एका फुंकरीसरशी आश्विनांतल्या आभाळासारखं सारं मोकळं होईल—डोळ्याचं पातं लवायलासुद्धां वेळ लागायचा नाहीं, हें मी जाणतों. तो राग नव्हे बाईचा—देवाचा आशिर्वाद आहे तो. "

लहानपणीं प्रायमरी शाळेंत रतनचं शिक्षण झालं होतं याची यावेळीं आठवण करून दिली पाहिजे.

थोडं थांबून तो म्हणाला, " बाईचा आधार आहे म्हणून कुणी बोलत नाहीं. घरांत जें कांहीं होतं नव्हतं तें माझ्या चुलत्यानं लांबवलं. कांहींसुद्धां ठेवलं नाहीं. —घरसुद्धां राहिलं नाहीं. दोन लहान पोरं होतीं तीं आईच्या ओटींत घातलीं आणि गांव सोडून बाहेर निघालों. पूर्वजन्मीच्या पुण्याईनं बाईसारख्यांच्या घरीं चाकरी मिळाली. माझी सारी हकिकत त्यांनीं ऐकून घेतली पण त्यावेळीं कांहीं

बोलल्या नाहींत. वर्षाभऱ्यानं एके दिवशीं मी म्हटलं, ' पोराबाळांना एकदां भेटून येईन. चार आठ दिवसांची रजा द्या. ' त्या हंसून म्हणाल्या, ' पुन्हां येशिल ना परत ? ' जायच्या दिवशीं हळूच हातांत एक पुरचुंडी ठेवून दिली आणि म्हणाल्या, ' रतन चुलत्याबरोबर भांडणतंटा करूं नकोस बाबा. तुझं जें कांहीं गेलंय तें पुन्हां विकत घे. ' पुरचुंडी उघडून पहातों तों आंत पांचशें रुपये. डोळ्यांवर विश्वास बसेना. स्वप्नांत तर नाहीं ना मीं, असं वाटलं. त्या आमच्या बाईना आतां बंकू वांकडीतिकडीं नांवं ठेवूं लागलाय. आडआडोशाला कुचुकुचु बोलत असतो. मी म्हणतों, आतां फार दिवस नाहींत. लक्ष्मी पाठ फिरवूं लागली आहे नुकतीच. '

मला ही कल्पनाच नव्हती. मी मुकाट्यानं ऐकत होतों.

मला वाटलं, बरेच दिवस रतन रागानं धुमसत राहिलेला असावा.

तो म्हणाला, " बाईचा स्वभावच असा. देतील तेव्हां घे घे म्हणून देतील. बंकूलाही त्यांनीं दिलं. म्हणूनच त्या बेट्याला वाटलं, कीं दिलं दिलं म्हणजे काय दिलं ? म्हणून हें असं चाललंय. पण तें त्याचं कुठं होतं ? त्या मुर्खाला एवढं कळत नाहीं, कीं अंगावरचा एक दागिना विकला तर बाई अशीं पाच घरं उभीं करतील.'

मला हें माहित नव्हतं. मी हंसून म्हटलं, " असं का ? पण आहेत कुठं हे दागिने ? "

रतनदेखील हंसला, म्हणाला, " त्यांच्याकडेसच आहेत, इतक्या खुळ्या नाहींत बाई. सारं कांहीं धुऊन काढतील तर केवळ एक आपल्यासाठीं. दुसऱ्या कुणासाठीं नव्हे. आपण आहांत तोंवर बाईना आश्रयाचा अभाव नाहीं हें बंकूला माहित नाहीं. अन् रतन जिवंत आहे तोंपर्यंत म्हणावं नोकरचाकरांचीही जरुर नाहीं. त्या दिवशीं आपण काशीहून आलांत—आपल्याला असंच जावं लागलं तें बाईच्या जिवाला किती लागलंय !—त्याची कदर बंकूबाबूला कुठं आहे ? अन् त्या गुरुजींनाही कुठं अंदाज आहे त्याचा ? "

" पण रतन, तूं स्वतःच पाहिलंस त्या दिवशीं, कीं तिनं स्वतः होऊनच मला निरोप दिला. "

रतन जीभ चावून ओशाळून पाहूं लागला. तो इतका ओशाळल्याचं पूर्वीं मी कधींच पाहिलं नव्हतं. तो म्हणाला, " बाबू, आम्हीं नोकर माणसं. हें असलं कांहीं ऐकवत नाहीं आम्हांला. तें खोटं आहे. "

तशीच वेळ मारून नेऊन रतन आडवा होण्यासाठीं निघून गेला. उद्यां

आठापर्यंत झोंप मिळाल्याशिवाय तो माणसांत आला नसता.

दोन महत्त्वाच्या बातम्या कळल्या. पहिली ही, कीं बंकू आतां मोठा झाला. पाटण्याला त्याला मी पहिल्यानं पाहिलं त्यावेळीं तो सोळा वर्षांचा होता. आतां त्याला हें एकवीसावं वर्ष. या पांचसहा वर्षांच्या मुदतींत तो शिकूनसवरून माणसांत आला होता. ती पोरपणची कृतज्ञता आणि आजचा तारुण्यांतला स्वाभिमान यांच्यांत आतां मेळ राहिला नाहीं यांत आश्चर्य कसलं ?

दुसरी बातमी,—राजलक्ष्मीच्या अंतरंगांत जी भयंकर खळबळ चालली होती तिचा पत्ता बंकूलाही नाहीं कीं गुरुजीलाही नाहीं.

या दोनच गोष्टींमुळं किती तरी वेळ मला भंडावून सोडलं होतं.

अगदीं व्यवस्थित रीतीनं केलेलीं सिलं पाहून घेऊन मी लिफाफा खोलला. बरेच दिवसांत तिचं हस्ताक्षर माझ्या नजरेसमोर आलं नव्हतं. पूर्वी तें अगदींच गिचमिड नसलं तरी चांगलंसं नव्हतं खास. पण हें पत्र मात्र मोठं काळजीपूर्वक लिहिलं होतं. अक्षर चांगलं नाहीं म्हणून मी वाचणार नाहीं या भीतिमुळं तिनं काळजी घेतली असावी. अगदीं सहज वाचतां येईल इतकं सुवाच्य लिहिलं होतं.

आचारविचाराच्या दृष्टीनं राजलक्ष्मी जुन्या काळची होती. प्रणयनिवेदनाचा फाजील देखावा तर दूरच राहो पण प्रेम हा शब्दसुद्धां तिनं कधीं माझ्यासमोर उच्चारल्याचं मला आठवत नव्हतं. तिनं लिहिलेलं हें पत्र,—मी विचारलं त्याबद्दल कदाचित् संमतीही दिली असेल. पत्रांत काय होतं कोण जाणे ! वाचूं नये असं वाटत होतं.

लहानपणची आठवण झाली. त्यावेळीं तिचं सारं शिक्षण पंतोजीच्या शाळेंत झालं होतं. पुढं घरीं बसल्याबसल्या तिनं साधारण लिहिणंवाचणं केलं होतं. अर्थात् भाषेची जादू, शब्दाचा झंकार, वाक्यरचनेचं माधुर्य तिच्या पत्रांत असेल अशी आशा करणं व्यर्थ होतं. रोजच्या सरावाच्या भाषेंतल्या चार उण्याअधिक शब्दानं मनाच्या गोष्टी सांगण्यापलीकडे ती अधिक काय करणार होती ?

नुसतं मी विचारलं त्याला संमति द्यायची, त्याच्यासाठीं हें दोन पानं पत्र कशाला ? पण घडी उघडून वाचूं लागलों तेव्हां बाहेरच्या जाणिवेची सारी आठवण बुजून गेली.

पत्र मोठं नव्हतं. पण लिहिण्याची शैली तितकी सहज आणि सरळ नाहीं असंच मला वाटलं. माझ्या पत्राला तिनं असं उत्तर दिलं होतंः—

श्री काशिक्षेत्र.

शिरसाष्टांग नमस्कार. दासीची विज्ञापना तुमचं पत्र आतांपर्यंत शंभर वेळ वाचलं. पण वेड तुम्हांला लागलंय कीं मला हेंच मला कळेना. अगदीं सहज तुम्हीं माझ्या पकडींत आलांत असं कां तुम्हांला वाटतं ? उचलून घेतलं नाहीं तुम्हांला— अनेक कष्टांनीं, अनेक आराधनांनीं मी तुम्हांला धरून ठेवलंय. आतां सुटून जायचा अधिकार तुम्हांला नाहीं. माझा त्याग करायचा मालकी हक्क तुमच्या हातीं नाहीं.

फुलांच्या अभावीं जंगलांतल्या करवंदीच्या फळांची माळ गुंफून लहानपणीं केव्हां तरी मी तुम्हांला वरलं ते तुम्हीं विसरलां. हाताला कांटे लागून करवंदीचीं फळं माझ्या रक्तानं तांबडीं झालीं होतीं पण रंगांत रंग तुम्हीं ओळखला नाहीं. बालबुद्धीनं पूजेचं अर्घ्य तुमच्या गळीं वाहिलं. तुमच्या हृदयावर रक्ताच्या शाईनं जो लेख मी लिहिला तो तुमच्या नजरेला दिसला नाहीं पण ज्याच्या नजरेंतून या जगांतलं कांहीं सुद्धां दिसायचं चुकत नाहीं, त्याच्या पायीं माझा तो दस्तऐवज रुजू झाला आहे.

त्यानंतर कुयोगाची रात्र आली. माझ्या आकाशांतल्या चांदण्याआड काळे ढग आले. पण ती त्यावेळची मीच कीं दुसरी कोण ? या आयुष्यांत खरोखरच असं कांहीं घडलं होतं का ? झोंप नसतांना पाहिलेल्या त्या स्वप्नाबद्दल विचार करतांना मला असं वाटे, कीं मला वेड लागलं. सारं कांहीं विसरून ज्याचं मी ध्यान करायला बसतें त्याचं नांव घेतां येत नाहीं. त्याचं नांव कुणाला सांगतां येत नाहीं. त्याची क्षमा ती माझ्या परमेश्वराची क्षमा. हा भ्रम नाहीं—संशय नाहीं या बाबतींत मी अगदीं निर्भय आहें. हो ! मी म्हणत होतें, त्यानंतर माझी काळरात्र आली. दोन्हीं डोळ्यांतला प्रकाश कलंकानं फुंकर घालून विझवला. पण हीच का माणसाची खरी पारख ? त्या सारख्या चालू राहिलेल्या थकव्याच्या पांघरुणाबाहेर दुसरं कांहीं नव्हतंच का ?

आहे ! सारख्या चुक्या होत होत्या. पण त्यांतूनच मधून मधून पुन्हां पुन्हां त्याचं दर्शन घडत होतं. असं झालं नसतं, झाल्या गेल्या गोष्टींच्या राक्षसानं माझं सारं सौभाग्य जर सर्वस्वीं गिळून टाकलं असतं, तर पुन्हां तुमचा लाभ कसा झाला असता मला ? कुणी तुम्हांला पुन्हां आणून माझ्या हातीं दिलं असतं ?

माझ्यापेक्षां तुम्हीं चार पांच वर्षांनीं मोठे अहांत. पण तुम्हांला जें मानवतं तें मला शोभत नाहीं. बंगाली घरची मुलगी मी, आयुष्यांतलीं सत्तावीस वर्षं गेल्या-

वर आज आतां यौवनावर हक्क सांगत नाहीं. माझ्या म्हणण्याचा विपर्यास करूं नका,—मी कितीही अधम झालें तरी तुम्हांला चुकूनसुद्धां असं वाटलं, तरी त्याची लाजशरम मला नाहीं. बंकू जगो वाचो—तो आतां मोठा झाला—त्याची बायको घरीं आली आहे,—तुम्हीं लग्न केलं तर कोणत्या तोंडानं त्यांच्यासमोर उभी राहूं ? हा अपमान कसा सहन होईल मला ? उद्यां तुमची प्रकृति बिघडली तर तुमच्याकडे कोण पहाणार ? पूंटू का ? आणि मी तुमच्या खोलीच्या बाहेर उभी राहून नोकरचाकराकडून का तुमची खबर विचारूं ? असल्या परिस्थितींत मी जगावं असं का तुम्हीं म्हणतां ?

तुम्हीं असं विचाराल, कीं सारा जन्म असंच का निःसंग रहायचं ? प्रश्न कांहीं असो, याचं उत्तर द्यायचं आहे तुम्हीं, मी नव्हे. पण विचार करून देखील जर तुम्हांला सुचत नसेल, बुद्धी इतकी क्षीण होऊन गेली असेल, तर मी उसनी देईन. तिची परतफेड नको,—पण माझं एवढं ऋण घ्यायचं नाकारूं नका.

तुम्हांला वाटत असेल, कीं गुरुजींनीं मला मोक्षाचा मंत्र दिलाय, शास्त्रांनीं मला पुढला मार्ग दाखवलाय, सुनंदेनं धर्माची प्रवृत्ति दिली आहे, आणि तुम्ही दिलाय नुसता भार नि बोजा. असे आंधळे आहांत तुम्ही लोक !

मी असं विचारतें, माझ्या तेवीसाव्या वर्षी तुमची पुन्हां भेट झाली. पण त्यापूर्वी हीं सारीं होतीं कुठं ? तुम्हांला सारं कांहीं सुचतं आणि हेंच कसं सुचत नाहीं ?

केव्हांतरी एके दिवशीं माझ्या पापाचा शेवट होईल अशी आशा होती—मी निष्पाप होईन ! कां मला अशी आशा वाटली ? स्वर्गासाठीं नव्हे–मला तो नको आहे. माझी कामना एकच—मेल्यानंतर पुन्हां एकदां जन्म मिळावा. याचा अर्थ काय कळला का ?

पाण्याचा प्रवाह चिखलांत मिसळला आहे, तो निर्मळ करण्याचं काम मलाच केलं पाहिजे असं मला वाटलं होतं. पण त्या प्रवाहाचं मूळच जर सुकून जात असेल तर कशाला हवी पूजाअर्चा आणि जपतप ? कशाला हवी सुनंदा अन् कशाला हवेत माझे गुरुदेव ?

इच्छामरण मला नको आहे. पण माझा अपमान करायचा जर तुमचा बेत असेल तर ती तेवढी दुर्बुद्धी सोडून द्या. तुम्हीं विष दिलं तरी तें मी घेईन, पण तें घेणं मला कठीण जाईल. मला तुम्हीं ओळखतां म्हणूनच मी सांगून ठेवतें, कीं जो सूर्य मावळणार आहे तो पुन्हां केव्हां उगवेल म्हणून वाट पहात बसायला

मला आतां अवधी मिळणार नाहीं. इति—

राजलक्ष्मी

सुटलों एकदांचा ! निश्चित स्वरूपांत लिहिलेला हा कडक हुकूम लिहून पाठवून तिनं मला एकदाचं निश्चित केलं. आतां यापुढं विचार करायची जरुरीच राहिली नाहीं. काय करायचं नाहीं तें आतां मला निःसंशयपणें कळलं. पत्र यापुढं मी काय केलं पाहिजे या बाबतींत राजलक्ष्मीनं कांहींच लिहीलं नव्हतं. कदाचित् आणखी एक उपदेशपर पत्र एकादे दिवशीं ती लिहिल किंवा मलाच जातीनं हजर व्हायला सांगेल. पण एकंदरींत जी कांहीं व्यवस्था करण्यांत आली ती मोठी विलक्षण होती खरी.

इकडे आमचे आजोबा कदाचित् उद्यां येऊन हजर होतील. वचन देऊन आलों असल्यामुळं काळजीचं कारण नव्हतं. अनुमति मिळायला अडथळा येणार नव्हता. पण जें कांहीं हातीं आलं तें बिनतक्रार अनुमतीच्याच स्वरुपाचं होतं यांत शंकाच नव्हती. रतन न्हाव्याच्या हातीं तिनं अहेराचे जिन्नस पाठवले नाहींत हेंच भाग्य !

त्या तिकडे माझ्या गांवीं लग्नाची तयारी जोरांत चालली असेल. पुंटूचे आप्तइष्ट कदाचित् इतक्यांत येऊन पोंचलेही असतील आणि उपवर झालेली बिचारी मुलगी इतक्यांत लोकनिंदेपासून बचावली जाऊन उजळ माथ्यानं वावरतही असेल.

आजोबांना काय सांगायचं तें ठरलं होतं. पण तें कसं सांगायचं हेंच मला सुचेना. त्यांचा कडक तगादा आणि त्यांनीं निर्लज्जपणें टाकलेला डाव—त्यांचीं ती उसनी उचापत ध्यानीं येऊन माझं हृदय भरून आलं. ते आले आणि निराश होऊन तसेच परत गेले तर जमलेला गोतावळा बिचाऱ्या पोरीचा आणखी छळ करील, हें ध्यानीं येऊन माझ्या हृदयाला बाण बसला. पण उपाय काय ? बिछान्यावर पडलों खरा पण सारी रात्र डोळा लागला नाहीं. पुंटूची हकिकत विसरायला वेळ लागला नाहीं—पण सारखी जी मनांत येत होती ती गंगामाटीची हकिकत. तुरळक वस्तींच्या त्या छोट्या खेड्यांतल्या आठवणी विसरणं शक्य नव्हतं. माझ्या या आयुष्यांतल्या गंगायमुनांचा संगम एके दिवशीं याच ठिकाणीं झाला होता आणि याच ठिकाणीं तो झालेला संगम कांहीं काळ जोडीनं वाहिल्यावर पुन्हां फुटून विभागला होता. थोडाच काळपर्यंत एकत्र राहिलेले हे दिवस मोठे श्रद्धेचे, मधुर स्नेहाचे, उज्ज्वल आनंदाचे आणि

शिवाय तिथल्या जीवनासारखेच निःशब्द वेदनेच्या निस्सीम स्तब्धतेचे होते. दोघे दोन बाजूला व्हायच्या दिवशीं कुणीच कुणाला वंचनेच्या आरोपानं डाग द्यायचा प्रयत्न केला नाहीं. नफ्यातोट्याच्या निष्फळ वादविवादानं गंगामाटीच्या शांत घरकुलाला आम्हीं धुरकट केलं नाहीं. तिथल्या सर्वांना असंच वाटत होतं, कीं आम्ही पुन्हां परत येणार, पुन्हां आमचा आनंदाचा खेळ सुरू होणार, पुन्हां मालकिणीची दीनदुबळ्याची सेवा आणि सत्कार सुरू होणार.

पण तो अंदाज आतां संपला. प्रभातकाळीं फुललेली मल्लिका दिवसाच्या शेवटाची आज्ञा पाळून आतां मुक्त झाली आहे, हें त्या बिचाऱ्यांच्या स्वप्नांतही आलं नसावं.

डोळ्याला झोंप नव्हती. पेंगुळलेली रात्र पहांटेच्या बाजूला जसजशी झुकूं लागली तसतसं वाटूं लागलं, कीं ही रात्र संपणारच नाहीं का ? केवळ एवढ्या एकाच काळजीनं मीं जसा कांहीं भारावून गेलों होतों,

पूर्वीच्या गोष्टी पुन्हापुन्हा आठवत होत्या. बीरभुम जिल्ह्यांतील ती छोटी झोंपडी पुन्हां पुन्हां भूतासारखी माझ्या समोर उभी रहात होती. घरकामांत सारख्या दंग झालेल्या राजलक्ष्मीचे दोन्ही नाजुक हात डोळ्यासमोर स्पष्ट दिसत होते. समाधानाचा असला आनंद या जीवनांत कधीं अनुभवल्याचं मला आठवेना.

आजवर अंदाज घेत होतों पण अंदाज मिळत नव्हता. राजलक्ष्मीचा सर्वांत मोठा दुबळेपणा कुठं होता त्याची कल्पना आज आली. माझी प्रकृति कायमचीच बरी नाहीं हें तिला माहित होतं. ज्यावेळीं मी आजारी पडेन त्यावेळीं कुठली कोण एक पुंटू माझ्या बिछान्यालगत सारा दिवस बसून राहील, राजलक्ष्मीला कांहीं करूं देणार नाहीं. असलं हें संकट मनांत आणणं सुद्धां तिला कठीण जात होतं. जगांत वाटेल तो स्वार्थत्याग तिनं केला असता पण असं होणं अशक्य— अगदीं असाध्य होतं ! त्यापुढं मरणाचीसुद्धां तिनं पर्वा केली नसती ! गुरुदेवालाही गुंडाळून ठेवलं असतं. व्रतंवैकल्यं, जपतप उधळून लावले असते. पत्रांत तिनं जें लिहिलं होतं त्यांत एवढंसुद्धां खोटं नव्हतं.

पहांटेच्या सुमारास मला झोंप लागली. रतनच्या हांकेनं जागा झालों तेव्हां दिवस बराच वर आला होता. कुणी म्हातारा गृहस्थ घोड्याच्या गाडींतून आला आहे असं त्यानं सांगितलं.

हे आजोबाच ! पण भाड्याची गाडी करून ? मला शंका आली.

त्यांच्याबरोबर एक सतरा अठरा वर्षांची मुलगी आहे असं रतन म्हणाला.

ही पुंटूच ! या निर्लज्ज माणसानं तिला कलकत्त्याला माझ्या घरीं खेंचून आणली ?

सकाळचं कोवळं ऊन मला उदासवाणं वाटूं लागलं.

मी म्हटलं. "त्यांना या खोलींत आणून बसव रतन. मी जरा हाततोंड धुऊन येतों —" असं म्हणून मी खालच्या आंघोळघरांत निघून गेलों.

एक तासभऱ्यानं मी परत आलों तेव्हां आजोबांनीं माझंच स्वागत केलं जसा कांहीं मीच पाहुणा. म्हणाले, "या दादा या, प्रकृतिविकृति खुशाल ?"

मी नमस्कार केला. हांका मारीत आजोबा म्हणाले, "अरे ही पुंटू गेली कुठं ?"

खिडकीजवळ उभी राहून पुंटू रस्त्याकडे पहात होती. तिनं येऊन मला नमस्कार केला.

आजोबा म्हणाले, "लग्नापूर्वी एकदां तिला पहावं असं तिची आत्याबाई म्हणाली. आत्याबाईचा नवरा न्यायाधीश आहे. दरमहा पांचशें रुपये मिळवतो. डायमंड हार्बरला त्याची बदली झाली आहे. घरसंसार टाकून हिची आत्या येणार कशी ? म्हणून हिला बरोबर घेऊन आलों. म्हटलं दुसऱ्याच्या हातीं द्यायच्या पूर्वी एकदां हिला दाखवून आणावी. तिच्या आत्याबाईंनीं आशिर्वाद देऊन म्हटलं, पुंटू, असलंच भाग्य तुला लाभो बाई !"

मला बोलायला अवसर न देतां तेच म्हणाले, "पण मी त्यांना असा सोडतों आहें थोडाच ? न्यायाधीश असो कीं कुणिही असो, नात्याचा तर खरा ? उभा राहून त्याच्याकडून कार्य साजरं करून घेईन तेव्हांच सोडीन. तुला माहित आहेच दादा शुभ कार्याला फार विघ्न असतात. शास्त्रानं काय म्हटलं आहे ? 'श्रेयांसि बहु विघ्नानि.' असला माणूस उभा असला कीं फट् म्हणायची सुद्धां कुणाची छाती व्हायची नाहीं. आमच्या खेडेगांवच्या लोकांचा कांहीं भरंवसा नाहीं. ते काय वाटेल तें करतील. पण हा न्यायाधीश आहे—त्याची गोष्टच न्यारी !"

पुंटूच्या आत्याचा नवरा न्यायाधिश होता एकूण ! अगदींच अवांतर गोष्ट नव्हती ही ! त्यांत तात्पर्य होतं.

नवी गुडगुडी विकत आणून तंबाखू भरून द्यायला रतन गेला तेव्हां आठवण करीत करीत आजोबा म्हणाले, "या माणसाला कुठं तरी, केव्हांतरी पाहिल्यासारखं वाटतं, नाहीं ?"

रतन चटकन म्हणाला, "जी हो, पाहिलं आहे तर ! बाबू आजारी होते तेव्हां

गांवीं आलों होतों त्यांच्याबरोबर. ”

“ हो ! हो, तरीच मी म्हणत होतों. चेहरा ओळखीचा वाटला. ”

‘ जी हां ’ म्हणून रतन निघून गेला.

आजोबांचा चेहरा फार गंभीर झाला. मूळचाच मोठा धूर्त माणूस—त्याला ती पूर्वीची सारी हकिगत आठवली असावी. मुकाट्यानं गुडगुडी ओढीत कांहीं वेळानं ते म्हणाले, “ यायच्या वेळीं शुभमुहुर्त पाहून आलों होतों. तो फार चांगला दिवस होता. मी असं म्हणत होतों, वडील माणसांचा आशिर्वाद घ्यायच्या पूर्वी आधीं बाकीचीं कामं उरकून घेऊं. नतुनबाजारांत सारे जिन्नस मिळतात. नोकराला पाठवून देऊन भागेल कीं नाहीं ? कसं ? ”

काय उत्तर द्यावं हें मला सुचेना. मी कसं बसं बोलून टाकलं, “ नाहीं. ”

“ नाहीं कसं ? बारा वाजेपर्यंत वेळ शुभ आहे. पंचांग आहे ? ”

“ पंचांगाची जरूरी नाहीं. ” मी म्हटलं, “ मला लग्न करणं शक्य नाहीं. ”

भिंतीला टेकून आजोबांनीं गुडगुडी ठेऊन दिली. त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिलं त्यावेळीं मला वाटलं, कीं ते लढाईची तयारी करीत होते. खांकरून खोकून घसा साफ केल्यावर ते म्हणाले, “ सारी कांहीं तयारी एकप्रकारें होऊन चुकली आहे. मुलीच्या लग्नाची बाब ही ! थट्टा मस्करीची गोष्ट नव्हे ही. एकदां वचन दिल्यावर आतां नाहीं म्हणून कसं चालेल ? ”

पाठ फिरवून पुंटू खिडकीबाहेर पहात होती. रतन दाराला कान लावून ऐकत असावा खास.

मी म्हटलं, “ वचन दिलं असं कांहीं नव्हे, मलाही माहित आहे—तुम्हांलाही माहित आहे. एकजणाची संमति दिली तर माझी कबुली आहे असं मी म्हटलं होतं. ”

“ मग संमति मिळाली नाहीं ? ”

“ नाहीं. ”

एक क्षणभर थांबून आजोबा म्हणाले, “ सारं कांहीं मिळून हजार रुपये द्यायची पुंटूच्या बापाची तयारी आहे. तशीच जिद्द केली तर शें-दोनशें वाढवीलही. आतां तुझं काय म्हणणं आहे ? ”

खोलींत येऊन रतन म्हणाला, “ पुन्हां तंबाखू भरून देऊं का ? ”

“ दे तर ! तुझं नांव काय रे ? ”

" रतन. "

" रतन ? छान नांव आहे. घर कुठं तुझं ! "

" काशीला. "

" काशीला काय ? हल्लीं बाई काशीलाच असते वाटतं ? काय करते तिकडे ?"

रतन, चिडून म्हणाला, " त्याची उठाठेव आपल्याला कशाला ? "

आजोबा हळूच हंसून म्हणाले, " असा रागावतोस कां बाबा ? यांत रागावण्याजोगं काय आहे ? गांवची मुलगी म्हणून तिची पुसतपास करायची. कुणी सांगावं, उद्यां तिच्याच तिकडे जाऊन रहावं लागायचं. खुशाल आहे ना ? "

कांहींच उत्तर न देतां रतन निघून गेला आणि एक दोन मिनिटांत चिलमीला फुंकर घालीत ती गुडगुडीवर ठेवून गुडगुडी आजोबांच्या हातीं देऊन जायला निघाला. जोरांत एक दम मारून आजोबा उठून उभे राहिले आणि म्हणाले, " जरा थांब ना बाबा. संडास कुठं आहे तेवढा दाखव ना ? सकाळचं निघावं लागलं होतं ना ! "

बोलत बोलत घाईघाईनं रतनच्या पुढं मजल मारून ते खोलीबाहेर निघून गेले.

माझ्याकडे वळून पाहून पुंटू म्हणाली, " आजोबाचं बोलणं हिशेबांत घेऊं नका. माझे बाबा हजार रुपये कुठून आणणार आहेत ? आक्काचं लग्न करतांना दुसऱ्याचे दागिने आणून वेळ भागवली. आतां ते आक्काला सासरीं नेत नाहींत. मुलाचं दुसरं लग्न करून देऊं म्हणून म्हणतात—"

यापूर्वी माझ्यासमोर एवढं बोलायचं धैर्य पोरीनं कधींच केलं नव्हतं. मला आश्चर्य वाटलं. मी म्हटलं, " हजार रुपये देणं खरोखरच तुझ्या बाबांना शक्य नाहीं का ? "

मान हालवीत पुंटू म्हणाली, " मुळींच नाहीं. बाबांना रेल्वेवर नोकरी आहे. महिना चाळिस रुपये मिळतात. फीला पैसे नाहींत म्हणून माझ्या धाकट्या भावाला शाळेंतून काढावं लागलं. बिचारा सारखा रडत असतो—" बोलतां बोलतां तिचे डोळे एकदम भरून आले.

मी विचारलं, " पैशाच्या पायींच तुझं लग्न अडून राहिलं आहे का ? "

" होय तर काय ? " पुंटू म्हणाली, " आमच्या गांवच्या अमुल्यबाबूंचं स्थळ बाबांनीं माझ्यासाठीं ठरवलंय. माझ्यापेक्षां सुद्धां मोठ्या मुली आहेत त्यांच्या. विहिरींत जीव देतें म्हणून आई म्हणाली तेव्हां तो संबंध मोडला. आतां, मला वाटतं, बाबा कुणाचं ऐकणार नाहींत. तिथंच देऊन टाकतील मला. "

मी म्हटलं, " पुंटू, मी पसंत आहे का तुला ? "

लाजून मान खालीं घालून पुंटूनं हळूच होकार दिला.

" पण मी तर तुझ्यापेक्षां चौदापंधरा वर्षांनीं मोठा आहें ! होय ना ? "

पुंटूनं या प्रश्नाचं उत्तर दिलं नाहीं.

मी विचारलं, " दुसरं कुठलं चांगलंसं स्थळ हेरलं आहे का ? "

" होय तर, " पुंटू माझ्याकडे पहात खुषींत येऊन म्हणाली, " आमच्या गांवचे कालिदास बाबू आहेत ना, त्यांचा धाकटा मुलगा बी. ए. झालाय. माझ्यापेक्षां चार दोन वर्षांनं मोठा आहे. त्याचं नांव शशधर. "

" तो पसंत आहे का तुला ? "

पुंटू खुद्‌कन हंसली.

मी म्हटलं, " पण शशधरला तूं पसंत नसलीस तर ? "

" असं कुठं झालं " पुंटू म्हणाली, " सारखा आमच्या घरावरून फेऱ्या घालीत असतो. रंगाआक्का थट्टेनं म्हणते, कीं तो फेऱ्या घालतो माझ्यासाठीं !"

" मग हें स्थळ कां जमलं नाहीं ? "

पुंटूचा चेहरा एकदम पडला. ती म्हणाली, " त्याचा बाप हजार रुपयांचे दागिने आणि हजार रुपये रोख पाहिजेत म्हणून दातीं धरून बसला आहे. शिवाय पांचशें रुपये तर खर्चाला लागतील. थोरामोठ्यांच्या घरीं असतं तर शोभलं असतं. खरं कीं नाहीं ? आम्हीं गरीब माणसं, ते मोठे लोक—मोठे पैसेवाले आहेत. माझी आई त्यांच्या घरीं जाऊन हातापाया पडली पण त्यांनीं कानीं घेतलं नाहीं. "

" शशधर कांहीं बोलला नाहीं का ? "

" नाहीं. तो काय बोलणार ? तो कांहीं मोठा माणूस नाहीं—शिवाय आई-बाप समोर आहेत. "

" असं तर खरंच. शशधरचं लग्न होऊन गेलं का ? "

अस्वस्थ होऊन पुंटू म्हणाली, " नाहीं, अजून झालं नाहीं. पण लवकरच होणार आहे वाटतं. "

" ठीक आहे. पण समज, तुझं तिथं जुळलं—अन् लग्न झाल्यावर त्यांनीं तुला चांगल्या रीतीनं वागवलं नाहीं—तर ? "

" मला ! मला कां चांगलं वागवणार नाहींत ? मला सैंपाक येतो, शिवणंटिपणं

येतं, संसारातलीं सारीं कामं येतात. त्यांचा सारा संसार मी एकटी सांभाळीन."

बंगाल्याच्या घरच्या मुलीला यापेक्षां जास्त काय येणार होतं ? इतर उणिवा भरून काढण्यासाठीं बंगाली मुलीनं फार तर आपल्या आंगाची ताकद खर्ची घातली असती. मी विचारलं, " सारं घरकाम उरकाम उरकेल तुला ? "

" हो उरकेल तर. "

" तर मग असं कर, तुझ्या आईला जाऊन सांग, कीं श्रीकांतदादा अडीच हजार रुपये पाठवून देतील. "

" आपण द्याल ? झालं तर ! पण लग्नाच्या दिवशीं याल ना ? "

" हो ! येईन तर ! "

दाराबाहेर आजोबाचा शब्द ऐकूं आला. धोतराच्या सोग्यानं तोंड पुशीत पुशीत आंत येत ते म्हणाले, " संडास मोठा छान आहे बुवा ! झोंपावंसं वाटलं तिथं. कुठं गेला रतन ? गुडगुडी भरून आण म्हणावं ! "

## ४

माणसाला योग्य उपदेश देण्यापासून कोणताच फायदा होत नाहीं, असंच या जगांत आपण सदोदित पहात असतों. कुणाच्या हिताची गोष्ट सांगितली तर कुणी ऐकत नाहीं. खरं बोललं तर नशिबाची उलटी ठोकर बसते.—ती हकीकत सांगणार आहे.

आजोबांनीं दांत बाहेर काढून आशिर्वाद दिला. मोठ्या खुषींत येऊन त्यांनीं माझा निरोप घेतला. पुंटूनं पुन्हां पुन्हां मला नमस्कार करून माझं सांगणं ऐकलं—पण ते निघून गेल्यानंतर माझ्या पश्चात्तापाला सीमा राहिली नाहीं. मन कसं भडकून उठलं. परदेशीं जाऊन अत्यंत क्लेश सोसून नोकरी केली आणि जें कांहीं थोडं संग्रहीं टाकलं तें सारंच देऊन टाकायचं का ? लहर आली म्हणून बोलून गेलों. आणि नुसतं बोलून गेलों म्हणून कर्णाचं दातृत्व दाखवायचं याचा अर्थ काय ? कुठली कोण एक कार्टी सहज गाडींत भेटते काय ! आणि पेढे आणि दहीं चारून मला भलत्या फंदांत पाडते काय ! एक फास कापून काढतांना दुसरा फास अडकवून घेऊन बसलों. यांतून सुटावं कसं याचा विचार करतांना माझं डोकं तापून गेलं. त्या गरीब बिचाऱ्या पोरीचा मला निष्कारण राग येत होता—चीड येत होती.

आणि हा सैतान आजोबा ! असं वाटूं लागलं, कीं हा माणूस घरीं पोंचायच्या

पूर्वी वाटेंतच कांहीं तरी होऊन मरेल तर बरं. पण ही आशा व्यर्थ होती. कांहीं केल्या तो मरणार नाहीं आणि आतां माझ्या घरचा पत्ता मिळाल्यामुळं पुन्हां माझ्या पिच्छाला बसेल आणि वाटेल तें करून रक्कम माझ्याकडून वसूल करील ! कदाचित् त्या नातेवाईक जज्जालाही घेऊन येईल !

आतां एकच उपाय—यःपलायन ! तिकिट काढायला गेलों, पण बोटीवर जागा नव्हती—सारीं तिकिटं आधल्या दिवशींच विकलीं गेलीं होतीं. अर्थात् दुसऱ्या मेल बोटीची वाट पहात रहाणं भाग होतं. आणखी सहासात दिवस बाट पहावी लागणार.

आणखी एक मार्ग—बिऱ्हाडाची जागा बदलणं—आजोबांना पत्ताच लागूं नये. पण चट्कन् अशी जागा मिळणं इतक्या लवकर व्हावं कसं ? बऱ्यावाईटाचा फारसा विचार न करतां—यथाऽरण्यं तथा गृहम्—कसलंही घर ठरवून या व्याधाच्या हातून प्राण बचावण्याचा प्रसंग होता. माझा हा चोरटा व्यवहार रतनच्या नजरेला येईल याची भीति वाटत होती. पण तो निघून जायला नाराज होता. काशीपेक्षां त्याला कलकत्ताच आवडला होता. मी म्हटलं, " पत्राचं उत्तर घेऊन तूं उद्यां जावं म्हणतो ना रतन ? "

" जी नाहीं. " रतननं चट्कन् जबाब दिला, " आज दुपारींच बाईना एक पोस्टकार्ड पाठवून कळवलं आहे, कीं यायला चार पांच दिवस उशीर होईल. मेल्यांची सोसायटी, जित्यांची सोसायटी पाहिल्याशिवाय आतां जाणार नाहीं. पुन्हां इकडे केव्हां येतां येईल तें कुठं सांगतां येणार आहे ? "

मी म्हटलं, " पण ती तिकडे काळजी करीत असेल—"

" जी नाहीं. गाडीचा त्रास फार झाला आहे, अजून बरं वाटत नाहीं, असं लिहून कळवलं आहे. "

" पण पत्राचं उत्तर—"

" जी, द्या ना ! उद्यांच रजिस्टर करून पाठवून देतों. बाईचं पत्र उघडायची तिथं कुणाची छाती आहे ? "

स्वस्थ बसून राहिलों. या न्हाव्यापुढं माझी कांहींच मात्रा चालेना. जें म्हणावं तें खोडून काढीत होता.

जायच्या वेळीं माझ्या देणगीबद्दल आजोबांनीं डांगोरा पिटला होता. कुणालाच कांहीं संशय राहूं नये अशी व्यवस्था त्यांनीं केली होती—साक्षी तयार करून

ठेवले होते.

रतननं तोच विषय काढला. तो म्हणाला, " आपल्याला राग येणार नाहीं तर कांहीं विचारणार आहे बाबू. "

" काय विचारणार आहेस रतन ? "

रतनचं मन द्विधा झालं होतं. क्षणभर थांबून तो म्हणाला, " अडीच हजार रुपये म्हणजे कांहीं थोडी रक्कम नव्हे. कुठले कोण लोक, त्यांच्या पोरीच्या लग्नासाठीं एवढी रक्कम द्यायचं आपण कबूल केलं ! आजोबा असो कीं कुणी असो, तो माणूस एकंदरींत कांहीं भला दिसत नाहीं. त्याच्याकडे बोललांत हें बरं केलंत नाहीं बाबू. "

त्याचं हें मत ऐकून मला अत्यंत आनंद झाला. त्यांतल्या त्यांत मला थोडा जोर आला—कुणीतरी हेंच सांगितलं पाहिजे होतं.

तरीही आवाजांत थोडा संशयाचा आभास होईल अशा रीतीनं मी म्हटलं, " तसं म्हटलं हें बरोबर झालं नाही—नाहीं रतन ? "

" मुळींच नाहीं बाबू—" रतन म्हणाला, " रक्कम कांहीं थोडीथोडकी नव्हे. शिवाय कुणासाठीं द्यायची ही ? "

" तें खरंच. " मी म्हटलं, " तर मग न देणंच बरं, नाही ? "

आश्चर्यचकित होऊन क्षणभर माझ्याकडे पहात रतन म्हणाला, " तो थोडाच सोडील तुम्हांला ? "

" न सोडून करणार काय ? " मी म्हटलं, " लेखी लिहून तर दिलं नाहीं. शिवाय मी इथं रहातों कीं ब्रह्मदेशला जातों, तें तरी कुठं निश्चित आहे. "

कांहीं वेळ स्वस्थ राहून थोडंसं हंसून रतन म्हणाला, "म्हाताऱ्याला आपण अजून ओळखलं नाहीं बाबू. त्याला लाजलज्जा, मानअपमान काहींसुद्धां नाहीं. रडून, ओरडून, भीक मागून, नाहींतर तंबी देऊन—वाटेल त्या रितीनं जुलुम-जबरदस्ती करून तो पैसे उकळल्यावांचून रहायचा नाहीं. आपली भेट झाली नाहीं तर पोरीला घेऊन काशीला जाईल आणि बाईकडून पैसे वसूल करील तेव्हां सोडील. तिला बिचारीला मरणप्राय दुःख होईल बाबू ! असं कांहीं होतां नये !"

मी सुन्न होऊन स्वस्थ बसलों. माझ्यापेक्षां रतन जास्त बुद्धिवान खरा. भावनेच्या भरी पडून भूतदया दाखवायाचं आणलेलं अवसान खरं करण्यासाठीं आतां दंड देणं भाग होतं. दुसरा उपायच नाहीं.

खेडवळ आजोबाची रतननं जी परीक्षा केली होती ती अगदीं अचुक होती. चौथ्याच दिवशीं ते येऊन हजर झाले. मला वाटलं होतं, येतांना त्या जज्जाला बरोबर आणतील. पण एकटेच आले. ते म्हणाले, "आजुबाजूच्या दहा गांवांत केवढी कीर्ती झालीय तुझी दादा! सारे म्हणताहेत कलिकालांत असा माणूस मिळणं कठीण. गरीबाच्या पोरीला अशा रीतीनं उजवून टाकल्याचं कधीं कुणी देखलं नाहीं. आशिर्वाद देतों—चिरंजीव हो बाबा."

मी विचारलं, "लग्न कधीं आहे?"

"या महिन्याची पंचवीस तारीख नक्की केली आहे. आतां सारे दहा दिवस राहिले. उद्यां शेवटचं पहाणं—साखरपुडा वगैरे होणार आहे. तीन वाजल्यानंतर वेळ चांगली नाहीं; म्हणून त्याच्या आधींच सारं शुभकर्म उरकून घेतलं पाहिजे. पण तुम्ही आलां नाहींत तर सारंच बंद राहिल. कुणालाच कांहीं करतां यायचं नाहीं. हें पहा, पुंटूनं स्वतः पत्र लिहून दिलं आहे. पण मी तुम्हांला सांगतों दादा; हें असलं रत्न हातचं घालवून चूक केलीत. तिच्या तोडीची दुसरी पोर मिळायची नाहीं." असं म्हणून घडी केलेला एक पिवळा कागद त्यांनीं माझ्या हातीं दिला.

नुसता चौकसपणा म्हणून उघडून वाचूं लागलों. एक मोठा सुस्कारा सोडून आजोबा म्हणाले, "कालिदासबाबू पैसेवाला खरा पण अगदींच हलकट—म्हारडा! डोक्यावर कातडीसुद्धां नाहीं त्याच्या. उद्यांच्या उद्यांच सगळी रक्कम चुकती केली पाहिजे. दागदागिने आपल्याच सोनाराकडून करून घ्यायचे म्हणतो आहे. कुणावरच विश्वास नाहीं त्याचा—एवढंच काय, माझ्यावरसुद्धां विश्वास नाहीं!"

काय तरी लबाड माणूस. आजोबावर देखील विश्वास नाहीं म्हणजे काय!

पुंटूनं पत्र स्वतः लिहिलं होतं. एक नव्हे, दोन नव्हे, तब्बल चार पानं खेंचून लिहिलेलीं. चारही पानभर नुसती विनवणी आणि काकुळती. आगगाडींत रंगाआक्का म्हणाली होती तें खरं—आजकालच्याच नाटकनॉव्हेलवर सुद्धां ताण होती. आजकालच्याच काय, कोणत्याही काळांतल्या नाटकनॉव्हेलवर तिनं ताण केली होती हें मला बिलकुल कबूल आहे. याच लेखणीच्या जोरावर नंदराणीचा नवरा चौदा दिवसांची रजा घेऊन सात दिवसांच्या पूर्वींच येऊन पोंचला होता. माझा पूर्ण विश्वास बसला.

अर्थात् दुसऱ्या दिवशीं सकाळीं मीही निघालों. खरोखरच रक्कम बरोबर घेतली होती. उगीच वेळ मारून नेणार नव्हतों. आजोबांनीं आपल्या डोळ्यांनीं पाहून

खात्री करून घेतली होती. ते म्हणाले, "ही प्रवासाची बात्र—पैसे चांगले मोजून घे—व्यवस्थित ठेवून दे—किती झालं तरी आम्हीं माणसं! देवदेवता तर नव्हे, केव्हांच एकादी चूक व्हायची.

खरंच तर! गेल्या रात्रीं रतन काशीला रवाना झाला. पत्राचं उत्तर त्याच्याकडे दिलं होतं. लिहिलं होतं, 'तथास्तु.' पत्ता लिहिला नव्हता. कारण तें तरी कुठं निश्चित होतं. या बाबतींत माफी करावी, असंही लिहून टाकलं होतं.

योग्य वेळीं गांवीं पोंचलों. सर्वांचा जीव खालीं पडला. माझी जी सरबराई चालू झाली तिचं वर्णन करायला कोशांत शब्द नाहीं.

साखरपुडा करण्याच्या बाबतींत कालिदासबाबूबरोबर बोलणं झालं. माणूस जेवढा कोरड्या वृत्तीचा तेवढाच दांभिक! आपण श्रीमंत आहें हें पुन्हां पुन्हां बजावून सर्वांना ठसवून देण्यापलीकडे दुसरं जगांत कांहीं आहे असं त्याला वाटतच नव्हतं जसं.

"सारी कांहीं माझी कमाई आहे!" तो अभिमानानं म्हणाला, "मी कुणावर अवलंबून नाहीं. जें कांहीं करायचं तें या मनगटाच्या जोरावर. देवाधर्मांकडे देखिल मी हात पसरायला जाणार नाहीं. मी म्हणतों, देवाधर्माचं नांव घ्यावं भेकडांनीं."

मोठा माणूस, त्यांतून छोटासा तालुकदार म्हणून, गांवची सारी मंडळी गोळा झाली होती. आले होते त्यांतले बहुतेक सारे महाजन—अगदीं दुर्दांत महाजन—अर्थात् तो म्हणेल त्याला प्रत्येकजण होकार देत होता. तर्करत्नमहाशयांनीं एक संस्कृत श्लोक म्हणून आणि इकडल्या तिकडल्या गोष्टी सांगून त्यांच्यासंबंधीं जुन्या पुराण्या दंतकथा देखील सांगितल्या. मी अपरिचित—त्यांतून सामान्य माणूस—म्हणून माझ्याकडे तुच्छतेनंच बघत होता. हातचा पैसा जाणार म्हणून माझा जीव खालीं वर होत होता. तें त्यांचं धोरण मला सहन झालं नाहीं. मी चट्कन बोलून गेलों, "आपल्या मनगटांत किती जोर आहे तें कांहीं मला माहीत नाहीं. पण पैसे मिळवायच्या बाबतींत नशिबाचा जोर मात्र सर्वांत जास्त असतो, असं मला वाटतं!

"म्हणजे काय?"

मी म्हटलं, "म्हणजे मी स्वतः! वरालाही पाहिलं नाहीं, वधुलाही पाहिलं नाहीं, पण पैसा जातोय माझ्या गांठचा! अन् तो जाऊन पडतोय तुमच्या तिजोरींत. याला जर नशिब म्हणायचं नाहीं तर म्हणायचं काय? आतांच आपण

म्हटलं, कीं आपण देवाधर्मापुढं हात पसरीत नाहीं, पण आपल्या मुलाच्या हातची आंगठी आणि वधूच्या गळयांतल्या मंगळसूत्रापर्यंत तयार होणार आहे तें माझ्या देणगीच्या जोरावर. मधुपर्कापर्यंतचा सारा खर्च मलाच करावा लागणार ! "

घरावर वीज पडली असती तरी देखील कुणी इतके घाबरले नसते. जमलेले सारे लोक अत्यंत अस्वस्थ झाले. आजोबा कांहीं तरी बोलायचा प्रयत्न करीत होते. पण त्यांना चांगलंसं बोलायला जमेना. रागानं संतप्त झालेले कालिदासबाबू भयानक मुद्रा करून म्हणाले, " पैसे तुम्हीं देतां आहां हें मला कसं कळावं ? अन् देता आहां तरी कां म्हणून ? "

मी म्हटलं, " कां देतों आहे तें आपल्याला कळायचं नाहीं नि आपल्याला समजावून द्यायची माझी इच्छाही नाहीं. पण पैसे मी देतों आहें हें गांवच्या म्हारापोरांना सुद्धां कळलं आहे अन् तुम्हांलाच तेवढं कळलं नाहीं हें कसं ? पोरीच्या आईनं आपल्या घरच्या प्रत्येक माणसाचे पाय धरले, पण आपला मुलगा बी. ए. झालेला ! अडीच हजाराच्या खालीं यायची आपली तयारी नाहीं ! मुलीच्या बापाला दरमहा ४० रु. मिळतात. त्याला ४० पैसे द्यायची सुद्धां ताकद नाहीं. आपणच पहा, आपला मुलगा विकत घ्यायला एवढी रक्कम त्यांनीं आणावी कुठून ? हुंडा म्हणून वराची किंमत सगळेच घेतात—तशीच आपण घेत आहांत. त्यांत कांहीं दोष नाहीं. पण एवढं सारं केल्यावर गांवचे लोक आपल्या घरीं बोलावून आपल्या श्रीमंतीचा अभिमान मिरवण्यांत कांहीं पुरुषार्थ नाहीं. समजलं ? कुठल्या कुणा माणसाच्या भिकेच्या दानावर तुमच्या मुलाचं लग्न होतंय एवढंच ध्यानांत ठेवा म्हणजे झालं ! "

सारे घाबरून गेले. सर्वांचीं तोंडं काळींठिक्कर पडलीं. आतां कांहीं तरी भयंकर प्रसंग येणार असंच सर्वांना वाटलं. आतां फाटक बंद करून कालिदासबाबू सर्वांना डांबून ठेवणार—बाहेर जाऊं देणार नाहींत, अशीच भीति सर्वांना वाटूं लागली.

कांहीं वेळ अगदीं मुकाट्यानं बसून कालिदासबाबूंनीं नंतर वर पाहून म्हटलं, " मी पैसे घेणार नाहीं ! "

मी म्हटलं, " म्हणजे मुलाचं लग्नही करणार नाहीं असंच ना ? "

" नाहीं, तसंही नाहीं—" कालिदासबाबू मान हलवून म्हणाले, " लग्नाचा शब्द एकदां देऊन गेलों आहें तो आतां मागं घेणार नाहीं. कालिदास मुखर्जी

आपला शब्द बदलीत नसतो. आपलं नांव काय ?"

आजोबांनीं घाबरत घाबरत माझी हकीगत सांगितली. ओळख पटून कालिदास-बाबू म्हणाले, "हां हां. तरीच्च ! याच्या बापाबरोबर माझा झगडा झाला होता. फौजदारीपर्यंत प्रकरण गेलं होतं."

"जी हां !" आजोबा म्हणाले, "आपली आठवण मोठी धड आहे. हा त्यांचाच मुलगा. तसा माझा नातूच होतो म्हणाना."

कालिदासबाबू मोठ्या खुषींत येऊन म्हणाले, "ठीक ठीक. माझा मोठा मुलगा. जगला असता तर आज एवढाच असता. शशधरच्या लग्नाला तूं आलं पाहिजेस बाबा ! हें माझ्या तर्फेचं निमंत्रण देऊन ठेवतों."

शशधर तिथंच होता. कृतज्ञ मुद्रेनं एक क्षणभर माझ्याकडे नजर फेंकून त्यानं पुन्हां मान खालीं घातली.

मी उठून नमस्कार करून म्हणालों, "कुठंही असलों तरी सुनमुखाच्या वेळीं येऊन वधूच्या हातचा एक घास खाऊन जाईन. माफ करा मी आपल्याला फार टाकून बोललों."

कालिदास-बाबू म्हणाले, "टाकून बोललास यांत शंकाच नाहीं. पण मी तुला क्षमा करतों. पण असंच निघून जायचं नाहीं श्रीकांत, शुभकार्यासाठीं म्हणून थोडीशी तयारी झाली आहे. थोडं गोड तोंड करून गेलास म्हणजे बरं होईल."

"जशी आपली आज्ञा." असं म्हणून खालीं बसलों.

वधूला आशिर्वाद देण्यापासून निमंत्रितांची पंगत उठेपर्यंत सर्व कार्य सुखा-समाधानानं पार पडलं. या प्रकरणाच्या आरंभी सदुपदेशाच्या संबंधीं ज्या नियमाचा मी उल्लेख केला तो नियम पुंटूच्या लग्नाच्या बाबतींत उलटून पडला. कारण कुणाचा पाठिंबा नसलेल्या, अपरिचित, अभागी मुलीच्या बापाचा कान पकडतांच जिथं खळखळून पैसे पडतात, तिथं वैष्णवासारखे हात जोडून वाघाच्या तोंडचा घांस काढून घेणं शक्य नसतं ! पण हें एवढं उदाहरण तेवढं दिसून आलं. निष्ठुर निर्दय म्हणून शिवीगाळ करतांना समाजाला आणि नशिबाला दोष देऊन अंतरीच्या यातना किंचित् हलक्या होतात खऱ्या, पण प्रतिकार मिळत नाहीं. कारण प्रतिकार करणं वराच्या बापाच्या हातीं नसतं—तें असतं वधूच्या बापाच्या हातीं !

## ५

गोहरच्या तपासाला आलों तेव्हां पहिल्यानं नवीन भेटला. मला पहातांच त्याला आनंद झाला खरा पण एकंदरींत त्याची वृत्ति बदललेली दिसली. गोहर कुठें आहे म्हणून मी विचारलं तेव्हां तो म्हणाला, " त्या वैष्णवी गोळा झाल्या आहेत ना, त्यांच्या अड्डयावर बघा ना. काल गेले आहेत ते अजून आले नाहींत. "

" हें काय आणखी नवीन ? ही वैष्णवी कुठून आली आणखी ? "

" एकच ? एक तांडाच्या तांडा आलाय. "

" कुठं रहातात त्या ? "

" त्या त्या मुरारीपुरच्या आखाड्यांत ! " असं म्हणून एक उसासा टाकून नवीन म्हणाला, " काय सांगूं बाबू, आतां तो राम नाहीं आणि ती अयोध्याही नाहीं. म्हातारा मथुरादासबुवाजी मेला. त्याच्या जागीं कुणी एक छोकरा बैरागी आलाय. त्याच्या आहेत चारपांच सेवा दासी. द्वारकादास बैराग्याबरोबर आमच्या बाबूंची खूप गट्टी जमली आहे. बहुधा ते तिथंच असतात. "

आश्चर्यचकित होऊन मी विचारलं, " पण तुझे बाबू तर मुसलमान ? वैष्णव बैरागी आपल्या आखाड्यांत त्याला राहूं देतील कसे ? "

नवीन रागावून म्हणाला, " साऱ्या बुवाबैरागी लोकांना धर्माधर्माचं ज्ञान असतं कुठं ? ते कांहीं जातजन्म मानीत नाहींत. जो कुणी त्यांच्यांत मिसळेल त्याला आपल्या मेळयांत सामील करून घेतात. फारशी वाच्यता करीत नाहींत. "

मी विचारलं, " पण मागं जेव्हां मी आलों होतों अन् सहासात दिवस राहिलों होतों, त्यावेळीं तर गोहर त्यांच्याबद्दल कांहीं बोलला नाहीं ? "

नवीन म्हणाला " बोलतील कसे ? बोलले असते तर कमललताच्या गुणांची तारीफ करावी लागली असती ना ? आपण निघून गेलांत मात्र, लेखणीदप्तर काखोटीला मारून सरळ आमचे बाबू त्या आखाड्यांत जाऊन घुसले. "

सहज विचारून मी बातमी काढून घेतली. द्वारकादासबुवा गाणीं रचीत असत. कवनं रचण्यांत त्यांचा हातखंडा होता. याच आमिषाला गोहर बळी पडला होता. आपल्या कविता त्याला वाचून दाखवून त्याच्याकडून चुका दुरुस्त करून घेत होता.

कमललता नांवाची एक तरुण वैष्णवी त्या आखाड्यांत आली होती. ती दिसायला चांगली होती. गात असेही फार सुंदर. तिच्या कीर्तनावर सारे लोक

बेहाय खूष होते. या वैष्णवांना गौहर मधून मधून पैसाआडका देत असे. आखाड्याच्या भींति कोसळायला आल्या होत्या. पदरचे पैसे लावून त्यांची दुरुस्ती गोहरनं केली. संप्रदायांतल्या लोकांच्या कानीं ही गोष्ट जाऊं दिली नाहीं.

लहानपणीं या आखाड्याबद्दलच्या गोष्टी ऐकल्याचं मला आठवलं. फार वर्षांपूर्वी चैतन्यमहाप्रभूच्या कुणा शिष्यानं हा आखाडा स्थापन केला होता. तेव्हांपासून शिष्यपरंपरेला अनुसरून वैष्णव लोक इथं येऊन रहात असत.

माझी जिज्ञासा जागी झाली. मी म्हटलं, " नवीन, एकदां मला या आखाड्यावर घेऊन जाशील ? "

नवीन मान हलवून म्हणाला, " मला खूप कामं आहेत. शिवाय आपण इथलेच रहाणारे. आपल्याला रस्ता सहज मिळेल अर्ध्या कोसापेक्षां दूर नाहीं. या समोरच्या रस्त्यानं सरळ जायचं आणि तिथून उत्तरेकडे वळतांच आपल्याला आखाडा मिळेल. कुणाला विचारायला नको कांहीं. समोरच्या तलावाच्या घाटावर बकुळीखालीं वृंदावनलीला सुरू आहे. दुरूनच आवाज ऐकूं येईल. पंचाईत पडणार नाहीं. "

मी तिकडं जावं हें नवीनला पसंत नव्हतं.

मी विचारलं, " तिथं काय चालतं ? कीर्तन ? "

नवीन म्हणाला, " हो, अगदीं अहोरात्र. खंजीरी करताल सारखे सुरू असतात. "

मी हंसून म्हटलं, " मग छान झालं तर. मी जातों आणि गोहरला पकडून आणतों. "

आतां मात्र नवीन हंसला आणि म्हणाला, " हं जा ! पण कमललतेचं कीर्तन ऐकून तिथंच अडकून पडूं नका म्हणजे झालं. "

" आतां पाहूं काय होतं तें ! " असं म्हणून हंसत मी कमलता वैष्णवीच्या आखाड्यावर जाण्यासाठीं तिसऱ्या प्रहरीं निघालों.

आखाड्याचा पत्ता जेव्हां लागला तेव्हां दिवस खालीं जायला झाला होता. दुरून कीर्तनाचा किंवा मृदंग करतालाचा एवढा सुद्धां आवाज ऐकूं आला नाहीं. तें जुनं बकुळीचं झाड सहज नजरेला आलं. झाडाखालीं एक मोडकातोडका पार बांधलेला दिसला—पण तिथं माणसाची चाहूल लागली नाहीं.

लहानशा पायवाटेच्या वांकड्या तिकड्या रेषा नदीच्या बाजूला जात असलेल्या दिसल्या. या रस्त्यानं गेलं तर कदाचित् कुणाचातरी पत्ता लागेल असा अंदाज करून मी त्या बाजूला वळलों.

माझा अंदाज चुकीचा नव्हता. कोरड्या पडत आलेल्या शेवाळानं झांकलेल्या नदीच्या कांठीं सारवून स्वच्छ केलेल्या एका चबुऱ्यावर गोहर आणि दुसरा एक कुणी असे बसले होते. आखाड्याचा सध्याचा अधिकारी द्वारकादास बैरागी तो ह्याच असावा असं मी अनुमान बांधलं.

नदीकांठ असल्यामुळं काळोख जास्त वाटत नव्हता. त्यामुळं बुवाजीला चांगलं पाहून घेतां आलं. माणुस कुणी तरी उच्चवर्णीय असावा असं वाटलं. तो वर्णानं सांवळा होता, साधारण लांबरुंद असला तरी एकंदरीनं त्याची देहयष्टी किरकोळ होती, डोक्याच्या केंसाचा पुढं आणून बुचडा बांधला होता, दाढी मिशी फारशी नव्हती—अगदीं सामान्य होती, मुद्रेवर स्वाभाविक हास्यरसाची छटा दिसून येई. वयाचा अंदाज करतां आला नाहीं तरी ३५–३६ पेक्षां त्याचं वय जास्त नसावं असं वाटलं.

मी आल्याचं त्या दोघांच्याही लक्षांत आलं नाहीं. नदीच्या पैलतीराकडे पश्चिम क्षितीजाकडे पहात दोघेही स्तब्ध बसले होते. क्षितीजावर वेगवेगळया रंगाच्या आणि वेगवेगळया आकाराच्या ढगांच्या तुकड्यांतून तृतीयेचा क्षीण चंद्र दिसत होता. अगदीं त्याच्या कपाळाजवळच संध्या तारका झळकत होती. अगदीं खालीं नजर फेकली, कीं दूर गांवच्या सीमेवर हिरव्या निळ्या वृक्षाच्या रांगा सारख्या रचलेल्या दिसत होत्या. त्यांच्या आरंभाशेवटचा ठावठिकाणा लागत नव्हता. काळ्या, पांढऱ्या, भुरक्या, नानारंगाच्या फुटक्या तुटक्या ढगांवर अस्ताला गेलेल्या सूर्याचीं किरणें अजूनही खेळत असल्याचं दिसत होतं. जशी कांहीं एकाद्या व्रात्य मुलाच्या हातीं रंगाचा कुंचला सापडतांच त्यानें चित्राची नासधूस केली होती. त्या व्रात्य मुलाला तेवढाच आनंद—कीं आतां चित्रकार येऊन कान पिरगळून हातचा कुंचला काढून घेईल !

नदीतलं ओसरलेलं पाणी मधेंच गांवच्या लोकांनीं स्वच्छ करून घेतलं असावं. त्या निर्मळ काळया पाण्याच्या इवल्याशा डबक्यांत चंद्राबरोबर संध्या-तारका जवळ जवळ खेळत झगझगत असल्याचं दिसत होतं. जसं कांहीं कसो-टीच्या दगडावर सोन्याचा कस लावून सोनार दरदाम करीत होता. जवळच जंगलांत कुठंतरी जंगली मल्लिका भरपूर फुलल्या असाव्या. त्यांच्या सुवासानं सारी हवा दरवळून गेली होती. जवळच कुठल्यातरी झाडावर बगळयाचीं असंख्य पोरं झुंझुं शब्द करीत असल्यामुळं स्वरांच्या मधुर लहरी कानावर आदळत होत्या.

हें सारं जसं सुंदर होतं, तसेच या सर्व परिस्थितींत जडभरतासारखे मुग्ध होऊन बसलेले हे दोघेही कवी होते यांत शंकाच नव्हती.

पण हें पहाण्यासाठीं कांहीं मी या अवेळीं या जंगलांत आलों नव्हतों. नवीन म्हणाला होता, कीं इथं बऱ्याचशा वैष्णवी आहेत. अन् त्या सर्वांत कमललता वैष्णवी म्हणजे कांहीं विशेष आहे त्या कुठं आहेत ?

" गोहर ! " मी हांक मारली.

ध्यानभंग होऊन गोहर माझ्याकडे वेड्यासारखा पहात राहिला.

बुवाजींनीं त्याला ढोंसून हालवलं आणि म्हटलं, "गोसाई, तुमचा श्रीकांत ना ?"

एकदम भांवत येऊन गोहरनं मला पकडून मिठी मारली. त्याचा हा आवेग आंवरण्याचं कांहीं चिन्ह दिसेना. त्याच्या कवेंतून कशीबशी सुटका करून घेऊन मी म्हटलं, " बुवाजीनीं मला एकदम् ओळखलं कसं ?

नकारार्थी मान हालवीत बुवाजी म्हणाले, " हें चालायचं नाहीं गोसाई, हा शेवटचा दंत्य ' नीं ' बाद द्यायला हवा. तरच रस जमेल. "

मी म्हटलं, " बरं आहे. बाद देतों. पण तुम्हीं मला एकदम ओळखलं कसं ? "

बुवाजी म्हणाले. " एकदम ओळखायचं काय ? तुम्हीं तर आमचे वृंदावनचे परिचित माणूस. दोन्हीं डोळ्यांत रसाचा समुद्र दिसतोय. पहातांच नजरेंत भरतो. कमललता जेव्हां आली—अगदीं असेच दोन डोळे—पहातांच ओळखलं तिला कमललता, कमललता, इतके दिवस होतीस कुठं ? कमल जी आली ती एकदम मिसळून गेली. आदि, अंत, विरह, विच्छेद, कांहीं राहिला नाहीं. हीं साधनं आहेत गोसाई ? यालाच् म्हणतात रसाची दीक्षा. "

मी म्हटलं, " कमललता पहायलाच म्हणून आलोंय मी. आहे कुठं ती ? "

बुवाजी अगदीं खूष झाले आणि म्हणाले, " दिसेल, दिसेल. पहायचं आहे तिला ? पण ती तुम्हांला अनोळखी नाहीं गोसाई. वृंदावनांत तिला अनेकवार पाहिली असेल. कदाचित विसरला असाल पण पाहातांच खूण पटेल, कीं हीच कमललता ? गोसाई, हांक माराना तिला—" असं म्हणून बुवाजीनं गोहरला तिला हांक मारायला सांगितलं.

या वैष्णवांच्या भाषेंत सगळेच गोसाई. बुवाजी म्हणाले, " तिला म्हणावं, श्रीकांत पहायला आलेत तुला. "

गोहर निघून जातांच मी विचारलं, " माझी हकिकत गोहरनं सांगितली

वाटतं तुम्हांला ? ”

होकारार्थी मान हालवीत बुवाजी म्हणाले, “ हो. सारं कांही सांगितलं. सहा सात दिवस आले नाहींत म्हणून मी विचारलं, तेव्हां ते म्हणाले, श्रीकांत आले होते म्हणून. तुम्हीं लवकरच पुन्हां येणार तेंही सांगितलं त्यांनीं. ब्रह्मदेशांत जाणार आहांत तेंही मला माहीत आहे. ”

त्याचं भाषण ऐकतांच माझा जीव खाली पडला. सुटलों एकदांचा. मला भीति वाटली होती ही, कीं कांही तरी अलौकिक, अध्यात्मिक शक्तीच्या जोरावर यांनीं मला ओळखलं की काय ? तें कांहीं असो, या बाबतींत माझ्या संबंधीं त्यांनीं जो अंदाज केला तो चुकीचा नव्हता एवढं मात्र खरं.

एकंदरींत बुवाजी मला बरे वाटले, निदान दांभिक माणूस तरी वाटला नाहीं. तो एक साधासिधा माणूस होता. गोहरनं माझी सारी हकीकत—म्हणजे त्याला जेवढी माहीत होती तेवढी—कां सांगितली कोण जाणे ? बुवाजीनींही ती पटवून घेतली. एकंदरींत हा वेड्यांचा बाजार वाटला. कविता आणि वैष्णवांची रसचर्चा करून दोघांचींही डोकीं थोडीबहुत भडकलेलीं असावींत !

थोडक्याच वेळांत गोहरगोसाव्याबरोबर कमललता येऊन हजर झाली. वयानें तिशीजवळ असावी. वर्ण सांवळा. साधारणपणें ठाकठीक दिसून येणारी. तिच्या हातांत बांगड्या होत्या. कदाचित पितळेच्या असतील कदाचित् सोन्याच्याही असतील. केंस तोकडे नव्हते. पाठीवर मोकळे सोडलेले होते. गळयांत तुळशीची माळ होती. हातांतही गोमुखींत तुळशीची जपमाळ होती. वैष्णवीछापांचं फारसं अवडंबर नव्हतं. कदाचित सकाळीं मारलेले छाप आतां संध्याकाळपर्यंत पुसून गेले असावेत !

तिच्या चेहऱ्याकडे पहातांच मी एकदम थक्क झालों. अचानक वाटलं, हा चेहरा पूर्वी कुठंतरी पाहिलेला असावा. एकंदरींत चालण्याबोलण्याची ढबसुद्धां ओळखीची वाटली. वैष्णवी बोलूं लागली तेव्हां मला वाटलं, कीं ही कांहीं अगदींच खालच्या जातींतली नव्हे.

एवढीसुद्धां प्रस्तावना न करतां ती अगदीं सरळ माझ्याकडे पाहून म्हणाली, “ काय गोसाई, ओळखलंत का ? ”

“ नाहीं—” मी म्हटलं. “ पण कुठंतरी पाहिलं असावं असं वाटतं. ”

“ पाहिलंय तर ! ” वैष्णवी म्हणाली, “ वृंदावनला पाहिलंय ! बड्या गोसाईजींनीं सांगितलं नाहीं का तुम्हांला ?

" सांगितलं खरं—" मी म्हटलं ! " पण या जन्मीं तरी मी वृंदावनला गेलों नाहीं. "

" गेलां होतां तर ! " वैष्णवी म्हणाली, " फार जुन्या काळची गोष्ट. चट्कन् आठवत नाहीं. तिथं गुरं चरायला नेत होतां, फळं पाडून आणीत होतां, रानफुलांच्या माळा गुंफून माझ्या गळ्यांत घालीत होतां, तें सारं विसरलांत ? " असं म्हणून ओंठ दाबून नि खुद्खुद् हंसूं लागली.

मला वाटलं, ती मस्करी करीत होती. पण कुणाची ? माझी कीं बड्या गोसाव्यांची, याचा मला नक्की अंदाज आला नाहीं.

ती म्हणाली, " रात्र झाली. आतां इथं जंगलांत कां बसतां ? आंत चला ना."

मी म्हटलं, " या जंगलच्या रस्त्यानं बरंच दूर जायचं आहे आम्हांला. आतां उद्यां येऊं. "

वैष्णवीनं विचारलं, " इथला पत्ता दिला कुणी ? नवीननं ? "

" हो ! त्यानंच ! "

" कमललताची गोष्ट बोलला कीं नाहीं ! "

" हो ! तेंही सांगितलं त्यानं. "

" वैष्णवीच्या जाळ्यांतून लवकर सुटका होत नाहीं असं सांगून तुम्हांला सावध केलं कीं नाहीं त्यानं ? "

" हो, तेंही सांगितलं " मी हंसून म्हटलं.

वैष्णवी एकदम हंसत सुटली म्हणाली, " नवीन म्हणजे मोठा हुषार आहे. त्याचं ऐकलं नाहींत तें बरं नाहीं केलंत. "

" कां ते सांग ना ? "

माझ्या प्रश्नाचं उत्तर न देतां गोहरकडे बोट करून ती म्हणाली, " हे गोसाई म्हणतात, कीं तुम्हीं परदेशीं नोकरीसाठीं जाणार. पण तुमचं तर कोणच नाहीं कुठं—मग नोकरी कशाला करतां ?

" तर मग काय करूं ? "

"आम्हीं करतों तें. गोविंदजीचा प्रसाद तर कोण काढून घेऊं शकत नाहीं ? "

" तें माहीत आहे. बैरागीगिरी मला अगदींच माहित नाहीं असं नाहीं !"

वैष्णवी हंसून म्हणाली, " कळलं ! एकंदरीत झेपलं नाहीं वाटतं ? "

" नाहीं. फार दिवस झेपलं नाहीं. "

वैष्णवी तोंड फिरवून हंसली आणि म्हणाली, " तुमचं नशिबच चांगलं. आंता

या ना. या, सर्वांची ओळख करून देतें. इथं कमळांचं बन आहे. "

" तें ऐकलंय मी ! पण काळोख पडल्यावर जायचं कसं ! "

वैष्णवी पुन्हां हंसली आणि म्हणाली, " काळोखांतून आम्हीं जाऊं देऊं तेव्हां ना ? हा काळोख केव्हांतरी एकदां नाहीसा व्हावयाचाच ! आतां या— चला आंत. "

" चला तर. "

वैष्णवी म्हणाली, " गौर ! गौर ! "

' गौर गौर ' म्हणत मीही तिच्या मागून निघालों.

## ६

धर्माचरणावर माझी फारशी श्रद्धा नाहीं. पण ज्याची श्रद्धा आहे त्याला मी कधींच विरोध करीत नाहीं. मला एवढं निश्चित माहीत आहे, कीं या कठीण विषयांत डोकं घातलं तर केव्हांही मला अंत लागायचा नाहीं. तरीही एकंदरींत मला धार्मिक माणसं आवडतात. विख्यात स्वामीजी आणि स्वख्यात साधुजी— या कुणांतच मी भेद मानीत नाहीं. दोघांचीही वाणी माझ्या कानाला सारखीच मधुर वाटते. जाणक लोकांच्या तोंडून मी ऐकलं होतं, कीं बंगालदेशच्या आध्यात्मिक साधनेचीं गूढ रहस्यं या वैष्णव सांप्रदायांत छपून राहिलीं आहेत. तें जें कांहीं आहे तें बंगालचं अस्सल स्वतःचं वैभव आहे. यापूर्वीं साधूसंन्याशांचा सहवास थोडाबहुत घडला होता. त्यापासून फलप्राप्ति काय झाली तें सांगावंसं वाटत नाहीं. पंण आतां जर माझ्या भाग्यानं ही अस्सल आध्यात्मिकता मिळवायचा योग येणार असेल तर तो घालवायचा नाहीं असा मी संकल्प केला.

पुंटूच्या लग्नाला गेलंच पाहिजे होतं. तोंपर्यंत कलकत्त्याच्या ओसाड खाणावळींत रहाण्यापेक्षां वैष्णवीच्या आखाड्याच्या आजुबाजूला जर दिवस घालवायला मिळाले, तर आयुष्यांत कांहीं कमाई झाली नाहीं तरी विशेषसं नुकसान होणार नाहीं, असंच मला वाटलं.

आंत येऊन पाहिलं—कमललतेनं खोटं सांगितलं नव्हतं. तिथं कमलवन होतं खरं. पण तें एकजात तुडवलेलं. मातलेल्या हत्तीचा पत्ता लागला नाहीं—पण त्यांचीं पदचिन्हं मात्र दिसून आलीं. वेगवेगळ्या वयाच्या आणि वेगवेगळ्या चेहऱ्याच्या कितीतरी वैष्णवी वेगवेगळ्या कामांत गुंतलेल्या होत्या. कुणी दूध

तापवीत होत्या. कुणी खीर करीत होत्या, कुणी लाडू बांधीत होत्या, कुणी मैदा मळीत होत्या, कुणी फळंमुळं उकडीत होत्या—हा सारा उद्योग रात्रीं देवाच्या नैवेद्यासाठीं चालला होता.

एक अगदींच अल्पवयी वैष्णवी लक्ष लावून फुलांची माळ गुंफीत होती. तिच्याच जवळ बसून आणखी एक वैष्णवी वेगवेगळ्या रंगानीं छापलेले छोटे छोटे कापडाचे तुकडे घडी घालून ठेवीत होती. बहुधा श्रीगोविंदजीच्या दुसऱ्या दिवशींच्या स्नानानंतर परिधानासाठीं ही तयारी असावी.

कुणीच स्वस्थ बसलेलं नव्हतं. काम करण्याचा उत्साह आणि एकाग्रता पाहून मी आश्चर्यचकित झालों. मी येतांच सर्वांनीं माझ्याकडे पाहिलं खरं, पण तें एक क्षणभरच. चौकसपणाला अवधि नव्हता. प्रत्येकीचे ओंठ हालत होते—त्या मनांतल्या मनांत जप करीत असाव्यात.

काळोख पडत आल्यामुळं एकाददुसरा दिवा लावायला सुरवात झाली होती. कमललता म्हणाली, "चला देवाला नमस्कार करून येऊं. पण खरंच, तुम्हांला कशी हांक मारायची ? नवे गोसाई म्हटलं तर चालेल कीं नाहीं ?"

मी म्हटलं, "कां चालणार नाहीं ? तुमच्या या इथं गोहरला जिथं गोहर-गोसाई म्हणतात, तिथं मला ब्राह्मणाच्या बच्चाला गोसाई म्हणायला काय हरकत आहे. पण माझं आहे नांव तें काय वाईट आहे ? त्यालाच एक गोसाई जोडून दे ना."

कमलता तोंड दाबून हंसत म्हणाली, "तसं व्हायचं नाहीं बरं—नाहींच ! तें नांव घेतां येत नाहीं ! मला पाप लागेल. या आंत."

"येतों—पण पाप कसलं लागेल ?"

"तें ऐकून तुम्हांला काय फायदा ? चांगले भले माणूस तुम्हीं !"

जी वैष्णवी माळ गुंफीत होती ती वर पाहून खुद्कन् हंसली आणि पुन्हां तिनं मान खालीं केली.

देवघरांत काळ्या दगडाच्या आणि पितळेच्या राधाकृष्णाच्या मूर्ति होत्या. एक नव्हे, अनेक. इथंही चार पांच वैष्णवी कसल्यातरी कामांत गढून गेल्या होत्या. आरतीची वेळ झाल्यामुळं कुणाला श्वास टाकायलाही फुरसत नव्हती.

भक्तिभावानं रीतसर प्रणाम करून देवघराबाहेर आलों. देवघराखेरीज बाकीच्या सर्व खोल्या मातीच्या होत्या. पण त्या अत्यंत स्वच्छ ठेवण्याची पराकाष्ठा केल्याचं दिसून येत होतं. कुठंही बैठकीशिवाय बसायला संकोच वाटला नसता, तरीही

कमलतेनं पूर्वेकडील ओटीवर एक आसन टाकून दिलं. ती म्हणाली, " बसा. तुमची रहायची खोली एकदां ठिकठाक करून येतें. "

" म्हणजे ? मी आज इथंच राहिलं पाहिजे का ? "

" कां ? भीति कसली ? मी असलें कीं तुम्हांला कसलाच त्रास व्हायचा नाहीं."

" त्रासाचा प्रश्न नाहीं. " मी म्हटलं, " पण गोहर उगीच रागावेल. "

" तें मी पाहून घेईन." वैष्णवी म्हणाली, " मी तुम्हांला राहून घेतलं तर तुमचे दोस्त मुळींच रागवायचे नाहींत. " असं म्हणून ती हंसत हंसत निघून गेली.

वैष्णवी काम करीत होत्या तें मी एकटाच बसून पहात होतों. खरं पाहिलं तर त्यांना वेळ गमवायाला एवढाही अवधि नव्हता. कुणि पुन्हां ढुंकूनसुद्धां माझ्याकडे पाहिलं नाहीं. दहाएक मिनिटांनीं कमललता जेव्हां फिरून आली त्यावेळीं काम संपवून साऱ्याजणीं उठून गेल्या होत्या. मी विचारलं, " या मठांतली गृहिणी तूंच का ?"

जीभ चावून कमललता म्हणाली, " आम्हीं साऱ्या गोविंदजीच्या दासी. कुणी लहान नाहीं, कुणी मोठी नाही. एकेकीवर एकेक काम सोंपवून दिलंय. प्रभूनं हें काम मला दिलंय्—" असं म्हणून तिनं मंदिराकडे तोंड करून हात जोडून कपाळाला लावून नमस्कार केला. ती म्हणाली, " यापुढं असं कांहीं बोलूं नका बरं. "

" ठीक आहे. " मी म्हटलं, " बरं. बडेगोसाई आणि गोहरगोसाई कुठं दिसत नाहींत ते ? "

वैष्णवी म्हणाली, " ते आले होते—पण स्नानासाठीं नदीवर गेलेयत. "

" या रात्रीच्या वेळीं ? अन् त्या नदीवर ? "

वैष्णवी म्हणाली, " हो "

" गोहर देखील ? "

" हो, गोहरगोसाई देखील. "

" मग मला देखील स्नान घालून कां आणलं नाहींस ? "

वैष्णवी हंसून म्हणाली, " आम्हीं कुणाला स्नान घालत नाहीं. ते स्वतः स्नान करतात. प्रभुकृपा झाली तर तुम्हीही स्नान करा—मी नको म्हटलं तरी ऐकणार नाहीं तुम्हीं मग ! "

मी म्हटलं, " गोहर भाग्यवान् आहे. मी गरीब माणूस. माझ्याकडे पैसा नाहीं. कदाचित् माझ्यावर प्रभुकृपा होणार नाहीं. "

माझ्या बोलण्यांतली खोंच लक्षांत येऊन रागारागानं ती कांहीं तरी बोलणार होती पण बोलली नाहीं. त्यानंतर म्हणाली, " गोहरगोसाई कुणि असोत. पण

तुम्हींही कांहीं गरीब नाहीं. हजारों रुपये देऊन परक्या माणसाला कन्यादानांतून जो सोडवतो तो देवाच्या दृष्टीनं कांहीं गरीब नाहीं. कां व्हायची नाहीं तुमच्यावर प्रभुकृपा ? "

मी म्हटलं, " मग एकंदरींत कठीण प्रसंग आहे. नशिबीं काय असेल तें होईल. तें कांहीं अटकवतां येणार नाहीं. पण मी असं विचारतों, कीं कन्यादानांतून सोडवायची हकीकत तुला कुणि सांगितली ? "

वैष्णवी म्हणाली, " दहा घरीं भिक्षा मागणारीं माणसं आम्हीं. आम्हांला साऱ्या बातम्या कळतात. "

" पण हा कन्यादाय सोडवतांना मला प्रत्यक्ष पैसे द्यावे लागले नाहींत, ही बातमी अजून इथं येऊन पोंचली नाहीं वाटतं ? "

आश्चर्यचकित होऊन वैष्णवी म्हणाली, " हें नाहीं ऐकलं मी ! काय झालं ? लग्न मोडलं कीं काय ? "

मी हंसून म्हटलं, " लग्न मोडलं नाही. कालिदासबाबू—स्वतः वराचा बापच मोडला. परक्याच्या भिक्षेच्या दानावर मिळालेले पैसे हात पसरून घेऊन मुलाला विकायला त्यांना लाज वाटली. मीही बचावलों—" असं म्हणून थोडक्यांत सारी हकिकत मी तिला सांगितली.

वैष्णवी आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " म्हणतां काय ? अजूनही होतात हे चमत्कार ? "

मी म्हटलं, " प्रभुकृपा ! सडक्या नदीच्या घाणेरड्या पाण्यांत काळोख्या रात्रीं गोहरगोसाई तेवढा बुडी मारून येतो, यापेक्षां दुसरी अघटित घटना जगांत कांहीं व्हायचीच नाहीं कीं काय ? देवाची लीला कांहीं कुणाला सांगायला येतेय ?—" मी असं बोललों खरा पण वैष्णवीच्या तोंडाकडे पाहिलं तेव्हां मला वाटलं, कीं माझं कुठं तरी चुकलंच ? थोडी अतिमात्रा झाली. वैष्णवी अधिक कांहीं बोलली नाहीं. मंदिराकडे तोंड करून हात जोडून मुकाट्यानं तिनं नमस्कार केला—जशी कांहीं माझ्या अपराधाबद्दल ती क्षमा मागत असावी.

समोरून एक वैष्णवी एक भल्या मोठ्या थाळीभर पुऱ्या घेऊन देवघराकडे गेली. मी म्हटलं, " आज कांहीं विशेष आहे वाटतं ? कांहीं तरी एकादं मोठं पर्व ? "

वैष्णवी म्हणाली, " नाहीं, आज कसलाच पर्वदिन नाहीं. हें आमचं रोजचंच चाललं आहे. देवदयेनं इथं कांहीं कमी नाहीं. "

मी म्हटलं, " मोठी आनंदाची गोष्ट आहे. पण हे तुमचे मोठे समारंभ

बहुधा रात्रींच होतात का ?"

वैष्णवी म्हणाली, " तसंही नाहीं. सेवेच्या बाबतींत सकाळ संध्याकाळ सारखीच. कृपा करून दोन दिवस इथं राहिलांत तर स्वतःच पाहातां येईल तुम्हांला. दासींच्या दासी आम्हीं—सेवा करण्याखेरीज या संसारांत आम्हाला कसलंच काम नाहीं." असं म्हणून मंदिराकडे पाहून तिनं हात जोडून पुन्हां एकदां नमस्कार केला.

मी विचारलं, " सारा दिवस तुम्हांला काय काय करावं लागतं ?

वैष्णवी म्हणाली, " आतां जें पाहिलंत तेंच."

मी म्हटलं, " पाहिलं काय ? वाटावाट, घाटाघाट, दुध तापवणं, माळा गुंफणं, कपड्यावर छाप मारणं असंच आणखी कांहीं. सारा दिवस तुम्हीं हेंच का करतां ?"

वैष्णवी म्हणाली, " हो, सारा दिवस हेंच करीत असतों."

" पण कुठल्याही घरच्या बायका हींच सारीं कामं करीत असतात. मग भजनसाधन तुम्हीं केव्हां करतां ?"

वैष्णवी म्हणाली, " हेंच आमचं भजनसाधन."

" म्हणजे हें रांधणं, वाढणं, पाणी आणणं, कुटणं, वाटणं, माळा गुंफणं, कापड छापणं, हीच का ती साधना ?"

वैष्णवी म्हणाली, " हो. यालाच आम्हीं साधना म्हणतों. दासदासीच्या जातीला याच्यापेक्षां मोठी साधना कुठली असणार गोसाई ? बोलतां बोलतां तिचे डोळे भरून आले. त्या दोन्हीं डोळयांतील अनिर्वचनीय माधुर्य पाहून मी चकित झालों.

सहसा मला असं वाटलं, या अनोळखी वैष्णवीच्या चेहऱ्यासारखा चेहरा मी जगांत कुठंच पाहिला नाहीं ! मी म्हटलं, " कमललता, तुझं घर कुठं ?"

पदरानं डोळे पुसून वैष्णवी हांसत म्हणाली, " झाडाखालीं."

" पण झाडाखालीं कांहीं पहिल्यापासूनच नव्हतं ?"

वैष्णवी म्हणाली, " पूर्वी केव्हांतरी त्रिटाकाठीचं एक छोटंसं घर होतं. पण ती कथा सांगायची ही वेळ नाहीं गोसाई. चला, या माझ्या बरोबर. तुमची खोली दाखवून देतें."

खोली मोठी सुंदर होती. वेळूच्या दांडीवर स्वच्छ टसर रेशमाचं एक वस्त्र होतं तें दाखवून म्हणाली, " हें नेसून देवघरांत या. वेळ लावूं नका." असं म्हणून ती चटकन निघून गेली.

एका बाजूला छोट्याशा माच्यावर बिछाना घातलेला होता. जवळच पाण्याच्या

चौरंगावर कांहीं पुस्तकं आणि थाळीभर बकुळीचीं फुलं होतीं. आतांच कुणीतरी दिवा लावून धूप घालून गेलं असावं. त्या धूपाच्या सुवासानं आणि धुरानं खोली भरून गेली होती.

मोठं छान वाटलं. सारा दिवसभर थकलों होतों. आजवर देवदेवतांना बाजूला टाकून जात आलों, अर्थात् तें आकर्षण मला नव्हतं—धोतर बदलून बिछान्यावर आडवा झालों.

ही कुणाची खोली कोण जाणे. कुणाच्या तरी बिछान्यावर या अनोळखी वष्णवीनं एका रात्रीसाठीं मला जागा दिली होती. कदाचित् ती तिची स्वतःचीही असेल. असल्या बाबतींत स्वभावतःच मला मोठा संकोच असे. पण आज तसं कांहीं मनांत आलं नाहीं. जसा कांहीं फार दिवसांच्या परिचयाच्या आपल्या माणसांत पुन्हां अचानक येऊन पडलों असं वाटलं. एक प्रकारें तंद्रेंत मग्न होतों, तोच कुणी बाहेरून साद दिला, “ नवीन गोसाई, मंदिरांत येणार ना ? तुम्हांला बोलावताहेत तिकडे. ”

धडपडत उठून बसलों. टाळमृदंगासह भजन सुरू झाल्याचं ऐकूं आलं. फार लोकांचा घोळका नसावा. पदांतली शब्दरचना जशी मधुर होती तशीच अगदीं स्पष्ट होती. बायकी आवाज. गाणारी प्रत्यक्ष पाहिली नाहीं तरी निःसंशय वाटलं, कीं ही कमललता. याच तिच्या गोड आवाजामुळं आपला धनी अडकून पडला अशी नवीनची खात्री झाली होती. मला वाटलं, “ अशक्य नाहीं. उलट शक्यतेचाच संभव फार. ”

मंदिरांत प्रवेश करून मुकाट्यानं एका कोंपऱ्यांत बसलों. कुणी माझ्याकडे वळून पाहिलं नाहीं. सर्वांची नजर राधाकृष्णाच्या युगलमूर्तीवर खिळलेली होती. मधें उभी राहून कमललता भजन करीत होती,—मदन गोपाळ जयजय यशोदा दुलालकी, यशोदा दुलाल जयजय नंद दुलालकी । नंद दुलाल जयजय गिरीधारी लालकी, गिरीधारी लाल जयजय गोविंद गोपालकी ।

हे अगदीं साधे आणि साधारण शब्द भक्तिभावानं उच्चारतांना भक्ताच्या गंभीर हृदयाचं मंथन करून कोणतं अमृत बाहेर काढतात त्याची अनुभूति करणं मला शक्य नव्हतं. पण मी पाहिलं तो असं दिसून आलं, हजर असलेल्यांपैकीं कुणाचेच डोळे कोरडे नव्हते. गायिकेच्या दोन्ही डोळ्यांतून अश्रूंची झरणी सारखी लागली होती. भावनेच्या आवेगानं तिचा आवाज मधुन मधुन जसा कांहीं रुद्ध होत होता.

मी असल्या रसाचा रसिक नव्हतों पण माझ्याही मनावर एकदम कांहीं तरी

विलक्षण परिणाम झाला.

द्वारकादास बुवाजी डोळे झांकून भिंतीला टेंकून बसले होते. ते शुद्धीवर होते कीं नव्हते तें सांगतां आलं नसतं. एका क्षणापूर्वी हंसत खेळत असणारी, नुसती कमललताच नव्हे, तर किरकोळ घरकाम करणाऱ्या त्या साऱ्या वैष्णवी, ज्या पूर्वी मला सामान्य, तुच्छ आणि कुरुप वाटल्या होत्या, त्या साऱ्या धूपाच्या धुरानं भरून गेलेल्या मंदिरांतल्या अंधुक दिव्याच्या प्रकाशांत क्षणभर माझ्या डोळ्यांना अप्सरांसारख्या वाटल्या. समोर असणाऱ्या दगडाच्या मूर्ति खरो-खरच डोळे झांकून, कान उघडून भजनाच्या साऱ्या माधुर्याचा आस्वाद घेत आहेत, असा क्षणभर मला भास झाला.

भावनेच्या अशा प्रकारच्या विव्हल मुग्धतेचं मला मोठें भय वाटतं. अस्वस्थ होऊन मी बाहेर निघून आलों तेंही कुणी पाहिलं नाहीं. पाहिलं, तों आंगणाच्या एका कोपऱ्याला गोहर बसला होता. प्रकाशाची एक बारीकशी रेषा कुठून तरी येऊन त्याच्या अंगावर पडली होती. माझ्या चाहुलीनंसुद्धां त्याचा ध्यानभंग झाला नाहीं. पण त्या त्याच्या भावप्रवण मुद्रेकडे पाहून माझेही पाय तिथून हालेनात. मी तसाच तिथं उभा राहिलों.

मला असं वाटूं लागलं. मला एकट्यालाच एकटा टाकून या घरांतली सारी मंडळी कुठल्यातरी दूरदेशी निघून गेली आहे. तिकडचा रस्ता मला माहित नाहीं.

मीं खोलींत आलों आणि दिवा मालवून बिछान्यावर पडलों. ज्ञान, विद्या, आणि बुद्धीच्या बाबतींत मी या सर्वांपेक्षां मोठा असल्याची मला जाणीव होती. तरीही, कोणत्या व्यथेनं कोण जाणे आंतलं मन हुंदके देऊं लागलं. आणि तशाच स्थितींत अगदीं नकळत माझ्या डोळ्यांच्या कोंपऱ्यांतून मोठमोठीं आंसवं टपाटप गळूं लागलीं.

कितीवेळ मला झोंप आली होती कोण जाणे—कानीं हांक आली—“ अहो नवे गोसाई ! ”

जागा होऊन उठून बसून मी विचारलं, “ कोण ? ”

“ मी ती ? तुमची संध्याकाळची ओळख. इतक्यांत झोंप कशी येते तुम्हांला ? ”

त्या काळोख्या खोलींत माच्याच्या बाजूला कमललता वैष्णवी उभी होती.

मी म्हटलं, “जागत बसण्यांत फायदा कोणता ? तेवढाच वेळ सत्कारणीं लागला.”

“ तें माहित आहे. पण देवाचा प्रसाद नको का ? ”

“ हवा तर ! ”

" तर मग झोंप कशी आली एवढी ? "

" कांहीं झालं तरी प्रसाद मिळणार ही खात्री होती. माझी संध्याकाळची मैत्रिण रात्रींच कशी विसरेल मला ? "

वैष्णवी हंसून म्हणाली, " तो हक्क वैष्णवांचा—तुमचा नव्हे ! "

मी म्हटलं, " आशेला जागा असली तर वैष्णव व्हायला किती वेळ ? गोहरला सुद्धां तुम्हीं गोसाई बनवलं तिथं मीच का टाकाऊ ठरेन ? हुकूम झाला तर वैष्णवांचा दासानुदास व्हायला मी राजी आहें. "

कमललतेचा आवाज थोडा गंभीर झाला ती म्हणाली, " वैष्णवांची अशी थट्टा करायची नाहीं, गोसाई. पाप लागतं. गोहरगोसायाला तुम्हीं ओळखलं नाहीं. त्याचे जातवाले त्याला काफीर म्हणतात. पण त्यांना तरी कसं कळावं ? तो अस्सल मुसलमान आहे. बापदाद्यांचा धर्म त्यानं अजून टाकला नाहीं. "

" पण त्याचा थाट पाहिला कीं असं कांहीं वाटत नाहीं. "

" तीच गंमत आहे ! " वैष्णवी म्हणाली, " पण आतां वेळ लावूं नका, चला. " क्षणभर विचार करून ती म्हणाली, " नाहींतर प्रसाद इथंच आणून देतें ! कसं ? "

मी म्हटलं, " हरकत नाहीं. पण गोहर कुठं आहे ? तो येणार असेल तर दोघांचाही प्रसाद एकाच जागीं द्या ना. "

" त्याच्या बरोबर खाल ? "

" आजपर्यंत तर खात आलों. " मी म्हटलं, " लहानपणापासून त्याची आई मला फराळाचं देत असे. तो फराळ कांहीं तुमच्या प्रसादापेक्षां कमी गोड नव्हता. शिवाय गोहर भक्त आहे—गोहर कवी आहे—कवीची जात विचारूं नये कधीं ! "

त्या काळोखांतसुद्धां मला वाटलं कीं, वैष्णवीनं एक मोठा सुस्कारा सोडला. एक क्षणभर थांबून ती म्हणाली, " गोहरगोसाई इथं नाहींत. केव्हां निघून गेले तें कुणालाच माहीत नाहीं. "

मी म्हटलं, " मी पाहिलं तों गोहर अंगणांत बसला होता. त्याला तुम्ही आंत घेत नसतां कां ? "

वैष्णवी म्हणाली, " नाहीं. "

मी म्हटलं, " गोहरला मी आज पाहिला कमललता. मी थट्टा केली म्हणून तुला राग आला पण तुम्ही तुमच्या देवाबरोबर कांहीं कमी थट्टा चालवलेली नाहीं. एका हातानं टाळी वाजत नाहीं. "

माझ्या या प्रश्नाला कांहींच उत्तर न देतां ती बाहेर निघून गेली. थोड्याच वेळानंतर दुसऱ्या एका वैष्णवीच्या हातीं दिवा आणि बैठक आणि स्वतः प्रसादाचं भांडं घेऊन ती आली आणि म्हणाली, " अतिथीच्या सेवेंत कमतरता होते आहे. नाहीं गोसाई ? पण इथं सारा देवाचा प्रसाद ! "

मी हंसून म्हटलं, " कांहीं हरकत नाहीं. वैष्णव नसला तरी हा नवा गोसाई चांगलाच रसिक आहे. आतिथ्याच्या उणिवेनं त्याचा रसभंग होणार नाहीं. ठेवून दे ना काय आहे तें ! पुन्हां येऊन पहाशील त्या वेळीं एक कणदेखील सांपडायचा नाहीं. "

" देवाचा प्रसाद असाच संपवावा लागतो. " असं म्हणून कमललतेनं सर्व जिन्नस व्यवस्थित रीतीनं ताटांत मांडून समोर ठेवले.

दुसऱ्या दिवशीं भल्या पहांटे माझी झोंप मोडली ती तास-घंटांच्या भयंकर आवाजानं. भरपूर वाद्यं वाजवून मंगलआरती सुरू झाली होती. भूपाळी-भजनाचे शब्द कानीं आले, " कन्हय्या गळीं वनमाळा विराजे, राई गळा मोती साजे। अरुणित चरणीं मंजिररंजित खंजन गंजन लाजे। "

त्यानंतर सारा दिवस देवसेवा सुरू होती. पूजा, पाठ, कीर्तन, न्हांणं, धुणं, आंगपुसणं, चंदन माखणं, माळा घालणं, खायला घालणं—ही अशी सेवा सारखी सुरू होती. प्रत्येकजण धांदलींत—प्रत्येकजण उद्योगांत—मला वाटलं, देव दगडाचा म्हणूनच अष्टौप्रहर अशी ही सेवा सहन करतो. हाडामासाचा असता तर या धकाधकींत नाहींसा होऊन गेला असता.

काल मी वैष्णवीला विचारलं होतं, कीं तुम्हीं साधन भजन करतां केव्हां ? तिनं उत्तर दिलं होतं, कीं हेंच आमचं साधन भजन. मीही कौतुकानं विचारलं होतं, कीं रांधणं, वाढणं, फुलं आणणं, माळा गुंफणं, दूध तापवणं हेंच कां तें साधन ? तिनंही मान हालवून उत्तर दिलं होतं, कीं हेंच एवढं आमचं काय तें साधन, या खेरीज दुसरं कुठलंच साधन भजन नाहीं.

आज सारा दिवस चाललेली गडबड पाहिली तेव्हां मला कळलं, कीं तिनं सांगितलं तें अक्षरशः खरं होतं. त्यांत एवढीसुद्धां अतिशयोक्ति नव्हती. दुपारीं सहज मी विचारलं, " कमललता, तूं या बाकीच्यांसारखी नाहींस हें मला कळतं. मला खरं सांग, देवाचं प्रतीक म्हणजे ही दगडाची मूर्ति—"

हात वर करून मला थांबवित म्हणाली, " प्रतीक कसलं, हाच तर साक्षात्

भगवन्त ! यापुढं असं कांहीं बोलूं नका बरं नवे गोसाई ! ”

माझ्या प्रश्नामुळं तिला चमत्कारिक वाटलं असावं. मीही एकप्रकारें शरमिंदा झालों. तरीही पुन्हां हळूच विचारलं, “ मला माहीत नाहीं म्हणून विचारतों, या दगडाच्या मूर्तीत ईश्वराची शक्ति—ईश्वराचं चैतन्य आहे असं खरोखरच का तुम्हांला पटतं ?—”

मला पुढं न बोलूं देतां ती एकदम म्हणाली, “ यांत पटायचं आहे काय हो ? हें आम्हांला सारं प्रत्यक्ष आहे. संसाराचा मोह तुम्हां लोकांना तोडतां येत नाहीं म्हणून रक्तमासाच्या देहाखेरीज चैतन्य कुठं असणं शक्य नाहीं असं तुम्हांला वाटतं. एवढंच काय, मी आणखीही म्हणतें, शक्ति आणि चैतन्याचा वांटा काय तो तुम्हांलाच मिळाला आहे अन् दगडाला मात्र तो मिळाला नाहीं ? नाहीं बरं; देवाची समक्षा कुठंही असते. त्याला कांहीं मर्यादा नाहीं. नाहींतर त्याला देव कशाला म्हणायचं ? ”

बुद्धिवादाच्या दृष्टीनं तिचं बोलणं युक्त नव्हतं, पूर्ण नव्हतं तरीही तो तिच्या मूर्तिमंत श्रद्धेचा उद्गार होता. ज्या निष्कपटपणानें आणि जोरानें तो बोलला त्या त्या समोर मी लंगडा होऊन पडलों. वादविवाद,· चर्चा, करण्याचं धैर्य झालं नाहीं, कीं इच्छाही झाली नाहीं.

शिवाय असंही मनांत आलं, खरंच तर ! दगड असो कीं कांहीं असो, एवढा पूर्ण विश्वास असल्याशिवाय वर्षांनुवर्षं दिवसरात्र एकसारखी अविच्छिन्न सेवा करायचं सामर्थ्य येईल कुठून ? निश्चिंत निर्भयपणानं सरळ उभं रहायला आधार मिळणार कुठून ? हे लोक म्हणजे कांहीं मुलं नव्हेत. खेळासाठीं लुटु-पुटीचा अभिनय करून दोन दिवसांपुरता थकवा घालवण्याचा कांहीं हा उपाय नव्हता. भक्ति आणि प्रीतीच्या अखंड एकाग्रतेनें आत्मनिवेदनाचा आनंदोत्सव हे लोक वाढवीत चालले आहेत ! या आयुष्यांत मिळवायचं काय ? सारीच भूल ! सारंच धुकं ! सारी स्वतःची फसवणूक !

वैष्णवी म्हणाली, “ काय गोसाई, बोलत कां नाहीं ? ”

मी म्हटलं “ विचार करतोंय. ”

“ कसला विचार करतां आहां ? ”

“ तुमचाच विचार करतोंय. ”

“ इश्श ! मोठं भाग्य म्हणायचं माझं ! ” क्षणभर थांबून ती म्हणाली,

" तरी पण इथं राहायचा विचार नाहीं. कुठं त्या तिकडे ब्रह्मदेशांत नोकरी करायला जाणार आहांत. नोकरी कशाला हवी तुम्हाला ? "

मी म्हटलं, " माझा कांहीं मठ नाहीं, कीं मठाची तैनात नाहीं. भाविक भक्तांचं मंडळ नाहीं—खाऊं काय ? "

" देव देईल ! "

मी म्हटलं, " मुळींच खात्री नाहीं. तुमची तरी देवावर कुठं एवढी श्रद्धा आहे ? मग भिक्षा मागायला कां जातां ? "

वैष्णवी म्हणाली, " हात पुढं करून तो दारोदारीं उभा राहिला आहे म्हणून जातों भिक्षा मागायला. नाहीं तर आमच्या अशा काय गरजा आहेत ! न खातां न पितां मेलों म्हणून काय बिघडलं ? "

" तुझं गांव कोणतं कमललता ? "

" कालच तुम्हांला सांगितलं गोसाई, कीं माझं घर झाडाखालीं ! माझं गांव रस्तोरस्तीं ! "

" असं आहे तर झाडाखालीं किंवा रस्तोरस्तीं न फिरतां मठांत रहातेस कां म्हणून ? "

" पुष्कळ दिवस रस्तोरस्तीं फिरत होते गोसाई. जोडीदार मिळेल तर अजूनही निघेन रस्त्यावर फिरायला. "

मी म्हटलं, " तुला जोडीदार मिळणार नाही असं मला तरी वाटत नाहीं कमललता. हांक मारशील तों धांवत येईल तुझ्याबरोबर. "

हंसतमुखानं वैष्णवी म्हणाली, " तर मग तुम्हांलाच बोलावतें गोसाई—आहां कबूल ? "

मीही हंसलों आणि म्हणालों, " हो ! कबूल ! पोरपणांत जिथें जत्रावाल्यांच्या फिरत्या फकिरीला भ्यालों नाहीं तिथं आतां सज्ञान झाल्यावर वैष्णवीचं भय कसलं ? "

" ती तसली फिरतीफकिरीही केली होती का ? "

" हो. "

" तर मग गातां येत असेल तुम्हाला ? "

" नाहीं. जत्रावाल्यांनीं एवढी मजल मारूं दिली नाहीं. त्यापूर्वीच हातीं नारळ दिला. तुमच्या सारखा जत्रावाला असता तर कांहीं सांगतां आलं नसतं. "

वैष्णवी हंसूं लागली, म्हणाली " मीही नारळ दिला असता. जाऊं द्या. सध्यां

आमच्यांतलेच एक म्हणून म्हटलं तरी देखील भागेल. या देशांत कसं ना कसं देवाचं नांव घेतां आलं तरी भिक्षा मिळणं कठीण जात नाहीं. चला ना गोसाई, आपण फिरतीवर जाऊं. वृंदावन कधीं पाहिलं नाहीं म्हटलंत ना—एकदां दाखवून आणतें तुम्हांला. फार दिवस घरीं बसून काढले. भटकायची लहर आतां आली पाहिजे. खरंच, येतां कां नवे गोसाई !

सहज तिच्या मुद्रेकडे नजर गेली तेव्हां मला आश्चर्य वाटलं मी म्हटलं, " परिचयाला पुरते चोवीस घंटेही झाले नाहींत तोंच माझ्यावर एवढा विश्वास जडला कसा ? "

वैष्णवी म्हणाली, " चोवीस घंटे नुसते एकच पक्षीं नव्हेत गोसाई, उभय-पक्षीं ! रस्त्यांत भटकूं लागलों, कीं मलाही तुमचा विश्वास वाटूं लागेल अशी माझी खात्री आहे. उद्यां पंचमी—प्रस्थानाला चांगला मुहूर्त आहे—चला ना. त्यांतून रस्त्याच्या कडेला रेल्वे आहेच—बरं नाहीं वाटलं तर या परत. मी नको म्हणायची नाहीं. "

एक वैष्णवी येऊन म्हणाली, " देवाचा प्रसाद खोलींत ठेऊन आलें आहे."

कमललता म्हणाली, " चला तुमच्याच खोलींत जाऊन बसूं. "

" माझ्या खोलींत ? ठीक आहे. "

पुन्हां एकदां तिच्या तोंडाकडे पाहिलं. ती थट्टेनं बोलत नव्हती यांत तिळमात्र शंका नव्हती. कशाही रीतीनं कां असेना, इथलं बंधन तोडून ही जर निघून जाईल तरच बरं ! तिलाही असंच वाटत असावं—माझा उल्लेख तेवढ्या पुरताच असावा खास—तिलाच जायची घाई आली होती हेंच खरं.

खोलींत येऊन जेवायला बसलों. प्रसादाची व्यवस्था फार उत्तम होती. पळून जायचा कट आतां करतां आला असता पण तितक्यांत कुणी येऊन फार जरूरीच्या कामासाठीं कमललतेला बोलावून गेला. अर्थात मुकाट्यानं प्रसाद सेवन करीत बसलों.

बाहेर येऊन पाहिलं तों तिथं कुणी दिसलं नाहीं. द्वारकादासबुवा गेले कुठं ? दोघीचौघी म्हाताऱ्या वैष्णवी इकडे तिकडे हिंडत होत्या. काल देवघरांत धूपाच्या धूरांत याच मला अप्सरा वाटल्या असाव्या. पण आज दिवसाच्या उघड्या प्रकाशांत कालच्या त्या अध्यात्मिक सौंदर्याचा भास टिकून राहिला नाहीं. मन कसं चमत्कारिक झालं. सरळ आश्रमाबाहेर निघालों. तीच शेवाळानं

झांकलेली, कोरडलेली, अपुऱ्या पाण्याची ओळखीची नदी. तोच झाड झाडोरा, त्याच वेली, तीच कांटे पसरलेली तटभूमि—तेंच सर्पांना ठाव देणारं मजबूत वेताचं आणि वेळूचं बेट ! फार दिवसाच्या अनभ्यासामुळं अंग झिणझिणूं लागलं. दुसऱ्या कुठं तरी जाणार होतों. आडोशांतून कुणी एक माणूस एकदम येऊन समोर उभा राहिला.

आधीं आश्चर्य वाटलं, कीं असल्या जागीं माणूस कुठला ? त्याचं वय माझ्याच इतकं असावं. कदाचित् आठ दहा वर्षांनीं मोठाही असावा. माणूस ठेंगणा होता. रोगट दिसत होता. त्याचा वर्ण फारसा काळा नसला तरी चेहऱ्याचा खालचा भाग इतका लहान होता, दोन्हीं भुवया इतक्या अस्वाभाविक मोठ्या आणि विस्तीर्ण होत्या कीं त्या पाहून मला चमत्कारिक वाटलं. माणसाला एवढ्या मोठ्या भुंवया असतील असं मला कधीं वाटलं सुद्धां नसतं. लांबून वाटलं, निसर्गाच्या हास्यास्पद जादूगिरीनं भल्यामोठ्या मिशा, ओंठाऐवजीं कपाळावर नेल्या असाव्यात. त्याच्या गळयांत बऱ्याचशा तुळशीच्या माळा होत्या अंगावरचा पोषाख साधारण वैष्णवासारखाच होता पण अगदीं मळका आणि फाटका होता.

" महाशय ? "

मी एकदम थबकलों आणि म्हणालों, " काय आहे ? "

" आपण इथं केव्हां आलांत तें सांगाल का ? "

" हो—काल संध्याकाळीं आलों. "

" रात्रीं आखाड्यांत होतां वाटतं ? "

" हो तिथंच होतों. "

" ऊंः ! " क्षणभर तो उगीच राहिला मी पुढं जायला लागलों असं पाहून तो म्हणाला, " आपण कांहीं वैष्णव नाहीं—गृहस्थ माणूस,—आखाड्यांत आपल्याला रहायला दिलं कसं ? "

मी म्हटलं, " तें त्यांचं त्यांनाच माहित. त्यांनाच विचारा. "

" ऊंः कमललतेनं राहून घेतलं वाटतं ? "

" हो, "

" ऊंः तिचं अस्सल नांव माहित आहे का ? उषांगिनी. सिलेटला तिचं घर, पण दिसते जशी कांहीं कलकत्याची बाईच. माझंही घर सिलेटलाच गांवाचं नांव मामूदपूर. तिचं चरित्र सांगूं का तुम्हांला ? "

मी म्हटलं, "नको" पण माणसाची एकंदर चालचलणूक पाहून आतां मात्र मला फार आश्चर्य वाटलं. मी विचारलं, "कमललतेशीं आपलं कांहीं नातें आहे ?"

"आहे तर !"

"कोणतं ?"

क्षणभर मागंपुढं करून तो एकदम ओरडत उठला आणि म्हणाला, "कां ? मी काय खोटं सांगतोंय ? ती माझी बायको आहे. तिच्या बापानं स्वतः आमचा कंठीबदल करून दिला. त्याला साक्षी आहेत."

कां कुणाला ठाऊक, पण मला खरं वाटलं नाहीं. मी विचारलं, "आपली जात काय ?"

"आम्हीं द्वादश–तेली."

"आणि कमललता ?"

आपल्या दोन्ही जाड्या भुंवया रागानं संकुचित करून तो म्हणाला, "ती कलाल आहे. त्यांच्या हातच्या पाण्यानं आम्हीं पायसुद्धां धूत नाहीं! जरा बोलवाल का तिला ?"

"नाहीं. आखाड्यांत कुणालाही जातां येतं. तुम्हींच जाऊन विचारा."

तो माणूस संतापून म्हणाला, "जाईन, महाशय जाईन. दरोग्याला चार पैसे देऊन ठेवले आहेत मी. शिपाई बरोबर घेऊन येईन आणि झिंज्या पकडून बाहेर ओढून काढीन. बुवाजीचा बाप आला तरी भिणार नाहीं. साला रास्कल कुठला !"

उगीच बोलत न बसतां मी चालूं लागलों. तो माणूस माझ्यामागं करकरत ओरडत म्हणाला, "त्यांत आपलं काय गेलं ? जरा जाऊन तिला हांक मारलीत तर काय हातपाय तुटून पडतील ? ऊंः—हे गृहस्थ !"

मागं वळून पहावं असं मला वाटलं नाहीं. राग अनावर होईल आणि या दुबळ्या माणसाच्या अंगावर हात टाकायची बुद्धि होईल या भीतीनं झपाझप पावलं उचलीत पुढं निघालों. असं वाटलं, वैष्णवीच्या मनांत जी पळायची कल्पना आली होती ती याच कारणामुळं असावी.

मन कसं दुश्चित झालं. मी स्वतः देवघरांत गेलों नाहीं आणि मला कुणी बोलवायलाही आलं नाहीं. खोलींत एका चौरंगावर कांहीं वैष्णवग्रंथ रचून

ठेवले होते त्यांतला एक हातीं घेतला. दिवा उशाजवळ ओढून घेतला आणि बिछान्यावर आडवा झालों.

वैष्णवांचा धर्मग्रंथ हातीं घेतला तो कांहीं अध्ययनासाठीं नाहीं—नुसता वेळ काढण्यासाठीं. कमललता गेली ती अजून आली नाहीं, हेंच पुन्हां पुन्हां मनात येऊन मला राग येत होता.

नित्याप्रमाणें संध्याकाळची आरती सुरू झाली होती. तिचा गोड आवाज पुन्हां पुन्हां कानीं येत होता आणि फिरून एवढंच माझ्या मनांत येत होतं, कीं त्यावेळपर्यंत कमललतेनं माझी खबरसुद्धां घेतली नाहीं.

आणि तो मुंबईवाला माणूस! त्याच्या तक्रारींत कांहीं अर्थ होता का ?

आणखी एक गोष्ट, गोहर कुठं गेला ? त्यानंसुद्धां माझी कांहीं चौकशी केली नाहीं ? कांहीं दिवस इथंच रहावं—पुंटूच्या लग्नदिवसापर्यंत इथंच रहावं, असं आधीं वाटलं होतं. पण आतां वाटतं, नकोच. उद्यांच कलकत्याला निघून जावंसं वाटलं.

थोड्या वेळानं आरती आणि भजन संपलं. कालच्याप्रमाणं तीच दुसरी वैष्णवी येऊन मोठ्या आदबीनं प्रसाद ठेवून निघून गेली. पण जिची वाट पहात होतों ती कांहीं आली नाहीं. बाहेर माणसं बोलत चालत होतीं. हळूहळू त्यांची चाहूल कमी होत आली. आतां ती येत नाहीं अशी कल्पना करून खाणं उरकून घेऊन आंचवून दिवा मालवून झोंपीं गेलों.

वाटलं, त्यावेळीं बरीच रात्र झाली असावी. कांनीं शब्द आले, " नवे गोसाई ? "

जागा होऊन उठून बसलों. अंधारांत पहातांना वाटलं, कमललता खोलींत उभी होती. ती हलकेच म्हणाली, " मी आलें नाहीं म्हणून मनाला फार लावून घेतलंत —होय ना गोसाई ? "

मी म्हटलं, " होय. "

वैष्णवी बराच वेळ उगीच राहिली आणि नंतर म्हणाली, " जंगलांत तो माणूस काय सांगत होता तुम्हांला ? "

" तूं पाहिलंस वाटतं ? "

" हो. "

" तो म्हणाला, कीं आपण तुझा नवरा—म्हणजे तुमच्या सामाजिक आचारां

प्रमाणें तूं त्याची कंठीबदल केलेली बायको. ”

“ तुम्हांला खरं वाटतं ? ”

“ नाहीं. मुळींच नाहीं. ”

पुन्हां क्षणभर उगीच राहून वैष्णवी म्हणाली, “ माझी चालचलवणूक, माझ्या चरित्राबद्दल कांहीं उल्लेख केला का त्यानं ? ”

“ होय, केला. ”

“ माझ्या जातीबद्दल ?

“ हो, तेंही बोलला. ”

थोडं थांबून वैष्णवी म्हणाली, “ माझा बालपणचा इतिहास ऐकायचा आहे का ? कदाचित् तो ऐकून तुम्हांला तिटकारा येईल माझा. ”

मी म्हटलं, “ तर मग राहूं दे. कांहीं ऐकायला नको मला. ”

“ कां ? ”

मी म्हटलं, “ त्यांत काय फायदा कमललता ? तुला पाहून मला बरं वाटलं. उद्यां मी जाणार म्हणतों—कदाचित यापुढें आपली भेट सुद्धां होणार नाहीं. मनावर जो चांगला परिणाम झाला आहे तो उगीच नाहींसा करून टाकण्यांत काय कायदा ? ”

या वेळीं वैष्णवी बराच वेळ उगीच राहिली. त्या काळोखांत मुकाट्यानं ती काय करीत होती याचा अंदाज मला आला नाहीं. मी म्हटलं, “ कसला विचार चालला आहे ? ”

“ विचार करतेंय, कीं उद्यां तुम्हांला जाऊं द्यायचं नाहीं. ”

“ तर केव्हां जाऊं देणार ? ”

“ केव्हांच जाऊं द्यायचं नाहीं. फार रात्र झाली. आतां झोंप घ्या. मच्छर-दाणी चांगली सारखी करून घेतली आहे ना ? ”

“ कोण जाणे—ठीक आहे वाटतं. ”

वैष्णवी हंसून म्हणाली, “ ठीक आहे वाटतं ? वा : ! फार छान ! ” असं म्हणून ती जवळ आली आणि काळोखांत तिनं बिछान्याच्या चारी बाजू नीट चांचपून पाहिल्यानंतर ती म्हणाली, “ आतां झोंप घ्या गोसाई. मी चाललें. ” असं म्हणून पाऊल न वाजवतां ती बाहेर गेली आणि बाहेर जातांच आवाज न करतां तिनं दरवाजा लावून घेतला.

# ७

वैष्णवीनं पुन्हां पुन्हां माझ्याकडून शपथ घेतली, कीं तिनं आपलं पूर्वचरित्र सांगितलं तर तें मी ऐकून घ्यावं आणि उगीच गैरसमज करून घेऊं नये.

मी म्हटलं, " मला कांहीं ऐकायचं नाहीं अन् ऐकलं तर त्याचा परिणामही करून घ्यायचा नाहीं. "

वैष्णवीनं विचारलं, " कां परिणाम होणार नाहीं ? कुठल्याही बायकापुरुषांनीं ती हकिकत ऐकली तर त्यांना शिसारी येते. "

मी म्हटलं, " तूं काय सांगणार आहेस तें मला माहित नाहीं पण मला साधारण अंदाज आहे. बायकाच बायकांच्या बाबतींत अशा प्रसंगीं नाकं मुरडतात तें मला माहित आहे. त्याचं कारणही मला माहित आहे. पण तें तुला सांगायचं नाहीं मला. पुरुष देखील पुष्कळ वेळां नाकं मुरडतात—पण तें ढोंग—बहुतकरून आत्मवंचना. तूं जें कांहीं मला सांगणार आहेस त्यापेक्षांही खराब गोष्टी मी तुम्हां बायकांच्या तोंडून ऐकल्या आहेत. डोळ्यांनींही पाहिल्या आहेत. तरीही मला त्याचं कांहीं वाटलं नाहीं. "

" कां वाटलं नाहीं ? "

" मला वाटतं, माझा स्वभावच तसा आहे. पण कालच मी तुला सांगितलं, कीं मला कांहीं ऐकायचं नाहीं. एवढीसुद्धां जिज्ञासा नाहीं मला. शिवाय कुठला कोण मी ! मला कशाला सांगायला हवीय ती हकिकत ? "

वैष्णवी बराच वेळ उगीच राहिली. क्षणभर विचार करून तिनं एकदम प्रश्न केला, " बरं गोसाई, पूर्वजन्म परजन्मावर तुमचा विश्वास आहे का ? "

" कां नसेल ? तें खरं नाहीं असं का तुला वाटतं ? "

" काय वाटायचं मला ? विचार करायला मला इतर पुष्कळ गोष्टी आहेत. या बाबतींत विचार करायला अजून फुरसत झाली नाहीं. "

पुन्हां क्षणभर उगीच राहून वैष्णवी म्हणाली, " एक गोष्ट तुम्हांला सांगायची आहे. खरी मानाल ? देवाकडे तोंड करून सांगतें आहे, तुमच्या समोर खोटं बोलणार नाहीं. "

मी हंसून म्हटलं, " खरी मानीन बरं कमललता. देवाची शपथ घेतली नाहींस तरी सद्धां खरी मानीन. "

वैष्णवी म्हणाली, " तर मग ऐका. एके दिवशीं गोहर गोसाईच्या तोंडून ऐकलं, कीं त्यांचा शाळासोबती अचानक त्यांच्या घरीं आला म्हणून. एक दिवस देखिल जो माणूस कधीं इथं आल्याशिवाय रहायचा नाहीं तो शाळा-सोबती आला म्हणून सहासात दिवस राहिला कसा. असं मला वाटलं. आणखीही वाटलं, कीं मुसलमानाच्या घरांत येऊन राहतो, कुणाचीच पर्वा करत नाहीं, हा असला कसला शाळासोबती आहे याचा ? त्याला कुणी आगापिछा नाहींच कां ? गोहर गोसाईला विचारलं तेव्हां त्यांनीं तेंच सांगितलं. ते म्हणाले, त्याचं नात्या-गोत्याचं कुणी नाहीं म्हणून तो कुणाचीच पर्वा करीत नाही.

" मी मनांतल्या मनांत म्हटलं, " तरीच ! "

" मी विचारलं, तुमच्या मित्राचं नांव काय गोसाई ?

" नांव ऐकतांच मी एकदम चमकलें. तें नांव मला घेतां येत नाहीं बरं गोसाई ! माहित आहे ? "

मी हसून म्हटलं, " कळलं, आतांच हें कळलं. "

वैष्णवी म्हणाली, " मी विचारलं, तुमचा हा दोस्त दिसायला कसा काय आहे ? वय काय आहे त्याचं ? गोहर गोसाईनीं जें काय सांगितलं त्यांतलं कांहीं मला ऐकूं आलं, कांहीं मुळींच ऐकूं आलं नाहीं. पण काळीज कसं धडधड करूं लागलं. तुम्हीं म्हणाल, नुसतं नांव ऐकतांच ही काय अशी पागल होते ? अशी कुणी कुठं पाहिली नाहीं. पण गोसाई, बायकांची जात नुसतं नांव ऐकून सुद्धां पागल होते—अगदीं खरं सांगतें. "

मी म्हटलं, " बरं मग पुढं ? "

वैष्णवी म्हणाली, " मग माझं मलाच हंसूं आलं. पण कांहीं केल्या विसर पडेना. कामधाम करतांना एकच गोष्ट मनांत येत होती—तुम्हीं पुन्हां केव्हां याल ? स्वतःच्या डोळ्यांनीं मी तुम्हांला केव्हां पाहीन ? "

तिचं भाषण ऐकून मी उगीच राहिलों. पण तिच्याकडे पाहिलं तेव्हां मला येणारं हंसूं तिथल्या तिथंच थांबलं.

वैष्णवी म्हणाली, " कालच संध्याकाळीं तुम्ही इथं आला. पण आज या जगांत माझ्याइतकी कुणीच तुम्हांला आपुलकीनं बघणारी नाहीं. असं झालं हें ! पूर्व जन्म जर खरा नसता तर असा विलक्षण प्रकार कधीं घडला असता का ? "

थोडा वेळ थांबून ती पुन्हां म्हणाली, " मला माहित आहे, कीं तुम्हीं

इथं रहायला आलं नाहीं कीं रहाणारही नाहीं. मी कितीही काकुळतीला आलें तरी एक दोन दिवसांत तुम्हीं निघून जाल. पण हा दुरावा मला किती दिवस सोसावा लागेल याचाच मी विचार करतेंय. ” असं म्हणून ती पदरानं डोळे पुशीत एकाएकीं निघून गेली.

मी उगीच राहिलों ! एवढ्या थोडक्या अवकाशांत इतक्या स्पष्ट आणि प्रांजल भाषेंत रमणीच्या प्रणयनिवेदनाची कहाणी सांगितलेली यापूर्वी कोणत्या पुस्तकांत मी वाचली नव्हती कीं कुणाच्या तोंडूनही ऐकली नव्हती. हा अभिनय नव्हता हें मला सरळ सरळ दिसत होतं. कमललता दिसायला बरी होती. अक्षरपरिचयहीन मूर्खही नव्हती. तिच्या बोलण्याचालण्यांत, गाण्यांत, आदरातिथ्यांत तिची दिसून येणारी कळकळीची वृत्ति मला आवडली होती. ती माझी आवड व्यक्त करतांना मी रसिकतेची अतिशयोक्ति किंवा अप्रस्तुत प्रशंसा करीत नाहीं. खरं बोलतांना मला कंजुषपणा करायचा नाहीं; पण पाहातां पाहातां हे सगळे प्रकार असे कांहीं विलक्षण होऊन उठले कीं वैष्णवीच्या त्या निवेदनांत, आसवं गाळण्यांत आणि माधुर्यपूर्ण अशा निःसंकोच आत्मप्रकाशनांत माझं मन इतक्या सहजासहजीं इतकं रंगून जाईल अशी कल्पना एका क्षणभरापूर्वी माझ्या मनांत मुळींच आली नसती.

एक प्रकारें मी हतबुद्ध होऊन गेलों होतों. नुसत्या लाजेनंच माझं सर्वांग रोमचित झालं होतं असं नव्हे, तर एक प्रकारच्या अनपेक्षित आपत्तीच्या आशंकेनं माझ्या अंतरांत कुठंच शांति किंवा स्वास्थ्य राहिलं नव्हतं. कोणत्या अशुभ वेळेवर मी काशीहून निघालों कोण जाणे. एका पुंट्टूचं जाळं तोडून निघतों न निघतों तोंच दुसऱ्या एका पुंट्टूच्या पाशांत नखशिखांत गुंतून पडलों !

तसं म्हणायचं म्हणजे यौवनाच्या सीमेवरून मी आतां दुरावत होतों. अशा भलत्यावेळीं स्त्रीप्रेमाचं वादळ अशा रीतीनं उठलं, कीं कुठं पळून जाऊन स्वसंरक्षण करण्याची संधिही राहिली नाहीं. स्त्रीची प्रणयभिक्षा पुरुषाच्या हिशेबीं अशी अप्रिय होऊं शकेल याची माझी मला कल्पना नव्हती. प्रश्न हा पडला, कीं एकाएकीं माझा भाव एवढा वाढला कसा ? आपल्या पकडींतून राजलक्ष्मी मला सुटूं देत नव्हती. आपली झाकलेली मूठ थोडीशी तरी सैल करून मला केव्हां तरी ती सुटूं देईल अशी कल्पना करणंच चुकीचं होतं. पण झालं तेवढं पुरं झालं. हा संतसंग गेला चुलींत ! मी ठरवलं, उद्याच्या उद्यां इथून निघायचं !

वैष्णवीनं मला एकदम थक्क करून सोडलं, “ हा घ्या तुमच्यासाठीं चहा

आणलाय गोसाई."

"म्हणतेस काय! कुठं मिळाला?"

"गांवांत माणूस पाठवून आणवला. आतां जाऊन तयार करून आणतें. इतक्यांत कुठं बाहेर जाऊं नका."

"नाहीं जात. पण चहा करतां येतो का तुला?"

वैष्णवी बोलली नाहीं, नुसती मान हालवून हंसत निघून गेली.

ती गेली तिकडे मी पहात होतों. मन कसं चमत्कारिक होऊन गेलं होतं. चहा पिणं ही या आश्रमांतली व्यवस्था नव्हती–कदाचित् चहाला इथं बंदीही असेल—पण चहा मला आवडतो याचा पत्ता काढून गांवांत माणूस पाठवून तिनं तो आणवला!

तिचा पूर्वेतिहास मला माहित नव्हता–आजचाही माहीत नव्हता. साधारण-पणें तिच्या चरित्राचा जो अंदाज आला होता तो कांहीं चांगलासा नव्हता. तें निंदार्ह असावं, ऐकलं तर लोकांना तिटकारा येईल असं असावं, तरीही आपली कहाणी [illegible] ती लपवूं इच्छित नव्हती. 'ऐका' म्हणून सारखी मागं लागली होती. मीच ऐकायला तयार नव्हतों. मला ऐकायची जिज्ञासा नव्हती —कारण जरुरीच नव्हती. जरुरी वाटत होती तिला. एकटाच बसून ज्यावेळीं मी हे सारे धागेदोरे जुळवूं लागलों तेव्हां मला स्पष्ट दिसून आलं, कीं ती हकिकत मला सांगितल्याशिवाय तिच्या हृदयावरचा भार हलका होत नव्हता—त्याच्या अभावीं तिच्या मनांत अवसान येत नव्हतं.

श्रीकांत हें नांव आपल्याला उच्चारतां येत नाहीं असं कमललता म्हणाली होती. अशी या नांवाची कोण परमपूज्य व्यक्ति होती आणि ती या लोकांतून नाहींशी झाली होती. तें मला माहित नव्हतं. अगदीं आकस्मिकपणें नांव जुळ-ल्यामुळं ही आपत्ति उत्पन्न झाली होती. आणि त्याच्या आधारेंच ती पूर्व-जन्माच्या स्वप्नसागरांत बुडी मारून वर्तमानकाळच्या वास्तवतेला तिलांजली देत होती.

तरीही वाटे, यांत आश्चर्य कसलें? रसाच्या—भक्तीच्या आराधनेंत अखंड मग्न होऊनही तिची विशिष्ट प्रकारची स्त्रीप्रकृति अजुनही कदाचित् रसाचं तत्त्व मिळवायला समर्थ झाली नसावी. त्या असाहाय्य अशा अतृप्तीच्या प्रवृत्तीमुळं निरवच्छिन्न अशा भावविलासाचं उपकरण मिळवण्यासाठीं ती आज बेचैन झाली होती. तिचं मन द्विधा होऊन रडत होतं. तें तिचं मार्गभ्रष्ट झालेलं

बेचैन मन तिलाच नकळत कुठंतरी आसरा शोधण्यासाठीं तळमळत होतं. वैष्णवीला त्याचा पत्ता लागत नव्हता. म्हणूनच आज ती चकित होऊन पुन्हां पुन्हां आपल्या पूर्वजन्माच्या झांकल्या दरवाज्यावर हात ठेवून ती तळमळ शांत करायला पहात होती. तिच्या भाषणावरून मला वाटलं, कीं 'श्रीकांत' या नांवाची शिदोरी बांधून ती आपली होडी समुद्रांत लोटूं पहात होती.

* * *

वैष्णवीनं चहा आणून दिला. सारी तयारी नवी करावी लागली. चहा पितांच मला मोठं समाधान वाटलं. माणसाचं मन किती लवकर बदलतं हें ! आतां तिच्याबद्दल मला कांहींच वाटत नाहींसं झालं होतं.

मी विचारलं, "कमललता, तुझी जात कलाल का ?"

कमललता हंसून म्हणाली, "नाहीं, बुरुड. पण तुमच्या लेखीं दोनही सारखेच, दोघांतही फरक नाहीं."

मी म्हटलं, "निदान माझ्या स्वतःच्या बाबतींत तरी नाहीं. दोघेही एकाच कां, सारेच एक झाले तरी मला चालतील."

वैष्णवी म्हणाली, "असं वाटतं खरं. तुम्हीं गोहरच्या आईच्या हातचं खात होतां ?"

मी म्हटलं, "तूं पाहिलं नाहींस तिला. गोहर बापासारखा झाला नाहीं, आईच्या वळणावर गेला आहे. अशी शांत, आपभोळी, गोड बाई कधीं कुणी पाहिली नसेल. अशी होती त्याची आई. लहानपणीं एकदां गोहरच्या बापाबरोबर तिचं भांडण झाल्याचं मला आठवतं. कुणाला न कळवतां तिनं बरीचशी मोठी रक्कम कुणाला तरी दिली होती वाटतं, म्हणून हा झगडा झाला. गोहरचा बाप मोठा संतापी होता. आम्हीं घाबरून पळून गेलों. घंटाभऱ्यानं जेव्हां आम्हीं परत आलों तेव्हां पाहिलं, तों गोहरची आई चुपचाप बसून राहिली होती. गोहरचा बाप कुठं आहे म्हणून विचारलं तेव्हां पहिल्यानं कांहीं बोलली नाहीं. पण थोडा वेळ माझ्या तोंडाकडे पहात राहिल्यावर ती एकदम हंसत सुटली. हंसतां हंसतां तिच्या डोळ्यांतून सारखं पाणी वाहूं लागलं. अशीच संवय होती तिची !

वैष्णवीनें विचारलं, "यांत हंसायला काय झालं ?"

मी म्हटलं, "मीही तेंच म्हणत होतों. पण हंसं थांबल्यावर पदरानं डोळे पुसून ती म्हणाली, "मी अगदीं वेडी आहे बाबा, ते तिकडे जेवून खाऊन

घोरत झोंपी गेले आहेत अन् मी इकडे तोंडांत अन्न न घालतां उपास करीत रागानं जळत बसलेंय. कां असं केलं सांग ना ?' आणि बोलतां बोलतां सारा रागसंताप धुवून पुसून टाकून ती निर्मळ होऊन बसली. बायकांच्या जातीचा हा जो मोठा गूण आहे तो भुक्तभोगी माणसांखेरीज इतरांना कळायचा नाहीं."

वैष्णवीनं विचारलं, "तुम्ही भुक्तभोगी आहांत वाटतं गोसाई ?"

मी अस्वस्थ झालों. हा प्रश्न उलटून माझ्यावर पडेल अशी कल्पना मला नव्हती. मी म्हटलं, "सारेच प्रसंग कांहीं स्वतःच भोगले पाहिजेत असं नाहीं. दुसऱ्याचं सुखदुःख पाहून आपल्याला अक्कल येते. त्या मुंबईवाल्या माणसापासून कांहीं अक्कल घेतली नाहींस वाटतं ?"

वैष्णवी म्हणाली, "पण तो कांहीं मला परका नाहीं."

माझ्या तोंडून शब्द बाहेर पडेना—मी एकदम सर्द झालों.

स्वतः वैष्णवीसुद्धां बराच वेळ उगीच राहिली होती. त्यानंतर ती हात जोडून म्हणाली, "तुम्हांला विनंति करतेंय गोसाई, एकदां माझी हकिकत ऐकून घ्या."

"ठीक आहे-सांग."

सांगावं असं तिला वाटलं खरं पण सांगणं सोपं नव्हतं. माझ्याप्रमाणेंच मान खालीं घालून तिला कितीतरी वेळ उगीच बसून रहावं लागलं. पण ती हटली नाहीं. हृदयांतल्या झगड्यावर विजय मिळवून जेव्हां तिनं नजर वर करून माझ्याकडे पाहिलं त्यावेळीं मला वाटलं, आधींच सुंदर असणारा तिचा चेहरा अधिकच दीप्तिमान झाला होता.

ती म्हणाली, "अहंकार मरतां मरत नाहीं गोसाई. आमचे मोठे गोसाई म्हणतात, 'तुषाराचा अग्नि निवतां निवत नाहीं. वरची राख दूर केली कीं झगझग जळत असलेला दिसून येतो—तरी पण फुंकर दिल्यानं तो भडकत नाहीं.' या मार्गावर पाय ठेवला तें सारं फुकट जाणार कीं काय असं वाटतं.—ऐका, मी बायको माणूस आहें—कदाचित् साऱ्या गोष्टी मला उघड करून बोलतां यायच्या नाहींत."

माझ्या संकोचाला पार राहिला नाहीं. शेवटची विनंति म्हणून मी म्हटलं, "बायकांचं पाऊल वाकडं पडल्याची हकिकत ऐकायचं मला आवडत नाहीं. ती ऐकायची मला उत्कंठा नाहीं. ती ऐकणं मला केव्हांच सुखाचं वाटत नाहीं कमललता. तुमच्या वैष्णवांच्या पंथांत अहंकार नाहींसा करायची कोणती योजना तुमच्या महात्म्यांनीं केली आहे ती मला माहित नाहीं. पण स्वतःचं

गुप्त पाप उघड करून सांगणं हेंच जर तुमच्या प्रायश्चित्ताचं विधान असेल, तर ही सारी कहाणी ज्याला ऐकायला आवडत असेल त्याला सांग. असे पुष्कळ लोक मिळतील. मला माफ कर. शिवाय उद्यां मला जायचं आहे. कदाचित् यापुढं आपली कधीं पुन्हां भेटही व्हायची नाहीं. ''

वैष्णवी म्हणाली, '' आधींच मी तुम्हांला सांगितलं आहे, कीं सांगावसं वाटतंय तें मला—तुम्हांला नव्हे. पण उद्यांच्या नंतर आपणा दोघांची भेट होऊं नये असं खरोखरच का तुम्हांला वाटतं. मला नाहीं तसं वाटत, माझं मन सांगतं, पुन्हां आपली भेट होणार. तीच आशा बाळगून मी बसेन. पण खरोखरच माझी हकिकत कळावी असं मुळींच का तुम्हांला वाटत नाहीं ? सारा जन्म माझ्याबद्दल तुम्ही अंदाज आणि अनुमान करीतच का बसणार ? ''

मी विचारलं, '' आज जंगलांत मला जो माणूस भेटला, ज्याला तूं आश्रमांत येऊं देत नाहींस, ज्याच्या दुष्टपणापासून तूं दूर राहूं पहातेस तो खरोखरच तुझा कुणी नव्हे का ? तो खरोखर अगदींच परका आहे का ? ''

'' कसल्या भयानं मी दूर पळूं पहातेंय तें कळलं का गोसाई ? ''

'' हो, कळलं असं वाटतं. पण कोण तो ? ''

'' कोण तो ? इह—परकालांतला तो माझा नरकयातनेचा धनी. म्हणूनच अहोरात्र देवाजवळ रडून म्हणतें, देवा मी तुझी दासी—कुणा माणसाबद्दल ही शिसारी माझ्या मनांत उत्पन्न होतेय ती माझ्या मनांतून धुवून काढून टाक. एवढं झालं कीं मी बचावलें. नाहींतर माझं सर्व साधनभजन फुकट जाईल. ''

तिच्या दृष्टींत आत्मग्लानि प्रत्यक्ष दिसून येत होती. मी उगीच राहिलों.

वैष्णवी म्हणाली, '' एक असा काल होता, कीं त्याच्याखेरीज मला दुसरं कुणीच नव्हतं. जगांत कुणावरही मी असं जीव सांडून प्रेम केलं नव्हतं—''

तिचं भाषण ऐकून मी अगदीं थक्क होऊन गेलों. या सुंदर रमणीच्या सौंदर्याशीं तुलना करतांना तिच्या प्रेमाच्या स्थानाचं तें ओंगळवाणं स्वप्न नज़रे-समोर येऊन माझं मन कससंच होऊन गेलं.

ती वैष्णवी बुद्धिमति होती. मला काय वाटलं याचा अंदाज माझ्या मुद्रेवरून करून घऊन ती म्हणाली, '' गोसाई, तुम्हीं बाहरेचं रूप पाहिलं. त्याच्या अंतरंगाचा परिचय देतें—ऐका—''

" सांग तर. "

वैष्णवी सांगूं लागली, " मला आणखी दोन छोटीं भांवडं आहेत. पण माझ्या आईबापांची मी एकुलती एक मुलगी. श्रीहट्ट प्रांतांत माझं घर. पण उद्योगधंद्यासाठीं माझे बाबा कलकत्त्याला राहिले होते. लहानपणापासूनच मी कलकत्त्यांत वाढलें. घरदाराच्या पायीं आई गांवच्या घरांतच रहात होती. पूजेच्या दिवसांत ( नवरात्रांत ) जर कधीं गांवीं गेलें तर महिन्याभऱ्यापेक्षां जास्त दिवस रहात नसें. तिथं रहाणं मला आवडत नसे. कलकत्त्यांतच माझं लग्न झालं. सतराव्या वर्षी कलकत्त्यांतच मी विधवा झालें. तुमचं नांव गोहरकडून कळलं त्यावेळीं त्याच नांवापायीं मी दचकलें. तेवढ्यामुळंच मी तुम्हांला नवे गोसाई म्हणून हांक मारतें. तें तुमचं नांव उच्चारणं मला शक्य नाहीं. "

मी म्हटलं, " तें मला कळलं, आतां पुढं ? "

वैष्णवी म्हणाली, " आज तुम्हांला जो भेटला त्याचं नांव मन्मथ. तो आमचा दिवाणजी होता—" असं म्हणून ती एक क्षणभर बोलेनाशी झाली–नंतर म्हणाली, " तेव्हां मी एकवीस वर्षांची होतें. त्यावेळीं मी आई होण्याच्या बेतांत आलें—"

वैष्णवी पुढें सांगूं लागली. " मन्मथाचा एक पितृहीन पुतण्या आमच्या घरीं राहत होता. बाबांनीं त्याला कॉलेजांत घातलं होतं. वयानं तो माझ्यापेक्षां लहान होता. माझ्यावर त्याची भारीच माया होती. त्याला बाजूला घेऊन मी म्हटलं, यतीन, कधीं तुझ्याकडे मी कांहीं मागितलं नाहीं. या संकटांत मला एक शेवटची मदत कर—हा रुपया घे आणि मला विष आणून दे. '

" पहिल्यानं त्याला कांहीं कळलं नाहीं. पण जेव्हां कळलं तेव्हां त्याचा चेहरा एकदम मुडद्यासारखा पांढरा फटक पडला, मी म्हटलं, ' उगीच उशीर लावूं नकोस बाबा. आतांच्या आतां तेवढं आणून दे मला. त्याखेरीज आतां दुसरा उपाय नाहीं. '

" तें ऐकतांच यतीन रडूं लागला. माझ्याबद्दल त्याला देवासारखा आदर होता. तो मला ' आक्का ' म्हणे. त्याला असा कांहीं धक्का बसला. अशा कांहीं यातना झाल्या, कीं त्याच्या डोळ्यांतून वाहणारीं टीपं खळेनात. तो म्हणाला, ' उषाअक्का, आत्महत्येसारखं महापाप नाहीं, एका पापाच्या खांद्यावर आणखी एक पाप चढवून मार्ग मिळेल असं तुला वाटतं तरी कसं ? अब्रू झांकण्यासाठीं हाच एक उपाय आहे असं तुला निश्चित वाटत असेल खरं आक्का—पण या

कामीं मी तुला मदत करणार नाहीं. याखेरीज मला काय वाटेल तें मी ऐकेन— पण मेलों तरी हें काम करणार नाहीं.'

" हळूहळू गोष्ट बाबांच्या कानीं गेली. ते एक निष्ठावान वैष्णव होते. स्वभावानं अत्यंत शांत आणि निरुपद्रवी. मला कांहींच बोलले नाहींत. पण लाजेनं आणि दुःखानं दोन तीन दिवस ते कांहीं बिछान्यावरून उठले नाहींत. त्यानंतर गुरुदेवांना विचारून मला घेऊन ते नवद्वीपला आले. मन्मथ आणि मी दीक्षा घेऊन वैष्णव व्हावं अशी गोष्ट निघाली. फुलांची माळ आणि तुळशीची माळ बदल करून या वैष्णवांच्या आचाराप्रमाणें माझं लग्न व्हायचं ठरलं. एवढं झालं मग माझ्या पापाचं प्रायश्चित होणार होतं कीं काय कोण जाणे. पण जो जीव माझ्या गर्भांत होता त्याची हत्त्या करण्याचं—आईनं हत्त्या करण्याचं टळेल, एवढंच त्या दुःखांत समाधान मानून माझ्या अंतरींच्या अर्ध्या वेदना कमी झाल्या. दीक्षा म्हणा किंवा वेषधारण म्हणा—जें व्हायचं तें झालं. माझं नवं नांव ठेवलं कमललता. दहा हजार रुपये देऊन माझ्याशीं लग्न करायची कबुली बाबांनीं मन्मथकडून घेतली होती तें मला तोंपर्यंत माहित नव्हतं. पण लग्नाचा दिवस सारखा दररोज लांबत होता. एक आठवडा निघून गेला. मन्मथ कुठं दिसत नव्हता. नवद्वीपच्या बिऱ्हाडांत मी एकटीच होतें. असेच आणखी कांहीं दिवस गेले आणि लग्नाचा दिवस पुन्हां ठरला. स्नान करून शुचिर्भूत होऊन देवाची प्रसादीमाळा हातीं घेऊन वाट बघत राहिलें. बाबा दुःखी मुद्रेनं एकदां पाहून गेले. पण नवीन वैष्णवाच्या वेषांत ज्यावेळीं मन्मथ आलेला पाहिला त्यावेळीं मनांत एकदम कांहीं तरी प्रकाश पडला—वीज चमकली. परिणाम झाला तो दुःखाचा कीं आनंदाचा—कीं दोहोंचा तेंच मला कळेना. जाऊन त्याच्या पायावर लोळण घ्यावी असं वाटलं. पण लाजेमुळं तसं कांहीं घडलं नाहीं.

" कलकत्याला आमच्या घरीं असलेली जुनी दासी माझं सामानसुमान घेऊन आली होती. लहानपणापासून मी तिच्या अंगावरच वाढलें होतें. लग्नाचा दिवस असा लांबणीवर कां पडत गेला तें तिच्या तोंडून मला कळलं."

कधीं केव्हांची गोष्ट, पण ती सांगतांना तिचा कंठ भरून आला होता. डोळ्यांतून टपाटप आंसवं गळत होतीं. तोंड फिरवून वैष्णवी डोळे पुसूं लागली.

चारपांच मिनिटं गेलीं तेव्हां मी विचारलें, " काय कारण सांगितलं तिनं ? "

वैष्णवी म्हणाली, " तिनं सांगितलं, कीं मन्मथ दहा हजाराच्या ऐवजी वीस

हजार पाहिजेत म्हणून हट्ट धरून बसला. मला यांतलं कांहींच माहित नव्हतं. आश्चर्यचकित होऊन मी विचारलं, 'पैशाच्या बदल्यानं का मन्मथ माझ्याबरोबर लग्नाला तयार झाला ? वीस हजार द्यायला बाबा स्वतःच का तयार झाले ?' दासी म्हणाली, 'दुसरा काय उपाय होता पोरी ? प्रसंग तर बिकट होता. उघडकीस आलं तर जात कुळ मान सारीं कांहीं नष्ट झालीं असतीं. अगदीं शेवटीं मन्मथनं भलतीच गोष्ट बाहेर काढली. तो म्हणाला, कीं खरा अपराधी तो नव्हे तर त्याचा पुतण्या यतीन. अर्थात दुसऱ्याचं पाप निष्कारण आपल्या माथीं घ्यायचं तर वीस हजाराच्या खालीं घ्यायचे का म्हणून ? दुसऱ्याच्या पोराचा बाप व्हायचं म्हणजे कांहीं साधंसीधं काम नव्हे.'

"यतीन आपल्या खोलींत अभ्यास करीत होता त्याला बोलावून आणून विचारलं. ऐकतांच तो पहिल्यानं हतबुद्ध होऊन तांठरला. अन् मग म्हणाला, ही गोष्ट खोटी म्हणून.

"त्याचा चुलता मन्मथ ओरडून म्हणाला, 'पाजी हरामखोर कुठला. अन्नवस्त्र देऊन कॉलेजांत शिकवून ज्या गृहस्थांनीं तुला माणसांत आणलं त्यांचा असा सत्यानाश केलास ? कुठल्या या काळसर्पाला आणून मी माझ्या धन्याच्या घरीं घातलं ! आई नाहीं, बाप नाहीं, इथं पोराचं कल्याण होईल असं वाटलं होतं, अन् आतां हें असं झालं !' असं म्हणून तो कपाळावर हात मारून घेऊं लागला आणि म्हणाला, 'स्वतः उषेनं कबूल केलं आणि तूं नाहीं म्हणतोस ?"

"यतीन चमकून म्हणाला, 'उषा आक्कानं स्वतः सांगितलं माझं नांव ? कधींही खोटं बोलणार नाहीं ती ! असा धडधडीत खोटा आरोप तिच्या तोंडून कधींही यायचा नाहीं !'

"पुन्हां आरडाओरडा करीत मन्मथ म्हणाला, 'अजून नाकबूल करतोस हरामखोरा ? मग धन्यांनाच विचारून ते काय म्हणतात ते ऐक !'

धन्यांनीं होकार दिला.

यतीन म्हणाला, "आक्कानं स्वतः माझं नांव सांगितलं ?"

धन्यानीं पुनः मान हालवून 'हो' म्हटलं.

"बाबांवर त्याची देवासारखी श्रद्धा होती. बाबांचा होकार ऐकतांच तो कांहींच बोलला नाहीं. क्षणभर स्तब्ध होऊन राहिला आणि मग तसाच हळूहळू चालता झाला. काय मनांत आलं होतं त्याच्या कोण जाणे.

" रात्रीं कुणी त्याची चौकशी केली नाहीं. सकाळींच कुणी बातमी दिली. सगळे धांवत पहायला निघाले—अडगळीच्या कोठडींत यतीननं गळयाला फास लावून घेतला होता. "

वैष्णवी म्हणाली, " पुतण्यानं आत्महत्या केली तर चुलत्याला सुतक पाळावं लागतं कीं नाहीं तें माहित नाहीं गोसाई !—कदाचित् नसेलही—कदाचित् स्नानानं शुद्धी होत असेल—कांहीं असो, लग्नाचा दिवस म्हणूनच लांबला—त्यानंतर गंगास्नान करून शुचिर्भूत होऊन मन्मथ गोसाई टिळेमाळा धारण करून या पापी जीवाच्या पापमुक्तीसाठीं शुभसंकल्प करून नवद्वीपाला येऊन हजर झाला. "

घटकाभर उगीच राहून वैष्णवी पुन्हां म्हणाली, " त्या दिवशीं देवाची प्रसादी माळा देवाच्या पायीं पुन्हां वाहून परत आलें. मन्मथाचं सुतक फिटलं पण पापी उषेचं सुतक या जन्मीं कधींच फिटायचं नाहीं गोसाई ! "

मी म्हटलं, " मग काय झालं ? " वैष्णवीनं तोंड फिरवलं. उत्तर दिलं नाहीं. मन सांवरायला आतां तिला अवधी लागेल असंच मला वाटलं. कितीवेळ तरी एक शब्दसुद्धां न बोलतां आम्हीं दोघंही बसलों होतों.

शेवटची हकिकत कळायची जिज्ञासा जरी अनावर झाली होती तरी विचारावं कीं नाहीं म्हणून विचार करीत होतों, तोंच गहिवरल्या आवाजांत स्वतः वैष्णवीच म्हणाली, " पहा गोसाई, या जगांत पापाला एवढं भयंकर कां मानतात माहित आहे ? "

मी म्हटलं, " माझा समज वेगळाच आहे. या बाबतींत कदाचित् माझं मत जमायचं नाहीं. "

तिनं उत्तर दिलं, " तुम्हाला काय वाटलं मला माहित नाहीं. पण त्या दिवसापासून मी एक ठाम समज करून घेतला आहे गोसाई, चीड आली कीं माणुस कुणाला काय बोलेल याचा नेम नाहीं. जो तो आपापल्या परीनं आपल्या मनाचं समर्थन करीत असतो. पण तसं करायची कांहीं जरुरी नाहीं. याला प्रमाण-मन्मथ ! याला प्रमाण—मी स्वतः ! अजून मला कांहीं झालं नाहीं. तसं कांहीं झालं असतं तर मी भयंकरपणाची कसोटी ठरवली असती. पण उलटच झालं. एकाच्या पापाची शिक्षा भलत्याच निरपराध निर्दोषी माणसाला भोगावी लागली. यतीनला आत्महत्त्येची केवढी चीड होती. पण आपल्या आकाच्या पापाचं प्रायश्चित करण्यासाठीं त्यानं आत्महत्त्या केली. आतां तुम्हींच सांगा गोसाई, जगांत याच्यापेक्षां

भयंकर अन्याय कांहीं आहे का ? पण हे असंच होतंय. या असल्याच मार्गांनीं देव आपल्या सृष्टीचं रक्षण करतो."

या बाबतींत चर्चा करण्यांत कांहीं अर्थ नव्हता. तिचा युक्तिवाद आणि भाषा मुळींच प्रांजल नव्हती. तरीही मला वाटलं, दुःखानं झांकलेली आपल्या पापाची आठवण, कदाचित् अशाच प्रकारें पापपुण्याची मर्यादा ठरवून, तिला समाधान द्यायला समर्थ होत होती.

मी विचारलं, "त्यानंतर काय झालं कमललता ?"

माझा प्रश्न ऐकून ती व्याकुळ होऊन म्हणाली, "खरं सांगा गोसाई, माझी यापुढची हकिकत ऐकावी असं वाटतं का तुम्हांला ?"

"खरोखरच वाटतं."

वैष्णवी म्हणाली, "या जन्मीं पुन्हां तुमची भेट झाली हें माझं मोठं भाग्य !" असं म्हणून ती कांहीं वेळ उभी राहून माझ्याकडे पाहात बोलूं लागली, "तीन चार दिवसानंतर एक मेलेलं पोर जन्माला आलं. गंगेच्या कांठीं त्याचं विसर्जन करून गंगास्नान करून मीं घरीं आलें. रडत रडत बाबा म्हणाले, 'यापुढं माझ्यानं इथं राहवत नाहीं पोरी !' मी म्हटलं, 'नाहीं बाबा, तुम्हीं इथं राहूं नका. तुम्हीं घरीं जा. फार क्लेश दिले मी तुम्हांला. यापुढं माझी चिंता करूं नका.

"बाबा म्हणाले, 'मधून मधून खुशाली कळवशील ना पोरी ?'

"मी म्हटलं, 'नाहीं बाबा, आतां माझी खबर घ्यायचं विसरून जा.'

'पण अजून तुझी आई जिवंत आहे उषा.'

"मी म्हटलं, "मी कांहीं जीव देत नाहीं बाबा, पण माझी आई माऊली आहे—तिला सांगा. उषा मेली. आईला दुःख होईल तें ऐकून; पण आपली पोर जिवंत आहे असं ऐकायला तिला त्याहीपेक्षां जास्त दुःख होईल' डोळ्यांतलीं आंसवं पुसून बाबा कलकत्याला निघून गेले."

मी मुकाट्यानं ऐकत होतों. कमललता पुढं बोलूं लागली, "गांठीला पैसा होता. घर भाडं चुकतं करून मी बाहेर पडलें. सोबत मिळाली. ते वृंदावनला जात होते. मीही त्यांच्याबरोबर निघालें."

पुन्हां एकदां थांबून वैष्णवी म्हणाली, "त्यानंतर किती तीर्थं केलीं, किती रस्तोरस्तीं हिंडलें, झाडाखालीं किती दिवस काढले—"

मी म्हटलं, "तें माहित आहे मला. पण किती शेंकडा बुवांच्या किती

हजारों डोळयांनीं काय केलं त्याचं विवरण कुठं केलं नाहींस ? ”

वैष्णवी एकदम हंसून म्हणाली, “ त्या बाबाजींची दृष्टि फार निर्मळ असे. अश्रद्धेनं त्यांच्याबद्दल असं बोलूं नये गोसाई. ”

मी म्हटलं, “ छे ! छे ! अश्रद्धा नव्हे ही. त्यांची हकिकत मला ऐकायची आहे ती अत्यंत श्रद्धेनंच ! ”

यावेळीं ती हंसली नाहीं खरी; पण दाबलेलं हंसं तिला छपवतां आलं नाहीं. ती म्हणाली, “ जे बाबाजी प्रेम करतात त्यांची कथा उघड करून सांगूं नये, असा वैष्णवांच्या शास्त्रांत निर्बंध आहे. ”

मी म्हटलं, “ राहू दे तें. सान्याच हकिकती सांगूं नकोस. पण एकच सांग, या द्वारकादास गोसायाची गांठ कुठं पडली ? ”

कमललतेनं संकोचानं जीभ चावून मस्तकाला हात लावून नमस्कार केला आणि म्हटलं, “ अशी थट्टा करूं नये गोसाई, ते माझे गुरुदेव आहेत. ”

“ गुरुदेव ? तूं त्यांच्याकडूनच का दीक्षा घेतलीस ? ”

“ नाहीं. दीक्षा घेतली नाहीं खरी पण ते मला तेवढेच वंदनीय आहेत. ”

“ पण या ज्या एवढ्या वैष्णवी आहेत—सेवादासी म्हणतात ना यांना ?–”

पुन्हां जीभ चावून कमललता म्हणाली, “ त्यासुद्धां माझ्यासारख्याच त्यांच्या शिष्या आहेत. सर्वांचा त्यांनीं उद्धार केला आहे. ”

मी म्हटलं, “ उद्धार केला असेल. पण ‘ परकीया साधना ’ अशी कांहीं एक साधन पद्धति तुमच्यांत आहे ना ? त्यांत कांहीं दोष नाहीं म्हणतात—”

मला मधेंच थांबवून वैष्णवी म्हणाली, “ तुम्हीं दुरून आमच्याकडे पहातां आणि आमची थट्टा करतां. जवळ येऊन कधीं पाहिलं नाहीं म्हणून अशी थट्टा करायला तुम्हांला कांहीं वाटत नाहीं. आमचे बडे गोसाई एक संन्यासी आहेत. त्यांचा उपहास करणं पाप आहे. पुन्हां असलं कांहीं बोलूं नका. ”

तिचं भाषण ऐकून मी थोडासा ओशाळलों. वैष्णवीच्या तें ध्यानीं आलं. ती हंसत मुखानं म्हणाली, “ चार दिवस आमच्या सहवासांत रहा ना. बड्या गोसाव्यांसाठींच मी असं म्हणत नाहीं. पण तुम्हांला माझ्याबद्दल लोभ आहे. पुढं कदाचित् आपली भेट झाली नाहीं तर कमललता कोणत्या आधारावर या संसारांत राहिली आहे तें एकदां पाहून घ्या. अजून मी यतिनला विसरलें नाहीं,–दोन दिवस थांबा. मी मुद्दाम सांगतें आहें, खरोखरच तुम्हांला समाधान वाटेल. ”

मी उगीच राहिलों. या वैष्णवींबद्दल मी अगदींच अनभिज्ञ नव्हतों. अस्सल वैष्णवाची बची तगर यावेळीं मला आठवली—पण यावेळीं थट्टा करण्याचं धैर्य झालं नाहीं. यतिननं जें घोर प्रायश्चित घेतलं त्या प्रकाराची आठवण करतांना माझंही मन क्षणभर उदासवाणं होऊन गेलं.

वैष्णवीनं एकदम प्रश्न केला, "खरंच सांगा गोसाई, एवढं वय झालं तुमचं पण कुठंच तुमचा प्रेमसंबंध आला नाहीं का ?"

"तुला काय वाटतं कमललता ?"

"मला वाटत नाहीं. तुमची वृत्ति एखाद्या बैराग्यासारखी आहे—उदासीनाची आहे. फिरत्या फुलपांखरासारखी आहे. तुम्हीं कुठलंच बंधन कधीं पत्करणार नाहीं."

मी हंसून म्हटलं, "फुलपाखराची उपमा ठीक नाहीं कमललता. शिवी दिल्यासारखं वाटते ती. माझ्या प्रेमाचं माणूस जर कोण कुठं असेल अन् त्याच्या कांनीं हें जाईल तर अनर्थ माजेल."

वैष्णवी हंसली आणि म्हणाली, "ती-भीति नाहीं गोसाई. खरोखरच असं कुणी असेल तें माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवणार नाहीं. तसंच तुमची ही गोडव्याची झुकांडीदेखील तिला आयुष्यभर सहन व्हायची नाहीं."

मी म्हटलं, "मग त्यांत काय बिघडलं ? झुकांडी का होईना, पण तिच्या हिशेबीं तरी तो सत्याभास होईल ना ?"

मान हालवीत वैष्णवी म्हणाली, "तसं नव्हे गोसाई, खऱ्याची जागा खोट्यानं कधीं भरून निघत नाहीं. त्या माणसाला कळो कीं न कळो, स्पष्ट होवो कीं न होवो, पण त्या माणसाचं काळीज जन्मभर टीपं गाळीत राहिल. खोट्याचे परिणाम पाहिलेत ना ? किती माणसं आजवर या मार्गानं गेलीं. खऱ्या बुद्धीनं या मार्गावर जो पाऊल टाकीत नाहीं त्याला कोरड्या वाळूंतल्या पाण्याच्या ओघळाप्रमाणं आयुष्यभर अलग होऊन रहाणं भाग पडतं. कधींच कुठं जमून येत नाहीं त्याचं !"

थोडं थांबून ती जणूं काय आपल्याशींच बोलल्यागत बोलूं लागली, "रसिकतेचा पत्ता त्यांना लागत नाहीं. प्राणहीन निर्जीव पुतळ्याच्या निरर्थक सेवेसाठीं अशा माणसाचा जीव चार दिवस उसळून उठतो. कुठल्यातरी मोहाच्या भ्रमानं स्वतःला फसवीत राहिल्यासारखं त्याला वाटतं. अशा माणसांना पाहून तुम्ही लोक आमचा उपहास करायला शिकलाहांत. पण आम्ही काय उगीच भटकत मरतों आहोंत

गोसाई ? माझं बोलणं तुम्हांला असंबद्ध वाटेल—कदाचित् कळायचंही नाहीं. पण मी एक सांगतें—तुमचं असं कोण माणूस असेल, तुम्हीं त्याला विसरलां असाल, पण तें मात्र कधीं नाहीं विसरायचं तुम्हांला. कधीं नाहीं खळायचीं त्याच्या डोळ्यांतलीं आसवं ! "

तिच्या भाषणाचा पहिला भाग मला कळला नाहीं हें मी कबूल करतों पण शेवटच्या भाषणाला उत्तर म्हणून मी म्हटलं, "कमललता, प्रेम म्हणजे दुःख भोगणं, असंच मला पटवून द्यायचा तुझा उद्देश आहे का ?"

"दुःख भोगणं असं मी म्हटलं नाहीं गोसाई, मी म्हणतें आहें, टीपं गाळीत बसणं !"

"दोन्हीही एकच—नुसता शब्दाचा फरक."

वष्णवी म्हणाली, "नाहीं गोसाई, तीं दोन्ही एक नव्हत. हा शब्दाचा फरक नाहीं—भावनेचा फरक आहे. बायकांची जात या प्रसंगाला भीत नाहीं—हा प्रसंग टळावा म्हणून नाहीं. पण हें तुम्हांला कसं कळणार ?"

"जर मला कळणार नाहीं असं वाटत होतं, तर बोललीस कशाला ?"

"बोलल्याशिवाय रहावेना म्हणून—बरं का ! प्रेमाच्या वास्तवतेचं नांव घेऊन तुम्ही पुरुष लोक जेव्हां बढाई मारूं लागतां तेव्हां आम्हांला वाटतं, कीं आमची जातच तुमच्यापेक्षां निराळी आहे. तुमची आणि आमची प्रेमाची कल्पनाच मुळीं निराळी आहे. तुम्हांला पाहिजे विस्तार—आम्हांला पाहिजे प्रामाणिकपणा. तुम्हांला पाहिजे उल्हास—आम्हांला पाहिजे शांति. कळलं गोसाई, प्रेमाच्या नशाचं आम्हांला मनापासून भय वाटतं. तो नशा चढला कीं आमच्या हृदयाची धडधड थांबत नाहीं."

कांहीं तरी विचारणार होतों पण मला तिनं बोलूं दिलं नाहीं. भावनेच्या भरांत ती सारखी बोलत होती, "तें आम्हांला खरंही वाटत नाहीं. त्यांतली धडपड ज्यावेळीं थांबते त्यावेळीं कुठं आम्हांला वाटतं, कीं आतां जगायला जागा आहे. अहो नवे गोसाई, निर्भय होण्यापेक्षां प्रेमाचं अंतरंग मिळावं, यापेक्षां बायकांची मोठी अपेक्षा नसते. पण तुम्हां लोकांकडे तो जिन्नसच मुळीं नाहीं तर मिळणार कुठून ?"

मी विचारलं, "मिळणार नाहीं अशी खात्री आहे ?"

वैष्णवी म्हणाली, "पूर्ण खात्री आहे म्हणूनच ही तुम्हां लोकांची बढाई मला

सहन होत नाहीं. ”

मी आश्चर्यचकित झालों. मी म्हटलं, “ कमललता, तुझ्यासमोर मी कधींच बढाई मारली नाहीं. ”

ती म्हणाली, “ कळून सवरून नाहीं. पण तुमचं हें उदासीन बैराग्यासारखं मन—याच्यापेक्षां जगांत अहंकाराचं दुसरं कुठलं लक्षण आहे का ? ”

“ पण या दोन दिवसांत तूं माझा एवढा अंदाज घेतलास कसा ? कसं कळलं तुला ? ”

“ कळलं, तुमच्याकडे माझं मन ओढतं म्हणून. ”

तिचे ते उद्गार ऐकून मी आपल्या मनाशींच म्हणालों, “ तुझं दुःख आणि डोळ्यांतलीं टीपं यांतला भेद मला कुठं कळलाय कमललता. सदोदित भावनेची पूजा आणि रसाची आराधना करीत राहिलं कीं हे असंच व्हायचं. ”

मी उघड विचारलं “ खरोखरच का तुझं मन ओढ घेतं कमललता ? ”

“ अगदीं खरोखर. ”

“ पण तुझं जपजाप्य, तुझं कीर्तनभजन, अहोरात्र देवसेवा, याचं काय होणार ? सांग ना ? ”

वैष्णवी म्हणाली, “ हीं सारीं त्याहीपेक्षां मोठीं सत्यं आहेत—या साऱ्याचं सार्थक होईल त्यामुळं! चला ना गोसाई, हें सारं सोडून दोघेजण रस्तोरस्तीं हिंडत निघूं. ”

मी नकार देत म्हटलं, “ तें होणं नाहीं कमललता. उद्यां मी इथून जाणार. जायच्यापूर्वी गोहरची हकिकत कळली पाहिजे मला. ”

एक सुस्कारा सोडून वैष्णवी नुसती म्हणाली, “ गोहरची हकिकत ! नाहीं. ती ऐकण्यांत तुम्हांला काय फायदा ? पण खरोखरच का उद्यां जाणार ? ”

“ हो. उद्यां गेलंच पाहिजे. ”

वैष्णवी कांहीं वेळ स्तब्ध राहून म्हणाली, “ पण पुन्हां या आश्रमांत याल त्यावेळीं कमललता तुम्हाला इथं भेटणार नाहीं गोसाई. ”



## ८

आतां यापुढं इथं एक घटकाभर सुद्धां रहायचं नाहीं असं माझ्या मनानं घेतलं. पण त्याचवेळीं कुणी तरी आड उभं राहून डोळ्यानं खूण करीत ‘ नको ’ म्हणत मला सांगत होतं, ‘ कां जातो आहेस ? सहासात दिवस रहाणार म्हणून

तर आलास. मग राहिनास का ? इथं त्रास तर कांहीं नाहीं. '

रात्रीं बिछान्यावर पडून विचार करीत होतों. एकाच देहांत वास करीत असतांना एकाच वेळीं बरोबर उलटसुलट मतलब देणारी कोण ही ? कुणाचं अधिक खरं मानायचं ? जास्त आपुलकी कुठं आहे ? विवेकबुद्धि, मनःप्रवृत्ति—कितीतरी नांवं आहेत. कितीतरी दार्शनिक व्याख्याही आहेत. पण आजपर्यंत निःसंदेह सत्याची कधीं कुणी प्रतिमा केली आहे ? जें बरं म्हणून वाटतं तिकडे पाऊल टाकायला अडथळा कां येतो ? आपल्याच ठिकाणीं असा विरोध कसा ! या दुहीचा शेवट कां होत नाहीं ? मन म्हणतं, ' जाणं हेंच योग्य—इथून जाण्यांतच कल्याण आहे—पण दुसऱ्याच क्षणाला त्याच मनाचे दोन्हीं डोळे आंसवांनीं भरून येतात तें कां म्हणून ? बुद्धि, निषेध, प्रवृत्ति, मन—या सर्वांच्या आधारावर खरं समाधान कुठून मिळणार ?

तरीही गेलं हें पाहिजेच. माघार घेऊन चालणार नाहीं—आणि तेंही उद्यांच. हें जायचं कसं याचाच विचार करीत होतों. लहानपणची एक संवय आठवली—एकदम गडप व्हायचं, निरोप घ्यायचा नाहीं. पुन्हां यायची औपचारीक भाष । करायची नाहीं, कारण सांगायचं नाहीं, कुठं तरी काय आहे—जरुरी आहे याचं विस्तृत विवरण करायचं नाहीं—केवळ आज होतों आणि उद्यां नाहीं एवढीच घटना जें मागं रहातील त्यांच्या न बोलतां ध्यानीं यावी.

मी ठरवलं, आतां झोंपायचं नाहीं. देवाची आरती सुरू व्हायच्या पूर्वीच काळोखांतून एकदम नाहींसं व्हायचं. एक अडचण होती—पुंटूच्या हुंड्यासाठीं आणलेले पैसे कमललतेकडे दिलेल्या धाकट्या बॅगेंत होते—पण वाटलं, राहूं देत ते तिथंच. कदाचित् कलकत्त्याहून नाहींतर ब्रह्मदेशांतून पत्र लिहावं. त्यामुळं आणखी एक काम होईल. कमललतेनं आग्रह केला तर आतां चिनतक्रार इथं रहावं लागेल—पुन्हां कुठं तरी भटकायचा योग दुरावेल असं वाटलं, जे थोडेसे पैसे माझ्या खिशांत होते ते कलकत्त्याला पोंचायला पुरेसे होते.

असा विचार करण्यांत केवढी तरी रात्र गेली. झोंप येऊं द्यायची नाहीं असा संकल्प होता म्हणूनच कीं काय, केव्हां झोंप आली तें कळलं नाहीं—किती वेळ झोंपीं गेलों होतों तें कळलं नाहीं.—पण वाटलं; स्वप्नांत गाणं ऐकूं आलं. रात्रीचे कार्यक्रम अजून संपले नसावेत असं एकदां वाटलं—पुन्हां वाटलं कदाचित् पहाटेची काकडआरती सुरू झाली असावी, पण तासघंटाचा तो

ओळखीचा आवाज ऐकूं आला नाहीं. अपुरी निज मोडतां मोडेना—डोळे झांकून पडूनही रहावेना पण प्रभातची भूपाळी कुणीतरी हळूहळू गोड आवाजांत गात आहे असं कानीं आलं. 'जाग राधे ऊठ राधे शुकसारिका हांक देती! कृष्णमाणिकाच्या वक्षःस्थलीं किती निद्रा घेशी !"

'अजून किती झोंप घेणार गोसाई, उठा ना !' मच्छरदाणी गुंडाळली होती. पूर्वेची खिडकी उघडलेली होती. समोर आंब्याच्या डहाळीवर फुलांनीं ओथंबलेली लवंगलता खालपर्यंत ओथंबून आली होती. तिच्या डहाळयांतून मधून मधून आकाशाचा फिक्का रंग नजरेला आला—काळोख्या रात्रीं जसा कांहीं दूरच्या गांवांत कुठंतरी आग लागल्याचा उजेड दिसावा तसा. मन कसं खिन्न झाल्यासारखं वाटलं. एक दोन पाखरं उडत आपल्या घरट्यांत येत असलेलीं दिसलीं. त्यांच्या पंखांची अस्पष्ट फडफड कानीं आली तेव्हां वाटलं, कांहीं का झालं असेना, रात्र संपली होती खरी. कोकिळा, बुलबुल आणि साळुंक्यांचा हा देश—कदाचित् यांची राजधानी कलकत्ता शहरांत असावी. हा प्रचंड बकुलवृक्ष म्हणजे त्यांच्या देवघेवीची जागा असलेला बडाबाजार. दिवसाची गर्दी पाहिली कीं थक्क होऊन जायला होतं. निरनिराळे चेहरे, निरनिराळ्या भाषा, निरनिराळे रंगीबेरंगी पोषाख, असा हा मोठा विचित्र जमाव जमून आलेला. शिवाय रात्रीं आखाड्याचा चोहीं बाजूला जंगलांतून झाडाच्या प्रत्येक फांदीवर त्यांचा बेसुमार अड्डा बसलेला. त्यांची झोंप मोडल्याचा बारीक सारीक आवाज ऐकूं येऊं लागला त्यावेळीं वाटलं, कीं हाततोंड धुवून ते बाहेर निघायच्या तयारीला लागले असावेत. आतां सारा दिवसभर चालणारा नाचगाण्याचा महोत्सव सुरू होईल. सगळेच जसे कांहीं लखनौचे उस्ताद. थकत नाहींत कीं रियाजाही थांबवीत नाहींत !

आंत वैष्णवलोकांच्या कीर्तनभजनाचा घोष कदाचित् बंद होईल पण बाहेरच्यांना त्याची पर्वा नाहीं. इथं लहानमोठा, बरं वाईट, याची कदर नाहीं. इच्छा नसो कीं वेळ नसो, गाणं तुम्हांला ऐकलंच पाहिजे. या देशाची ही रीतच असावी काल उभ्या दुपारीं मागील बाजूच्या वेळूच्या बेटांत दोन हरगौरी पक्षी चढ्या आवाजांत 'पिया, पिया, पिया' करीत सारखे ओरडत माझ्या वामकुक्षीला अडथळा करीत होते त्याची मला आठवण झाली. माझ्याच सारखा चिडलेला तसाच कुणी डाहुक पक्षी नदीच्या कांठच्या वृक्षावर बसून त्याहीपेक्षां मोठ्या आवाजानं सारखा शंखनाद करीत होता—मुळींच थांबत नव्हता. भाग्य

एवढंच, कीं या भागांत मोर नव्हते. या साऱ्या उत्सवांत त्यांनीं येऊन भाग घेतला असता मग मात्र माणसाची धडगत नव्हती.

तें कांहीं असो, दिवसाची गडबड अजून सुरू झाली नव्हती. कदाचित् आणखीही कांहीं वेळ बिनघोर झोंप घेतां आली असती. पण गेल्या रात्रीचा संकल्प आठवला. झुकांडी द्यायचा योग कांहीं साधला नाहीं. पहारेकऱ्याच्या हुषारीमुळं माझा बेत सफशेल फसला होता.

मी चिडून म्हणालों, " मी राधा नाहीं कीं माझ्या बिछान्यावर शामही नाहीं, भर मध्यान्ह रात्रीं माझी झोंप कां मोडलीस सांग ना ? "

वैष्णवी म्हणाली, " आतां रात्र कुठं आहे गोसाई ! आज पहाटेच्या गाडीनं कलकत्त्याला जाणार होतां ना ? एकदां हात तोंड धुवून घ्या. मी चहा तयार करून आणतें. मात्र स्नान करूं नका हं. ती संवय नाहीं तुम्हांला ! उगीच आजारी पडायला व्हायचं. "

मी म्हटलं, " शक्य आहे ! कांहीं होवो सकाळच्या गाडीनं मी जाणार. पण तुला एवढा हुरूप कसला आलाय सांग ना. "

ती म्हणाली, " बाकीचे कुणी जागे व्हायच्या पूर्वी मी तुम्हांला मोठ्या रस्त्यापर्यंत पोंचवून येईन म्हणतें. "

तिचा चेहरा चांगलासा दिसला नाहीं. पण त्या अस्पष्ट प्रकाशांत मला दिसून आलं, कीं पाठीवर सोडलेले तिचे केंस भिजलेले असावेत. स्नानबिन करून ती आलेली असावी.

मी म्हटलं, " मला पोंचवून पुन्हां आश्रमांतच येणार आहेस ना ? "

वैष्णवी म्हणाली, " होय " ! पैशाची छोटी बॅग माझ्या बिछान्यावर ठेवून ती म्हणाली, " ही तुमची बॅग–वाटेंत संभाळून ठेवा. एकदां पैसे मोजून बघा."

काय बोलावं तें जीभेवर येईना तरीपण मी म्हटलं, " हा मार्ग पत्करण्यांत तुझी चूक झाली आहे कमललता. एकेवेळीं उषा हें तुझं नांव होतं. आज तूं तीच उषा आहेस. एवढासुद्धां फरक झाला नाहीं तुझ्यांत. "

" असं कां म्हणतां ? "

" पैसे मोजून पहा असं कां म्हटलंस मला ! मी ते पैसे मोजून पाहिले असते असं का तुला वाटलं ? ज्यांच्या मनांत एक अन् बाहेर बोलण्यांत एक, असं असतं त्यांना दांभिक म्हणतात. जातांना बड्या गोसाव्यांना मी भेटून सांगणार

कीं आखाड्याच्या यादींतून तुझं नांव काढून टाका म्हणून. वैष्णवांच्या मंडळाला तूं कलंक आहेस. ”

ती उगीच राहिली. मीही क्षणभर मुकाट्यानं बसलों आणि नंतर म्हणालों, “आज सकाळीं जावंसं वाटत नाहीं मला. ”

“ नाहीं ? मग आणखी थोडी झोंप काढा तर. जागे झालांत कीं मला कळवा —कसं ? ”

“ पण आतां तूं काय करणार आहेस ? ”

“ मला काम आहे. फुलं आणायचीं आहेत, ”

“ या काळोखांत भीति वाटत नाहीं तुला ? ”

नाहीं, भीति कसली ? सकाळच्या पूजेचीं फुलं मीच रोज आणतें. नाहीं तर मोठी अडचण होते त्यांची. ”

त्यांची म्हणजे बाकीच्या वैष्णवींची ! या दोन दिवसांत मला दिसून आलं होतं, कीं सर्वांपासून एका बाजूला राहून मठाची सर्व जबाबदारी एकटी कमललता वहात होती, प्रत्येक बाबतींत कोणाच्याहीपेक्षां तिचं कर्तृत्व जास्त दिसून येत असे. सौजन्य, आणि सर्वांपेक्षां मुकाट्यानं काम करायची कुशलता या ठिकाणीं एवढ्या सुयंत्रितपणें दिसून येत होती, कीं कुठंही द्वेषमत्सराचा एवढा सुद्धां कचरा जमत नव्हता. या आश्रमांतल्या सर्व स्त्रिया उत्कंठेनं, कळकळीनं सर्वत्र वावरत होत्या. या सर्व पुरुष आणि स्त्रिया निश्चितपणानं वावरत असतां, निरुपायानं दुर्गतीच्या मार्गालाही जाऊं लागतील अशी कल्पना मनांत येऊन माझं अंतरंग व्याकुळ होऊन उठलं.

दोनच दिवस या मठांत मी राहिलों पण एकप्रकारें या जागेचा मला लळा लागला. या आश्रमाचं कल्याण व्हावं अशीच सदिच्छा माझ्या अंतरंगांतून निघूं लागली. लोक म्हणतात—उगीच म्हणतात—कीं सगळे गोळा झाले कीं आश्रम. पण इथं मात्र सारेच समान होते. एकाच्या उणीवेमुळं केंद्रभ्रष्ट होणाऱ्या उपग्रहा-प्रमाणें सारी सुव्यवस्था चोहोंबाजूंला उधळून जाईल असं अगदीं मला समोरा-समोर दिसून आलं.

मी म्हटलं, “ पुरे झाली झोंप आतां. चल तुझ्याबरोबर फुलं काढायला येतों. ”

वैष्णवी म्हणाली, “ तुम्हीं स्नान केलं नाहीं, वस्त्र बदललं नाहीं, तुमच्या हातचं फुल देवाला चालेल कसं ? ”

मी म्हटलं, “फुलं नाहीं काढीत हवं तर. पण डहाळी तर वाकवायला देशील ? तेवढीच तुला मदत.”

वैष्णवी म्हणाली, “डहाळी वांकवायची जरूरीच नाहीं. झाडं अगदीं लहान आहेत. माझा हात सहज पोंचतो.”

मी म्हटलं, “बरं, बरोबर येऊन सुखदुःखाच्या चार गोष्टी बोलायला तरी हरकत नाहीं ना ? तेवढेच तुझे श्रम हलके होतील.”

आतां मात्र वैष्णवी हंसली. म्हणाली, “एकदम एवढा जिव्हाळा कां आला ? बरं चला. मी परडी घेऊन येतें. तितक्यांत तुम्हीं तोंड धुवून कपडे बदला.”

आश्रमाच्या बाहेर थोड्याशा अंतरावर फुलांची बाग होती. आमराईच्या गर्द झाडींतून तिकडे जायला रस्ता होता. नुसता काळोख होता म्हणूनच नव्हे, पण वाळलेलीं पानं पडल्यामुळं मळलेली पायवाट दिसत नव्हती. वैष्णवी पुढं—मी मागं-असे चाललों होतों, तरीसुद्धां मला भीति वाटत होती, कीं चट्कन् एखाद्या सापावर पाय पडायचा. मी म्हटलं, “रस्ता चुकणार तर नाहींस ?”

वैष्णवी म्हणाली, “नाहीं. निदान तुमच्यासाठीं तरी आज रस्त्याची ओळख ठेवून चाललं पाहिजे मला.”

“कमललता, माझं एक सांगणं ऐकशील ?”

“काय तें ?”

“तूं इथून कुठं जाऊं नकोस.”

“गेलें तर तुमचं काय बिघडलं ?”

मला उत्तर सुचेना. मी उगीच राहिलों. वैष्णवी म्हणाली, “मुरारी ठाकूरचं एक गाणं आहे. ‘सखी जा फिरुनी अपुल्या घरीं। जीवंत मरुनी जये स्वतःसी भक्षिलें, त्यास कुणी समजाविल परी।’ गोसाई, दुपारीं तुम्हीं कलकत्त्याला जाणार. आजच्यापुरतं आणखी कांहीं वेळ रहाणं शक्य नाहीं का तुम्हांला ?”

मी म्हटलं, “कुणी सांगावं. आधीं सकाळ तर उजाडूं दे.”

वैष्णवीनं उत्तर दिलं नाहीं. थोड्यावेळानं ती हळूहळू गाऊं लागलीः—

“चंडिदास म्हणे ऐक विनोदिनी सुख दुःख दोघे बंधू।
सुखाशेनें करी जो प्रीति त्या जीवा दुःख पाही सदा वेधूं॥”

ती थांबली असं पाहून मी म्हटलं, “मग पुढं ?”

“मग पुढं काय तें मला माहित नाहीं.”

मी म्हटलं, “ तर मग दुसरं कांहीं तरी गा ना. ”

वैष्णवी तशीच हलक्या आवाजांत गाऊं लागली:—

चंडिदास वाणी, ऐक विनोदिनी, प्रीतीची मुकी बोली ।

प्रीतीच्या आशेनें प्राण दे जो तया, प्रीति सहज हातीं आली ॥

यावेळींही ती थांबली त्यावेळीं मी म्हटलं, “ मग पुढं ? ”

वैष्णवी म्हणाली, “ मग पुढं कांहीं नाहीं. इथंच त्याचा शेवट. ”

शेवट खरा ! दोघंही कांहीं वेळ उगीच राहिलों होतों. धांवत तिच्याजवळ जाऊन कांहीं तरी बोलावं आणि काळोखांत तिचा हात धरून चालूं लागावं असं फार फार वाटलं. तिला राग येणार नाहीं, ती नाहीं म्हणणार नाहीं असं जरी मला वाटत होतं तरी माझं पाऊलही उचलेना आणि तोंडांतून शब्दही निघेना. जसा चालत होतों तसाच हळुहळू जपून चालत एक शब्दसुद्धां न बोलतां झाडीच्या बाहेर येऊन पोंचलों.

रस्त्याच्या बाजूला कुंपण घातलेला आश्रमाचा फुलांचा बगीचा होता. रोजच्या पूजेकरितां फुलं या बागेंत मिळत असत. झाडींतून उघड्यावर आल्यावर काळोख जरी कमी झाला तरी दिशा फारशा फांकल्या नव्हत्या. तरीही फुललेल्या मल्लीकांच्या मोठमोठ्या फुलांनीं भरलेला तो बगीचा पांढराच पांढरा दिसत होता असं मला दिसून आलं. समोरच्या पानं झडलेल्या काटकुळ्या चांफ्यांच्या झाडावर एकही फूल नव्हतं. पण त्याच्याच आजुबाजूला कुठं तरी अकालीं फुललेल्या चार दोन रातराणीच्या मधुर सुवासानं चांफ्याची उणीव भरून काढली होती.

आणि सर्वांत मनोहर दिसत होता तो बागेचा मध्य. रात्र संपून नुकत्याच फांकणाऱ्या दिशांच्या प्रकाशांत पानांगणिक फुललेल्या स्थलपद्मांच्या पांच सहा झाडांवर केवढी शोभा आली होती ! कितीतरी फुलं तीं ! तीं फुललेलीं फुलं पहातांच रागानं लाल झालेले असंख्य डोळे बागेंतून चोहींकडे पहात आहेत असं वाटूं लागे.

इतक्या लौकर बिछान्यावरून उठायची मला केव्हांच संवय नव्हती. हा पहांटेचा काल सदोदित ऐन गाढ झोपेंत असतांनाच जात असे. आज या उषःकालाचा अनुभव घेऊन काय वाटलं तें मला सांगतां येणार नाहीं.

पूर्व दिशेला क्षितिजावर तांबड्या प्रकाशाचा आभास दिसूं लागला होता. निःशब्द वैभवानं सारं आकाश शांत झालं होतं. इकडे लतापल्लवांनीं शोभिवंत दिसणारं आणि असंख्य फुलांच्या सुवासानं दरवळलेलं उपवन दिसत होतं.

सर्वांचा मेळ घालून पाहिलं त्यावेळीं असं वाटलं, कीं ही शेवटच्या रात्रीची निरोप घेतांनाची गहिवरलेली शब्दहीन भाषा असावी.

करुणेनं, ममतेनं आणि अयाचित दाक्षिण्यानं माझं सारं अन्तरंग एका निमिषांत भरपूर होऊन उठलं. मी चटकन् बोलून गेलों, " कमललता, आयुष्यांत तूं अनेक दुःखं, अनेक यातना सहन केल्यास. आतां यापुढं तरी सुखी हो. एवढीच माझी इच्छा. "

चांफ्याच्या डाहाळीला झुलवून ती फुलं तोडून परडींत घेत होती तोंच एकदम चकित होऊन वळून म्हणाली, " एकदम तुम्हांला झालं काय गोसाई ? "

माझेच शब्द माझ्याच कानाला कसेसेच लागले होते, तेव्हां तिच्या त्या विस्मयपूर्ण प्रश्नानं मी अगदींच ओशाळून गेलों. बोलायला शब्द सुचेनात. अस्वस्थपणा झांकण्यासाठीं उगीच हंसायचा प्रयत्न करून पाहिला, तो जमेना, शेवटीं नाइलाजानं उगीच राहिलों.

वैष्णवी फुलझाडांच्या गर्दींत शिरली. मीहीं तिच्याबरोबर गेलों. फुलं तोडीत असतांना ती आपण होऊन म्हणाली, " मी चांगली सुखांत आहें. ज्याच्या पदकमलावर मी आत्मनिवेदन केलं आहे तो दासीला कधींही अन्तर देणार नाहीं. "

तिच्या या भाषणांतला अर्थ स्पष्ट झाला नव्हता असं मला वाटलं. त्यांत श्लेष तर नव्हता ? पण स्पष्ट भाषेंत बोल, असं म्हणायचाही धीर होईना. ती हलुहळू गाऊं लागली:—

काळ्या माणिकाची गळां गुंफुन वाहीन माळ ।
कृष्णगुण यशगान कानीं किरीट कुंडल ।
कृष्णाच्या अनुरागें रंगी वसन करुनि परिधान,
देशोदेशीं भ्रमण करिन मी होऊनिया जोगीण ।।
यदुनाथ दास म्हणे—"

आतां थांबवावंच लागलं.

" यदुनाथ दास राहूं दे. तिकडे घंटा वाजूं लागल्याहेत त्या ऐकूं येतात ना ? आतां जायचं नाहीं का परत ? "

ती माझ्याकडे पाहून हंसली आणि पुन्हां गाऊं लागली:—

धर्मकर्म जळो भय न त्याचें वाटे ।
मनाच्या भ्रमें माझा सखा हारवीन, हें भय चित्तीं दाटे ।—

" बरं आहे नवे गोसाई, बायकांच्या तोंडचं गाणं ऐकणं पुष्कळांना आवडत नाहीं. फार खराब वाटतं कित्येकांना! माहीत आहे ?"

मी म्हटलं, " माहीत आहे–पण इतका उत्तम जंगली मी नाहीं."

" मग मधेंच तोंड घालून मला थांबवलंत कां ?"

" इकडे आरती सुरू झाली आहे, तूं तिथं नसलीस तर उणिव भासेल."

" हें नुसतं ढोंग आहे गोसाई."

" मी ढोंग कां करीन ?"

" कां तें तुमचं तुम्हांला ठाऊक. पण हें तुम्हांला कुणी सांगितलं ? मी नसलें तर देवाच्या सेवेंत खरोखरच उणिव भासेल असं तुम्हांला मनःपूर्वक वाटतं का ?"

" हो वाटतं—मला कुणी तसं सांगितलं नाहीं कमललता—मी स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिलंय."

ती नंतर कांहीं बोलली नाहीं. क्षणभर कोरड्या नजरेनं माझ्याकडे पहात राहिली आणि नंतर फुलं तोडूं लागली. परडी भरलेली पाहून ती म्हणाली, " पुरे झालीं आतां."

" स्थलपद्मं काढलीं नाहींस ?"

" नाहीं, तीं आम्हीं तोडीत नाहीं. इथूनच देवाला अर्पण करतों. चला आतां जाऊं."

दिवस वर आला होता—हा मठ गांवच्या एका टोंकाला असल्यामुळं फारसं कुणी इकडे येत नव्हतं. तेव्हां रस्त्यांत कुणिच नसे—आतांही कुणि नव्हतं.

बरोबर चालत असतांना मी पुन्हां तोच प्रश्न केला, " खरोखरच तूं इथून जाणार आहेस का ?"

" पुन्हां पुन्हां हाच प्रश्न कां करतां गोसाई ?"

याहीवेळीं मला उत्तर देतां आलं नाहीं. केवळ मी स्वतःच स्वतःला विचारलं, " वारंवार हा प्रश्न मी कां करतों आहें! काय संबंध आहे माझा या प्रश्नाशीं ?"

* * * *

मठांत आम्हीं आलों तेव्हां सारीं माणसं जागीं होऊन आपापल्या कामाला लागल्याचं दिसून आलं. तासाचा शब्द ऐकून त्यावेळीं बागेंत वैष्णवीला मी उगीच घाई केली होती. आतां मला कळलं, कीं ती आरतीची घंटा नव्हती—

देवाची झोंप मोडण्यासाठीं तें वाद्य वाजवलं जात असे. तें देवापुरतंच होतं.

आम्हां दोघांकडे सारींच जणं पहात होतीं. पण कुणाच्याही पहाण्यांत चौकसपणा नव्हता. पद्मा तेवढी वयानं अगदींच लहान असल्यामुळं आमच्याकडे पाहून मान खालीं घालून हंसली. देवाच्या माळा गुंफण्याचं काम तिच्याकडे होतं. फुलांची परडी तिच्याजवळ ठेऊन कमललता मोठ्या लाडिकपणानं रागाचा भाव आणून म्हणाली, " कां हसलीस ग कारटे ? "

तिनं वर नजर करून पाहिलं नाहीं. कमललता देवघरांत निघून गेली आणि मीही माझ्या खोलींत येऊन बसलों.

नित्याप्रमाणें स्नान भोजन योग्यवेळीं योग्य प्रकारें झालं. दुपारच्या गाडीनं जायचं असं मी म्हणत होतों. वैष्णवीला शोधायला गेलों, तों ती देवघरांत पूजा बांधीत असल्याचं दिसून आलं. मला पाहातांच ती म्हणाली, " नवे गोसाई, आलांच आहांत ते मला जरा मदत करा ना. डोकं दुखतं म्हणून पद्मा तिकडे पडली आहे, लक्ष्मी सरस्वती—दोन्हीं बहिणींना ताप आला आहे, काय होणार आहे कोण जाणे ! या बसंती रंगाच्या वस्त्राच्या निऱ्या जरा चुणून द्या ना गोसाई !"

साहजिकच देवाची वस्त्र चुणीत बसलों—जाणं घडलं नाहीं. दुसऱ्या दिवशींही गेलों नाहीं अन् त्याच्या दुसऱ्या दिवशींही गेलों नाहीं. वैष्णवी पहांटे फुलं आणायला निघाली, कीं तिच्याबरोबर जात होतों. सकाळीं, दुपारीं, संध्याकाळीं, कसलं ना कसलं तरी काम ती माझ्याकडून करून घेत असे.

अशा प्रकारें स्वप्नांतल्यासारखे दिवस जात होते. देवसेवा सहज रीतीनं करतांना आनंदानं आराधना करतांना, फुलं, गंध, पूजाकीर्तनांत वेळ जात होता.

पक्ष्यांचं गाणं तसंच चाललं होतं. कशांतच खूट नव्हती; तरीपण माझ्या संदिग्ध मनांत मधून मधून जाग येत असे. स्वतःलाच दोष देऊन मी म्हणत असें, ' कसला हा पोरखेळ ? बाहेरच्या जगाशीं लागलेला सारा संबंध तोडून चारदोन निर्जीव दगडी बाहुल्यांसाठीं काय हा गोंधळ चालला आहे ? एवढी मोठी आत्मवंचना करून घेऊन माणूस जगतो तरी कसा ? '

तरीही तें सारं कांहीं बरं वाटत होतं. जावं जावं म्हटलं तरी पाय बाहेर निघत नव्हता. या भागांत मलेरियाची साथ जरी बरीच कमी होती तरीही बरींच माणसं तापानं पडलीं होतीं, गोहर एकच दिवस येऊन गेला—पण पुन्हां आला नाहीं. त्याची खबर घ्यायला सुद्धां मला वेळ मिळूं नये, हें असं झालं आहे तरी काय ?

एकाएकीं मनांत वादळ उठलं—स्वतःचंच भय वाटलं. स्वतःचाच धिक्कार करीत मी म्हटलं, " हें मी काय चालवलं आहे ? सहवासाच्या दोषानं एक दिवस हें सारं खरं आहे असंच मला वाटूं लागणार का ? " मी निश्चय केला, " झालं एवढं पुरं झालं—काय होईल तें होवो ही जागा सोडून उद्यां इथून पळालंच पाहिजे ! "

रोज रात्र संपण्याच्या सुमाराला वैष्णवी येऊन मला जागं करीत असे. वैष्णव कवींची पहांटेच्या सुरावरची ती भूपाळी असे. भक्ति आणि प्रेम यांचं केवढं करुण स्वरूप त्या गाण्यांत असे ! म्हणूनच मी सहसा 'ओ' देत नसें. कान देऊन ऐकत असें. डोळयांच्या कोपऱ्यांत आंसवं सांचत असत. मच्छरदाणी गुंडाळून ती खिडक्यादरवाजे उघडून टाकी. रागारागानं मी उठून बसें आणि हातपाय धुवून वस्त्र बदलून तिच्या बरोबर जात असें.

कित्येक दिवसांच्या या संवयीमुळं आज माझी झोंप मोडली. खोलींत काळोख होता. रात्र संपली नाहीं असं एकदां वाटलं—पण संशय आला. बिछाना सोडून बाहेर येऊन पाहिलं—रात्र संपली होती इतकंच नव्हे, तर चांगलं फटफटीत उजाडलं होतं. कुणी तरी खबर दिली तेव्हां कमललता येऊन हजर झाली.

तिचा चेहरा इतका उतरलेला यापूर्वीं कधींच माझ्या नजरेला आला नव्हता.

मी घाबरून विचारलं, " आजारी आहेस का ? "

खिन्नपणानं हंसून ती म्हणाली, " आज तुम्हीं जिंकलंत गोसाई ! "

" तें कसं काय ? "

" आज तेवढंसं बरं वाटत नाहीं. वेळीं जागी झालें नाहीं. "

" मग आज फुलं आणायला गेलं कोण ? "

आंगणाच्या कडेला एका अर्धमेल्या तगरीच्या झाडावर थोडींबहुत फुलं दिसत होतीं तीं दाखवून ती म्हणाली, " यावेळीं कसंही करून एवढ्यावरच भागवून घेतलं पाहिजे. "

" पण देवाच्या गळयांतील माळ ? "

" माळ आज घालतां यायची नाहीं. "

ऐकतांच मला चमत्कारिक वाटलं. त्या निर्जीव बाहुलीची दया आली. मी म्हटलं, " स्नान करून मी फुलं आणून देतों. "

" मग द्या तर, पण एवढ्या लवकर स्नान करणं बरं नव्हे. आजारी पडायला होईल. "

मी विचारलं, “ बडे गोसाई कुठं दिसत नाहींत ते. ”

वैष्णवी म्हणाली, “ ते इथं नाहींत. परवांच आपल्या गुरुजींना भेटण्यासाठीं नवद्वीपला गेले आहेत. ”

“ ते केव्हां येणार ? ”

“ तें मला माहित नाहीं गोसाई. ”

इतके दिवस मी मठांत राहात असूनही द्वारकादास बैराग्याबरोबर माझं फारसं जुळलं नाहीं. थोडासा तो माझाच दोष होता—पण तसं पाहिलं तर त्यांचाही स्वभाव असाच निर्लिप्त होता. या माणसाला कपट माहित नव्हतं. अनाचार माहित नव्हते, दुसऱ्यावर सत्ता गाजवायची हौस नव्हती. स्वतः वैष्णवीही असंच म्हणत असे अन् मीही प्रत्यक्ष पहात असें. वैष्णव धर्मग्रंथ घेऊन बहुतेक सारा वेळ तो एकाद्या खोलींत एकटाच बसत असे. त्याच्या धर्ममतावर माझा विश्वास नव्हता—आस्थाही नव्हती. पण हा माणूस बोलण्यांत इतका नम्र, दिसण्यांत एवढा निर्मळ आणि गंभीर, विश्वास आणि निष्ठेनं त्याचं अंतःकरण एवढं भरगच्च झालेलं दिसे, कीं त्याच्या मताच्या आणि पंथाच्या बाबतींत विरोधक चर्चा करायला मला नुसता संकोच वाटे, एवढंच नव्हे, तर दुःख होत असे. या माणसाशी वादविवाद करण्यांत अर्थ नाहीं हें आपोआप कळून येई. एके दिवशीं एका सामान्य बाबतींत मी युक्तिवाद करूं लागलों त्यावेळीं एक शब्दसुद्धां न बोलतां तो माझ्याकडे अशा रीतीनं पहात राहिला, कीं त्याची ती मुद्रा पाहूनच मला पुढं बोलायला सुचेना.

तेव्हांपासून शक्य तेवढं करून मी त्याला टाळीत असें. तरीही मला जिज्ञासा वाटत होती. एवढ्या स्त्रिया आजुबाजूला गोळा करून निरवच्छिन्न रसिकतेचं अनुशीलन करण्यांत निमग्न झालेला हा माणूस, चित्ताची शांति आणि देहाचा निर्मळपणा कसा राखूं शकतो याचं रहस्य एकदां त्यालाच विचारावं असं मला वाटत असे. पण हा सुयोग यावेळीं तरी मला लाभला नाहीं. पुन्हां केव्हां आलों तर विचारीन असं मी आपल्या मनाशीं ठरवलं.

वैष्णवांच्या मठांत पूजेच्या मूर्तींला ब्राह्मणाखेरीज इतर कुणीही स्पर्श करायचा नाहीं अशी जी प्रथा असे ती या आश्रमांत पाळली जात नसे. देवाचा वैष्णव पुजारी बाहेर कुठं तरी रहात असे. तो येऊन नित्याप्रमाणें आजही पूजा करून निघून गेला पण देवाच्या इतर सेवेचा भार आज बराचसा माझ्यावर येऊन पडला

होता. वैष्णवी दाखवून देत होती अन् मी तें तें करीत होतों. पण हीं देवकृत्य करीत असतांना माझं अंतरंग मला डांचत होतं. कसा मी या वेडप्यांच्या फंदांत सांपडलों ?

तात्पर्य काय, आजही जायचं राहिलं. इतके दिवस इथं राहिलों. संकटांत असलेल्या माणसांना सोडून जायचं कसं, अशी मी आपल्या मनाची कशीबशी समजूत करून घेतली. कृतज्ञता म्हणून या जगांत कांहीं आहे ना ?

आणखी दोन दिवस गेले. आतां बस्स झालं. कमललता बरी झाली. पद्मा आणि लक्ष्मीसरस्वति या दोन्ही बहिणी बिछान्यांतून उठल्या. गेल्या संध्याकाळीं द्वारकादासही आले. त्यांचा निरोप घ्यायला गेलों त्यावेळीं गोसाईजी म्हणाले, "आज जाणार गोसाई ? पुन्हां केव्हां येणार ?"

"तें कांहीं सांगतां येत नाहीं गोसाई."

"पण कमललता रडून रडून अर्धमेली होईल!"

माझी हकिगत त्यांच्याही कानीं गेल्याचं दिसून आल्यामुळं मी मनांतल्यामनांत फार अस्वस्थ झालों. मी म्हटलं, "कशाला रडेल ती ?"

गोसाईजी हंसत म्हणाले, "तुम्हांला माहित नाहीं वाटतं ?"

"नाहीं."

तिचा स्वभावच तसा आहे. आलेलं माणूस निघून गेलं म्हणजे ती असाच जीव टाकते."

तें भाषण मला आणखी जाणवलं. मी म्हटलं, "माणसाच्या स्वभावाला उपाय काय ? ज्याला रडायचीच संवय त्याला मी थांबवणार कसा ?—" बोलत असतांना त्यांच्या डोळ्याकडे माझी नजर गेली म्हणून मी मान वळवून मागं पाहिलं, तों माझ्या मागं कमललता उभी होती.

संकोचानं द्वारकादास म्हणाले, "तिच्यावर राग धरूं नका गोसाई. तुमची बरदास्त करणं त्यांना कठीण गेलं. आजारी पडल्यामुळं त्यांनीं तुम्हांलाच राबवून घेतलं—फार कष्ट दिले. काल माझ्याकडे ती स्वतःच कुरकुर करीत होती. वैष्णव बैराग्यांची काळजी घेणारं दुसरं कोण आहे ? पण यापुढं कधीं या बाजूला येणं झालं तर आम्हां भिकाऱ्यांना दर्शन देऊन जा. याल ना गोसाई ?"

होकार देऊन बाहेर आलों. कमललता तशीच तिथं उभी होती. अकस्मात हें काय झालं ? निरोप घ्यायच्या वेळीं किती बोलेन, किती ऐकेन असं वाटलं होतं;

पण सारं कांहीं मी बिघडवून टाकलं. मनाच्या दुबळेपणामुळं आलेली ग्लानि अंतरांत हळुहळू सांठत येत होती असं वाटूं लागलं होतं. पण भांबावलेलं आणि चिरडखोर झालेलं मन अशा प्रकारें भलतंच कांहीं तरी बोलून स्वतःची मर्यादा आंखूड करून टाकील असं मला स्वप्नांतसुद्धां वाटलं नाहीं.

तितक्यांत नवीन येऊन हजर झाला. तो गोहरच्या तपासासाठीं आला होता. कालपासून तो घरीं परत गेला नव्हता. मला आश्चर्य वाटलं आणि मी म्हणालों; “ हें काय सांगतोस नवीन ? अलिकडे तो या बाजूलाही येत नाहीं. ”

नवीनला माझ्या बोलण्याचं विशेष कांहीं वाटलं नाहीं. तो म्हणाला, “ तर मग मला वाटतं कुठंतरी रानावनांत भटकत असतील. खाणंजेवणं बंद केलंय— आतां कुठंतरी सापकिरडूं चावल्याची बातमी आली कीं सुटलों ! ”

“ पण त्याचा कांहीं तपास केला पाहिजे ना नवीन ? ”

“ तपास केला पाहिजे पण कुठं तपास करायचा ? रानावनांतून भटकतांना स्वतःचा जीव घालवून बसायची मला सवड नाहीं बाबू ! पण ती कुठं आहे ? एकदां चौकशी करून पहावं तर खरं ! ”

“ ती कोण ? ”

“ पण तिला कुठली बातमी असणार नवीन ? ”

“ तिला कळणार नाहीं ? तिला सारं कांहीं माहित असतं. ”

नवीन चिडला होता म्हणून शब्दाशब्दी टाळण्यासाठीं मी त्याला मठाच्या बाहेर घेऊन आलों. मी म्हटलं, “ नवीन, खरोखरच कमललतेला कांहीं माहित नाहीं. आज तीन चार दिवस ती स्वतःच आजारी होती. आखाड्याच्या बाहेर गेली नव्हती. ”

माझ्या बोलण्यावर नवीनचा विश्वास बसेना. तो तणतणत म्हणाला, “ माहित नाहीं म्हणजे काय ? तिला सारं माहित आहे. कसली जादू जाणते ती वैष्णवी कोण जाणे. तिला माहित नाहीं म्हणतां काय ? एकदां या नवऱ्याच्या हातांत ती सांपडूं दे तर खरी, तिचं सारं भजनकीर्तन तिच्या कानाडोळ्यांतून बाहेर काढतों. बापानं एवढा पैसा ठेवला होता, पण पोरानं ह्या असल्या नादांत उडवला !– ”

त्याला शांत करण्याच्या उद्देशानं मी म्हटलं, “ कमललतेला पैसा घेऊन काय करायचं आहे नवीन ? बिचारी वैष्णवी मठांत रहाते, गाणीं गात भिक्षा मागते,

देवदेवतांची सेवा करते, दोन वेळ दोन घांस खाण्यापेक्षां तिला कसली जरूरी नाहीं. पैशाच्या मागं लागणारी ती नव्हे बरं नवीन."

नवीन थोडा थंड येऊन म्हणाला, " पैसा तिच्यासाठीं देत नाहींत तें मलाही माहित आहे. पाहिली तर चांगली घरंदाज घरची बाई दिसते. जशी मुद्रा तसंच भाषण. बडेबाबाजीही लोभी नाहींत. पण हा सारा गोतावळा पोसायचा आहे ना ?—देवाच्या सेवेच्या नांवानं बासुंदीपुरी, तूपदूध रोज हवंय ना ? नयन चक्रवर्तीला सांगतांना मी ऐकलं. आखाड्याच्या नांवानं वीस बिघे जमीन खरेदी करून दिली यांनीं, असं चाललं तर कांहींच शिल्लक रहायचं नाहीं. जें कांहीं आहे तें एक दिवशीं या बैराग्यांच्या पोटापायीं नाहींसं होईल."

मी म्हटलं, " तुझी बातमी कदाचित् खरी नसेल. नयन चक्रवर्ती असल्या बातम्या उठवण्यांत मोठा वाकबगार आहे."

नवीनला तें पटलं. ती म्हणाला, " तेंही खरं आहे. तो बामण मोठा माजोरी आहे. पण मी तरी विश्वास कां ठेवूं नये ? त्या दिवशीं कांहीं कारण नसतां माझ्या मुलीच्या नांवानं दहा बिघे जमिनीचं बक्षिसपत्र करून दिलं त्यांनीं. मी किती नको म्हटलं. पण माझं ऐकलं नाहीं. बापानं पुष्कळ ठेवून दिलं आहे खरं पण हें असं चाललं तर तें किती दिवस पुरं पडेल ? एक दिवस काय म्हणाल माहित आहे ? म्हणाले, आम्ही फकिराची अवलाद. आमची फकिरी तर कोण काढून घेत नाहीं ! आतां तुम्हींच सांगा."

नवीन निघून गेला. एक गोष्ट माझ्या ध्यानांत आली, मी इतके दिवस या मठांत कां पडून राहिलों होतों तें त्यानं एक शब्दानंही विचारलं नाहीं. विचारलं असतं तर काय उत्तर दिलं असतं कोण जाणे ! पण मनांतल्या मनांत मी शरमून गेलों.

त्याच्याकडून आणखी एक खबर कळली. काल कालिदासबाबूंच्या मुलाचं लग्न मोठ्या थाटानं झालं. सप्तमी मी विसरून गेलों होतों.

नवीनचं भाषण मी मनांतल्या मनांत ताडून पाहूं लागलों तेव्हां विजेच्या चमकेसारखी एक शंका माझ्यासमोर उभी राहिली ! वैष्णवी निघून जायच्या गोष्टी कां बोलते ? जाड्या भुंवयीवाल्या त्या कंठीबदल करणाऱ्या कुरूप माणसाच्या भीतीनं तर खास नव्हे ! त्याचं कारण गोहरच. म्हणूनच, मला वाटतं, त्या दिवशीं मी किती दिवस रहाणार याची गोष्ट निघाली असतां ती म्हणाली

होती, " मी धरून ठेवलं तर रागवणार नाहींत गोसाई. तो तसला माणूस नव्हे. पण ते येत नाहींत कां म्हणून ? " कदाचित् मनांतल्या मनांत तिला कांहीं तरी आशंका आलेली असावी. संसारांत गोहरचं मन लागत नव्हतं. आपलं म्हणायला त्याला कुणी नव्हतं. असेलनसेल तेवढा पैसा एकदां कुठं तरी उधळून टाकला कीं झालं, अस त्याला वाटे. मनांत त्याला कांहीं वाटो, पण लाभालोभाच्या गोष्टी तोंड उघडून बोलायचा त्याला धीर होत नसे. उगीच बोलण्यानं कुठं तरी दोष यावचा आपल्यावर, असं त्याला वाटे. वैष्णवीला हें माहित होतं. या अखंड बंद झालेल्या प्रेमाच्या दारावर धक्की मारली जाऊं नये, उगाच मनाचा दाह वाढू नये म्हणून त्या शांत आणि आपभोळ्या माणसाला कसंबसं टाळण्या-साठींच कमललता पळून जावं म्हणून म्हणत होती.

नवीन निघून गेला. बकुलवृक्षाच्या त्या मोडक्या पारावर एकटाच बसून मी विचार करीत होतों. घड्याळ उघडून पाहिलं, पांचाची गाडी पकडायची म्हटलं तर आतांच निघायला हवं होतं. पण रोज जाणं तहकुब करायची संवय एवढी अंगवळणी पडली होती, कीं घाई करून उठून निघायला मन घेईना.

कुठंही असलों तरी पुंटूला अहेर करायला यायची मी कबुली दिली होती. नापत्ता झालेल्या गोहरचा तपास करणंही अवश्य होतं. आजवर अनावश्यक अनुरोध मानीत आलों. पण आज खरोखरच जरुरीचं कारण होतं म्हणून कुणी अडथळा केला नसता.

पद्मा येत असलेली दिसली. ती जवळ येऊन म्हणाली, " तुम्हांला आक्का बोलावते आहे गोसाई."

फिरून आंत गेलों. अंगणांत उभी असलेली वैष्णवी म्हणाली, "कलकत्त्याला घरीं पोंचायाला तुम्हांला रात्र होईल. देवाचा प्रसाद आणून ठेवलाय. आंत खाऊन जा."

रोजच्या सारखीच सारी बरदास्त होती. इथं आग्रह करायची चाल नव्हती. जरूर असेल तेवढं मागून घ्यायचं. ताटांत कांहीं टाकायचं नाहीं.

निघायच्या वेळीं वैष्णवी म्हणाली, " पुन्हां याल ना नवे गोसाई ? "

" तूं रहाणार आहेस का इथं ? "

" आतां तुम्हींच सांगा, किती दिवस राहूं ? "

" आतां तूंच सांग, मी केव्हां आलं पाहिजे ? "

" नाहीं. तें मी सांगणार नाहीं. "

" बरं, नाहीं तर नाहीं. आणखी एक प्रश्न विचारतों त्याचं उत्तर देशील ? "

आतां वैष्णवी थोडंसं हंसून म्हणाली, " नाहीं. तेंही मी सांगणार नाहीं तुम्हांला. तुमच्या मनाप्रमाणं तुम्हीं काय तें ठरवा. एके दिवशीं तुम्हांला आपोआप त्याचा जबाब मिळेल ! "

पुन्हां पुन्हां तोंडावर शब्द येत होते—' आज आतां वेळ झाली, उद्यां जाईन कमललता, '—पण ते शब्द तोंडांतून बाहेर आले नाहींत.

जायला निघालों.

पद्मा येऊन जवळ उभी राहिली. कमललतेचं पाहून तिनंही हात जोडून नमस्कार केला. वैष्णवी तिला रागं भरून म्हणाली, हात जोडून नमस्कार, कसला करतेस पोरटे, पायांवर डोकं ठेऊन प्रणाम कर. "

ते शब्द ऐकून मी एकप्रकारें चमकलों. तिच्या तोंडाकडे पहायला गेलों तेव्हां तिनं आपलं तोंड एका बाजूला फिरवलं.

एक शब्दसुद्धां न बोलतां एकदम मठाच्या बाहेर पडलों.

## ९

आज अवेळीं कलकत्त्याच्या घरीं जाण्याच्या उद्देशानं बाहेर पडलों. यापुढं याहीपेक्षां दुःखमय असं ब्रह्मदेशचं काळं पाणी ! पुन्हां यायला वेळही होणार नाहीं—कदाचित् जरुरीही पडणार नाहीं. क्वचित् हें येणं शेवटचंच ! मोजून पाहिलं, आज दहावा दिवस. एवढ्या मोठ्या आयुष्यांत दहा दिवसांची काय कथा ! पण दहा दिवसांपूर्वीं जो मी इथं आलों आणि आज जो इथून निघत आहें, तो मात्र तोच नव्हे यांत मला मुळींच संशय वाटला नाहीं.

कित्येकांना नाइलाजानं असं म्हणतांना मी ऐकलं आहे. अमुक एक माणूस असा झाला असता पण तो आतां असा झाला ! अर्थात् अमुकाचं जीवन, सूर्यग्रहण चंद्रग्रहणासारखं त्याच्या अनुमानाच्या पंचागांत रोखठोक लिहिलेलं जें व्हायचं, तसं झालं नाहीं. तें अभावित नव्हे, अन्यायमूलक ! जसं कांहीं त्याच्या बुद्धीच्या आंकडेमोडीपलिकडे दुनियेंत दुसरं कांहींच नाहीं. जगांत वेगवेगळ्या प्रकारचीं माणसं आहेत, एवढंच नव्हे, तर आजचा माणूस उद्यां किती निराळ्या स्वरूपांत

बदलत जातो याचा निर्देश शोधून सांपडणं सुद्धां कठीण—याची त्याला कल्पना नसते. एका निमिषाच्या तीक्ष्णतेमुळं तीव्रतेमुळं अशा वेळीं साऱ्या जीवनाची उलटापालट होऊन जाते.

सरळ रस्ता सोडून रानावनांतली ही नाहींतर ती पायवाट पकडीत, भटकत भटकत स्टेशनवर निघालों होतों—लहानपणीं शाळेंत जायला निघत होतों तसा! आगगाडी येण्याची वेळ कळायची पर्वा नव्हती—तिथं पोंचल्यावर कुठली तरी एक गाडी मिळणार एवढं नक्की माहित होतं.

चालतां चालतां चट्कन् मनांत आलं, कीं साऱ्या वाटा जशा कांहीं अगदीं ओळखीच्या. जशा कांहीं हजार वेळ या रस्त्यानं ये जा केली होती. समोर तो वड, पूर्वीं मोठा असलेला-आतां, कसा कोण जाणे, लहान झाला होता. आणि ही खानांची 'गळदोरीची बागच' नव्हे का? तीच तर खरी!

आमच्या गांवच्या दक्षिणपाड्याच्या शेवटच्या बाजूनं चाललों होतों. पोट-शूळाच्या व्यथेमुळं चिंचेच्या झाडाच्या डहाळीला दोरी बांधून इथंच त्यानं आत्महत्या केली होती नव्हे का? खरोखरच केली होती कीं काय कोण जाणे! पण साऱ्याच गांवांत जशा बऱ्याच लोकवार्ता असतात तशीच हीही होती. हें झाड रस्त्याच्या कडेला होतं. लहानपणीं हें झाड पहातांच अंगावर काटा उभा राही आणि डोळे झांकून आम्ही सारे पळत पळत या रस्त्यापार होत असूं.

तेव्हांच्यासारखंच तें झाड आतांही दिसतं आहे. त्यावेळीं वाटे, कीं या अपेशी झाडाच्या डाहाळया डोंगरासारख्या वाढून आकाशाला जाऊन भिडलेल्या असाव्या. आज पाहिलं तेव्हां वाटलं, असला अभिमान मिरवायला त्या बिचाऱ्या झाडाला कांहींच आधार नव्हता. इतर चार चिंचेच्या झाडासारखंच तेंही एक होतं. खेड्यांतल्या निर्जन भागांत उगीच आपलं उभं राहिलं होतं. लहानपणीं जें झाड मला भेवडावीत असे तेंच आज इतक्या वर्षांनीं पहिली भेट होतांच एखाद्या दोस्तासारखा डोळा घालून जसं कांहीं थट्टेनं विचारीत होतं, "कसं काय दोस्त, बरा आहेस ना? आतां भीति वाटत नाहीं ना?

जवळ गेलों आणि त्या झाडाच्या बुंध्यावरून मोठ्या लोभानं हात फिरवून आपल्याशींच म्हणालों, "बरा आहें बाबा, भीति कसली वाटायची? तूं आमचा लहानपणचा शेजारी—आमचा नातेवाईक!"

संध्याकाळचा प्रकाश हळुहळू मावळत चालला होता. निरोप घेऊन म्हणालों

" सुदैवानं भेट झाली हें भाग्यच म्हणायचं माझं. आतां येतों दोस्त ! "

बऱ्याच घनदाट बागांच्यानंतर मोकळं माठ दिसलं. तसाच कांहीं न पाहातां पलिकडे गेलों असतों-पण तितक्यांत फार दिवसपर्यंत विसरला गेलेला पूर्व-परिचित गोड सुवास कुठून तरी आला. इकडे तिकडे पाहिलं—नजर गेली—वाः ! खास आमच्या यशोदेजवळ किती उमेदवारी केली होती ! हें असलं झाड या भागांत मिळत नव्हतं. तिनं तें कुठून तरी मिळवून आणून अंगणाच्या एका बाजूला पुरलं होतं. वांकड्या तिकड्या गांठाळलेल्या म्हाताऱ्या माणसासारखी त्याची देहयष्टी होती,—पूर्वीप्रमाणेंच आजही त्याची एकच डहाळी सजीव होती आणि तिच्या हिरव्या पानांत तशींच चारदोन पांढरीं पांढरीं फुलं होतीं. या झाडाखालींच यशोदेच्या नवऱ्याची समाधि होती. या वैष्णवाला आम्हीं पाहिलं नव्हतं. आम्हीं जन्माला यायच्यापूर्वींच तो वैकुंठवासी झाला होता. त्याचं तें छोटं दुकान ही त्याची विधवा चालवीत होती. दुकान कसलं ? एका पाटींत माळा-मणी, आरशी, फणी, कंगवा, आळता, तेलाचा मसाला, कांचेच्या बाहुल्या, टीनचा अलगुज, वगैरे वगैरे घेऊन दोन प्रहरीं ती घरोघर विक्रीसाठीं निघे. शिवाय मासे धरायचा सरंजाम तिच्याकडे होता. फार विशेष कांहीं नव्हतं-एकदोन पैसे किंमतीचा गळ आणि दोरी. तें विकत घेण्यासाठीं आम्हीं तिच्या घरीं जाऊन दंगा करीत असूं. या आऊष झाडाच्या वाळलेल्या डहाळी-वर चिखल ठेवून यशोदा संध्याकाळीं पणती लावीत असे. फुलं दे म्हणून आम्हीं त्रास देऊं लागलों तर समाधि दाखवून ती म्हणे, " नाहीं रे बाबांनों, तें माझ्या देवतेचं फुलं आहे. काढलं तर राग येईल त्यांना. "

वैष्णवी आतां तिथं नव्हती. केव्हां मेली कोण जाणे. कदाचित् फार दिवस झाले नसावे. जवळच एका बाजूला एक मातीची मोठी पिंडी दिसली. ही यशो-देची समाधि असावी. वाट पहातां पहातां शेवटीं आपल्या नवऱ्याच्या शेजारीं तिला जागा मिळाली असावी. या मातीच्या ढिगाऱ्यांतली माती हळुहळु घटत जंगल-वाळवीनं झाकुळली गेली होती. लक्ष द्यायला होतं कोण तिकडे ? बालपणच्या त्या दोस्ताला पहाण्यासाठीं रस्ता सोडून जवळ गेलों. संध्याकाळीं जी पणती लावली जाई ती खालीं पडली असल्याचं दिसून आलं. ती पूर्वींची वाळलेली डहाळी आज तशीच काळीकाळी होत चाललेली होती.

यशोदेचं छोटं घर अजून पूर्णपणें जमिनदोस्त झालं नव्हतं. सहस्र छिद्रं पडलेलं, मोडकळीला आलेलं तें दार बाजूला कोलमडून पडलं होतं.

वीस पंचवीस वर्षांपूर्वींच्या किती तरी आठवणी जाग्या झाल्या. घरासभोंवार कुंपण घातलेलं अन् त्याच्या आंतलं तें यशोदेचं अंगण—तेंच तें छोटं घर—आज त्याची ही दैना झाली होती. पण यापेक्षांही किती तरी पटीनं जास्त दुःखदायक प्रकार अजूनही पाहायचे होते. त्या घरांतून मोडक्या दाराच्या खालून हळूच धुसून बाहेर येणारा एक अस्थिपंजर झालेला कुत्रा अकस्मात् माझ्या नजरेला पडला. माझी चाहुल ऐकल्यामुळं मला आंत येऊं देऊं नये अशा आवेशानं तो बाहेर आला असावा पण त्याचा आवाज इतका बारीक झाला होता, कीं तो त्याच्या तोंडाच्या बाहेरही फुटत नव्हता.

मी म्हटलं, " कायरे, मी काय गुन्हां केला तुझा ? "

माझ्या तोंडाकडे पहातांच त्याला वाटलं कोण जाणे, तो शेपूट हलवूं लागला.

मी म्हटलं, " अजून इथंच राहिला आहेस का ? "

खोलावलेल्या दोन डोळ्यानीं माझ्याकडे पहात तो निरुपाय होऊन उगीच राहिला होता.

यशोदेचाच कुत्रा तो. शंकाच नाहीं. रंगीत कपड्यावर शिलाई करून फुलं काढलेला पट्टा अजूनही त्याच्या गळ्यांत होता.

पोरबाळ नसलेल्या त्या बिचाऱ्या बाईचा हा आवडता कुत्रा या कोसळलेल्या घरांत कशावर उदरनिर्वाह करून अजून जगला होता कोण जाणे ! गांवांत जाऊन कुठं तरी चोरीमारी करून खाणं मिळवायची ताकद त्याला नव्हती—संवयही नव्हती. आपल्या जातवाल्यांबरोबर सलोखा करायचं शिक्षणही त्याला मिळालं नव्हतं. केव्हां उपासपोटीं, केव्हां अर्धपोटीं इथंच पडून राहून बिचारा आपल्या धनीणीची वाट पहात असावा. ती कुठंतरी गेली आहे, कुठून तरी केव्हां तरी एक दिवस येणार आहे, असं त्याला वाटत असावं. मी आपल्याशींच म्हटलं, " हें असंच का ? ही प्रत्याशा एकवार पुसून टाकणं या जगांत इतकं का सोपं आहे ? '

यायच्या पूर्वी एकदां फाटक उघडून आंत नजर टाकून घेतली. काळोखांत विशेष कांहीं दिसलं नाहीं. भिंतीवर लावलेले चित्रपट तेवढे नजरेला आले—राजा-राणीपासून आरंभ करून नाना जातीच्या देवदेवतांच्या तसबीरा—नव्या कपड्यांच्या घड्यांवर चिकटवलेल्या असतात तसल्या—संग्रह करून यशोदा आपली चित्रांची

हौस पुरी करून घेत असे. लहानपणीं हीं चित्रं पाहून मी कसा तन्मय होत असें त्याची आठवण झाली. पावसाच्या झडींत भिजत, भिंतीच्या चिखलानं माखलेलीं हीं चित्रं आज कशींबशीं टिकून राहिलीं होतीं.

तशीच दुर्दशा झालेली तिची ती रंगीत हांडी जवळच्या फडताळांत होती, आळत्याचं बंडल ती या हंडींतच ठेवीत असे. पहातांच मला आठवण झाली. आणखीही काय काय जिन्नस इकडे तिकडे पडले होते. काळोखांत चांगलेसे दिसले नाहींत. ते सारे, मला वाटलं, जीव तोडून मला कांहींतरी सांगायचा प्रयत्न करीत होते. पण ती भाषा माझ्या ओळखीची नव्हती. असं वाटलं, घराच्या एका कोंपऱ्यांत मरून गेगेल्या मुलानं टाकलेलं हें खेळण्यांतलं घर होतं. घरांतल्या निरनिराळया मोडक्या तोडक्या वस्तु गोळा करून बनवलेला हा बाळ-संसार टाकून तें बाळ निघून गेलें. आज त्याची कुणाला कदर नाहीं—जरूरी नाहीं—पदरानं वारंवार झाडून पुसून साफ करणं आतां संपून गेलं—केवळ हा जंजाळ, नाहींसा करायला कुणी नाहीं म्हणूनच शिल्लक राहिलेला होता.

तो कुत्रा माझ्याबरोबर येत येत थांबला. दिसत होतं तोंपर्यंत मी पाहिलं, बिचारा सारखा तिकडे टक लावून पहात होता. त्याचा माझा हा पहिलाच परिचय —शेवटीं इथंच—तरींही पुढं येऊन तो निरोप देत होता.

मित्रहीन, लक्ष्यहीन अशा कुठल्यातरी प्रवासाला मी निघालों होतों आणि तो बिचारा एकांतांतल्या आपल्या या मोडक्या घराच्या काळोखांत जाऊन रहाणार होता. रस्त्याकडे डोळे लावून वाट पहाणारं असं या जगांत आम्हां दोघांनाही कुणी नव्हतं.

बागेच्या शेवटापर्यंत तो बरोबर आला आणि मग दिसेनासा झाला. तो दृष्टीआड झाल्यावर चारपांच मिनिटांनीं त्या अभागी सोबत्यासाठीं माझं अंतःकरण थरथरून रडूं लागलं. डोळयांतलं पाणी आवरतां आवरेना. चालत असतांना मी विचार करीत होतों—असं कां होतं ? इतर कोणत्या वेळीं हें सारं पाहून मला कांहीं विशेष वाटलं नसतं—पण आज अंतःकरणांतल्या आकाशांत ओसंडून आलेले मेघ असल्या या दुःखाच्या वावटळीसरशीं अजस्र स्वरूपांत फुटून पडत होते.

स्टेशनवर पोंचलों. भाग्य मोठं खरं. तेव्हांच गाडी मिळाली. कलकत्याला घरीं पोंचायला फारशी रात्र व्हायची नाहीं. तिकिट घेऊन गाडींत बसलों. शिटी फुंकून गाडी सुरू झाली तिला बिचारीला स्टेशनचा लोभ कुठं होता ? वारंवार

मागं पाहून भरलेले डोळे पुसायची तिला काय जरूरी होती ?

पुन्हां तीच गोष्ट आठवली—माणसाच्या आयुष्यांत दहा दिवस म्हणजे काय कथा !—पण तेच हे दहा दिवस केवढे महत्त्वाचे !

उद्यां पहांटे कमललता फुलं तोडायला एकटीच जाईल. त्यानंतर सारा दिवस-भर तिची देवसेवा सुरू होईल. दहा दिवसांचा नवा गोसाई विसरायला तिला किती दिवस लागतील कोण जाणे ?

त्या दिवशीं ती म्हणाली होती, "सुखानं आहें झालं. ज्याच्या पदकमलावर मी आत्मार्पण केलं आहे तो दासीला केव्हांही अंतर देणार नाहीं."

तथास्तु. तसंच होऊं दे एकदांच !

लहानपणापासून स्वतःच्या जीवनाकडे मी कसलंच लक्ष दिलं नाहीं. जोर करून कसली महत्त्वाकांक्षाही धरली नाहीं.—सुखदुःखाची माझी व्याख्याही अगदीं स्वतंत्र होती. तरीही आतांपर्यंत माझं आयुष्य परक्याची काळजी, परक्याचा विश्वास आणि परक्याचा हुकूम तालिम करण्यांत गेलं. त्यामुळं कोणतंच काम माझ्या हातून व्यवस्थितपणें झालं नाहीं. मन द्विधा होत असल्यामुळं सारे संकल्प दुबळे पडले. सारे उद्योग अर्ध्या रस्त्यांत ठोकर खाऊन कोसळून पडले. सारे म्हणतात, मी आळशी. सारे म्हणतात, मी निष्कर्मा. म्हणूनच, मला वाटतं, या निष्कर्मी बैराग्यांच्या आखाड्यांत माझ्या अंतरंगांतील अपरिचित मैत्री अस्फुट छायारूपानं माझ्या नजरेला आली. पुन्हां पुन्हां रागारागानं मी मान वळवली, पुन्हां पुन्हां हंसतमुखानं कुणी हात हालवून मला खूण केली.

आणि ही वैष्णवी कमललता ! प्राचीन वैष्णवकविहृदयांतील अश्रुजलाच्या गाण्यासारखं तिचं जीवन ! त्यांत छंदाची जोड नाहीं, व्याकरणाच्या चुका भरपूर—भाषेचे अनेक दोष—पण त्यांचं तिकडे लक्षच नाहीं. तो त्यांच्या भजन-कीर्तनाचा सूर !—अन्तरंगाला चटका लागला कीं झालं ! त्यापलीकडे पहायची त्यांना जरूरी नाहीं—जशा कांहीं संध्याकाळच्या आकाशांतल्या नाना रंगांतल्या मूर्ति ! नांव नाहीं —संज्ञा नाहीं—कलेचं आणि शास्त्राचं तंत्र संभाळून त्यांचा परिचय देणं म्हणजे वेडेपणा.

ती मला म्हणाली होती, "चला ना गोसाई, आपण इथून निघून जाऊं. रस्तोरस्तीं गात गात उभयतां कसेबसे दिवस काढूं !"

असं बोलायला तिला कांहीं वाटलं नाहीं पण मला तें जाणवलं. तिनं मला

नांव दिलं होतं, 'नवा गोसाई!' ती म्हणाली होती, "तें तुमचं नांव उच्चारणं मला शक्य नाहीं गोसाई." तिला वाटे, कीं मी तिच्या गतजीवनांतला मित्र होतों. माझ्यापासून तिला भीति वाटत नव्हती—माझ्यामुळं तिच्या साधनांत विघ्न येणार नाहीं अशी तिची खात्री होती. वैरागी द्वारकादासची ती शिष्या होती, कोणत्या साधनेनं कसला सिद्धिलाभ करायचा कोणता मंत्र त्यानं दिला होता कोण जाणे!

चट्कन् राजलक्ष्मीची आठवण आली—तिचं तें पत्र आठवलं. स्नेह आणि स्वार्थ यांच्या विलक्षण मिश्रणानं लिहिलेले ते कठोर शब्द आठवले. तरीही वाटलं, या जीवनांतल्या भाषेचा आतां तिच्या बाबतींत पूर्णविराम झाला होता. कदाचित् झालं तें बरं झालं—पण उणीव भरून काढायला कुठं कोण आहे का?

खिडकीच्या बाहेर काळोखांत पहात उगीच बसलों होतों. एकामागून एक किती तरी प्रसंग, किती तरी घटना आठवत होत्या. शिकारीच्या तयारीनं निघालेल्या राजकुमाराचा तो तंबू, तो त्याचा कबिला, कित्येक वर्षांच्या कालावधीनंतर पहिल्याच भेटींत दिसलेली तिची ती विस्मयविमुग्ध दृष्टि!—

ती मेली असा माझा समज होता. तिला मी ओळखलं नाहीं. स्मशानाकडे मी जायला निघालों त्यावेळची तिची ती काकुळती आठवली. शेवटीं संतापून निराशेनं उत्पन्न झालेला तिचा रुसवाही आठवला. रस्ता आडवून ती म्हणाली होती, "जावं म्हणून तुम्हीं म्हटलंत पण मी थोडीच जायला देणार आहें! कसं जातां पाहूं! या परदेशांत संकट आलं तर पहाणार कोण? ते कीं मी?"

आतां तिची ओळख पटली. हा तिचा जोर म्हणजेच तिचा खरा खरा परिचय होता. आयुष्यांत तो जोर तिनं कधीं सोडला नाहीं—त्या पकडींतून सुटण्याची कुणाचीही ताकद नव्हती.

रस्त्याच्या कडेला मरायला टेकलेल्या परिस्थितींत पडलों होतों,—जाग आली, डोळे उघडून पाहिलं, ती उशागत बसली होती. ती दिसतांच सारी काळजी दूर झाली अन् डोळे झांकून झोंपी गेलों. तो भार तिनं घेतला—मी निर्घोर झालों.

गांवीं घरीं आलों आणि तापानं पडलों. इथं तिला येतां येत नव्हतं. गांवच्या लेखीं ती मेली होती. या गांवचं तिला सोहेर सुतक नव्हतं. पण यावेळीं सुद्धां माझ्या बाजूला उभी राहिली ती राजलक्ष्मीच!

तिनं पत्रांत लिहिलं होतं, "—त्यावेळीं तुमची काळजी कोण घेईल? पुढ्

का ? आणि मी नुसती नोकरचाकरांकडून तुमची खबर घ्यायची का ? अशा परिस्थितींत का जिवंत रहायला सांगतां ? ”

या प्रश्नाचं उत्तर मी दिलं नाहीं. उत्तर देतां येत नव्हतं म्हणून नव्हे— उत्तर द्यायचं धैर्य झालं नाहीं.

मीं आपल्याशींच म्हटलं “ नुसता रूपाचाच प्रश्न कां ? संयम, शासन, कठोर आत्मनियंत्रण यांच्या बाबतींत तीक्ष्ण बुद्धीच्या या बाईपुढं, नाजुक, भाबड्या, मठांत राहणाऱ्या या कमललतेचा काय पाड ? पण या थोड्याशा अवधींत तिनं आपल्या स्वभावाचं प्रतिबिंब मला दाखवलं होतं असं वाटलं. तिच्याच हातीं आहे माझी मुक्ति, माझी मर्यादा,—तिच्याच हातीं मला श्वास टाकायला अवकाश आहे. माझी सारी काळजी—माझ्या बऱ्या वाईटाचा भार आपल्याच हातीं घेऊन राजलक्ष्मीसारखी ती मला दुबळा बनवून ठेवणार नाहीं.

मी विचार करूं लागलों, परदेशी कशाला जायचं ? नोकरी करून काय लाभ होणार आहे ? अगदीं पहिल्यानंच कांहीं नव्हे-पण त्या दिवशीं असं कांहीं एक मिळवलं कीं जें पुन्हां मिळालं पाहिजे म्हणून आज लोभ सुटेल ? नुसत्या कमललतेनंच नव्हे, पण द्वारकादास गोसाव्यानं सुद्धां आश्रमांत येऊन रहाण्याबद्दल प्रेमानं आमंत्रण दिलं होतं, ती सारी फसवणूक का ? माणसाला फसवण्याखेरीज त्या आमंत्रणांत कांहींच का तथ्य नव्हतं ? आजवर ज्या प्रकारें आयुष्य घालवलं त्याचा शेवट हा असाच का व्हायचा ? आतां कांहींच शिकायचं राहिलं नाहीं-साऱ्या जाणिवेचा शेवट झाला होता का ? आजवर अश्रद्धा होती—उपेक्षेनं पहात होतों—सारं ढोंग, सारी फसवणुक, असं समजत होतों पण केवळ अविश्वास आणि उपहास यांच्या भांडवलावर या जगांत मोठ्यांतलं मोठं तत्त्व कधीं कुणाला लाभलं आहे का ?

गाडी हावरा स्टेशनवर थांबली. रात्रीं घरीं रहायचं, जें कांहीं असेल नसेल त्याची विल्हेवाट लावायची, देणं घेणं सर्व चुकतं करायचं, आणि उद्यां पुन्हां मठाची वाट धरायची असं ठरवलं. जाऊं द्या ती नोकरी ! जाऊं द्या तो ब्रह्मदेशचा प्रवास !

रात्री घरीं पोचलों तेव्हां दहा वाजले होते. खाण्याची व्यवस्था होती. पण इच्छा नव्हती. हातपाय धुवून कपडे बदलून बिछाना झाडायला लागलों होतों तोंच मागून ओळखीचा आवाज ऐकूं आला. “ आलांत बाबू ? ”

आश्चर्यचकित होऊन वळून पाहिलं, " केव्हां आलास रे रतन ? "

" संध्याकाळींच आलों. व्हरंड्यावर वारा मोठा सुंदर येतो. असाच आळसावून पडलों तों डोळा लागला. "

" बरं केलंस. जेवणखाण झालं का ? "

" जी, नाहीं. "

" मोठ्या संकटांत टाकलंस रतन ! "

रतननं विचारलं, " अन् आपलं जेवण ? "

नाहीं म्हणून कबूल करण्याखेरीज गत्यंतर नव्हतं.

रतन खूष होऊन म्हणाला, " तर मग छान झालं. आपला प्रसाद घेऊन रात्र कशीबशी पार होईल. "

मी आपल्याशींच म्हटलं, " बेटा हजाम, मूर्तिमंत विनयाचा अवतार! कुठंच केव्हां हटत नाहीं ! " पण उघड म्हणालों, " तर मग पहा, जवळपास कुठं दुकानांत प्रसादाची कांहीं व्यवस्था होते काय ती ? पण आपली ही स्वारी आली आहे कशाला ? आणखी एखादं पत्र आणलं आहे का ? "

रतन म्हणाला, " जी नाहीं. पत्र लिहायच्या उठाठेवीला वेळ नाहीं यावेळीं. काय सांगायचं तें स्वतःच. "

" म्हणजे ? पुन्हां मला आलं पाहिजे का तिकडे ? "

" जी नाहीं, बाईच आल्यायत स्वतः ! "

ऐकतांच मी अत्यंत अस्वस्थ झालों. या रात्रीच्या वेळीं तिची रहायची व्यवस्था काय करायची हेंच मला सुचेना. पण कांहींतरी केलं पाहिजे होतं खरं—मी विचारलं, " आल्यापासून अजून गाडींतच बसून आहे का ? "

रतन हंसून म्हणाला, "हेंच का बाईना ओळखलंत ? नाहीं बाबु, चार दिवस झाले आम्हांला येऊन. हे चार दिवस रात्रंदिवस पहारा देतोय. चला आतां. "

" कुठं ? किती लांब ? "

" थोडं लांब आहे खरं. पण आम्हीं गाडी ठरवलेली आहे. त्रास व्हायचा नाहीं जायचा. "

अतएव, पुन्हां एकदां कपडे करून दरवाजाला कुलूप लावून बाहेर जाणं भाग आलं. शामबाजारांतल्या एका गल्लींतलं एक दोन मजली घर घेतलं होतं. समोर बाग असून चौफेर भिंत होती. दार उघडल्याबरोबर मी आलेला पहाताच

राजलक्ष्मीच्या म्हाताऱ्या दरवानाचा आनंद गगनांत मावेना. पुन्हां पुन्हां नमस्कार करीत विचारलं, " खुशाल ? "

मी म्हटलं, " हो तुलसीदास, खुशाल आहें–अन् तूंही खुशाला आहेस ना ? "

उत्तरादाखल त्यानं आणखी एक नमस्कार केला. तुलसीदास मुंगेर जिल्ह्यांतला रहाणारा—जातीनं कुर्मी—मी ब्राह्मण म्हणून बंगाली पद्धतीनं पायाला हात लावून तो प्रणाम करीत असे.

आमची चाहूल लागतांच आणखी एक हिंदुस्थानी नोकर घाबरून झोंपेंतून उठून आला. रतनचा आरडाओरडा ऐकून तो बावरला होता. उगीच कुणाच्या तरी अंगावर ओरडायचं आणि आपला वरचष्मा राखायचा अशी रतनची संवय होती. रतन म्हणाला, " आल्यापासून नुसत्या झोंपा काढतोयस आणि रोट्या बडवतोयस. नुसती गुडगुडी भरून तयार ठेवायची तेवढंसुद्धां झालं नाहीं. जा आतां लवकर—"

तो माणूस नवा होता. बिचारा घाबरून धांवत सुटला. वर गेलों, समोरचा व्हरंडा पार होऊन पुढं एक मोठा दिवाणखाना होता–गॅसच्या बत्तीमुळं झगझगत होता. दिवाणखान्यांत सर्वत्र कार्पेट पसरली होती. त्यावर मखमली गालिचा आणि एकदोन तक्के ठेवले होते. शेजारींच माझी नित्याची अत्यंत आवडती गुडगुडी होती—आणि तिच्याच पलिकडे जरीचं काम केलेल्या माझ्या मखमली चपला ठेवलेल्या होत्या. राजलक्ष्मीनं या चपला स्वतः आपण विणलेल्या होत्या. माझ्या एका जन्मदिवशीं तिनं त्या मला थट्टेनं बक्षिस म्हणून दिल्या होत्या.

शेजारची खोली रिकामी होती. तिथंही कुणी नव्हतं. उघड्या दरवाजांतून मी डोकावून पाहिलं तेव्हां मला दिसून आलं, कीं एका बाजूला एका नव्या पलंगावर बिछाना घालून ठेवला होता. आणि त्याच्याच बाजूला तसल्याच नव्या टिपॉयवर माझे कपडे रचून ठेवले होते. गंगामाटीला जायच्यापूर्वी हे कपडे करून आणले होते—पण ते माझ्या ध्यानांतही नव्हते, कीं मी कधीं वापरलेही नव्हते.

रतननं हांक मारली, " बाई. "

" आलें हं. " असं म्हणून राजलक्ष्मी समोर येऊन उभी राहिली आणि पायाला हात लावून प्रणाम करून म्हणाली, " रतन, गुडगुडी घेऊन ये बाबा. इतके दिवस तुला उगीच त्रास दिला. "

" त्रास कसला बाई ? सुखरूपपणें यांना घरीं घेऊन आलों हेंच माझं भाग्य. "

असं म्हणून तो निघून खालीं गेला.

नव्या डोळयांनीं मी राजलक्ष्मीला पाहिलं. सौंदर्य ओसंडून पडलं होतं. तं पूर्वीची प्यारी आठवली. कित्येक वर्षांच्या दुःखशोकाच्या वावटळींतून बाहे पडून स्नान करून नवं रूप घेऊन आली होती.

या चार दोन दिवसांतच हें नवं घर तिनं शृंगारल्याचं पाहून मला आश्चर्य वाटलं नाहीं. झाडाखालीं मुक्काम ठोकला तरी देखील पहातां पहातां तिथं सौंदर्य आणण्यांत तिचा हातखंडा होता.

राजलक्ष्मीनं या मधल्या मुदतींत स्वतःला मोडून टाकून पुन्हां सजवलं होतं पूर्वी ती दागदागिने घालीत असे—मधें सारे दागिने फेकून देऊन ती संन्यासिनी बनली होती. आज तिनं पुन्हां दागिने चढवले होते—अगदीं तुरळकच खरे पण पहातांच ते फार किंमतवान् होते हें दिसून येत होतं. नेसायची साडी फारशी किंमतवान नव्हती—साधारण गिरणीची साडी—रोज घरीं वापरतात तसली डोक्यावरच्या पदराआडून केंसाच्या लहान बटा तिच्या गालाच्या आसपास बाग डत होत्या—लहान म्हणूनच एवढ्या अवखळ का ? पहातांच मी स्तंभित झालों

राजलक्ष्मी म्हणाली, " एवढं काय पहातांहां ? "

" तुला पहातों आहें. "

" आतां नवीनच का ? "

" असं मला तरी वाटतंय खरं ! "

" अन् मला काय वाटतंय माहित आहे का ? "

" नाहीं. "

" असं वाटतंय, गुडगुडी घेऊन रतन यायच्या पूर्वी दोन्ही हात तुमच्या गळ्याभोंवती टाकून घट्ट कवटाळून धरावं. मग काय कराल ? " असं म्हणून ती हंसत सुटली आणि म्हणाली, " हात सोडून लोटून तर देणार नाहीं ? "

मलाही माझं हसूं आवरेना. मी म्हटलं, " पहा ना एकदां. पण एवढं हंसायला काय झालं ? भांग चढवली आहेस ? "

जिन्यावर कुणाचीं पावलं वाजत असल्याचं ऐकूं आलं. धूर्त रतन मुद्दाम जोरजोरानं पाय वाजवीत येत होता. हसूं दाबून राजलक्ष्मी हळूच म्हणाली, " आधीं रतन येऊन जाऊं दे. मग भांग चढवली आहे कीं काय चढवलं आहे तें सांगतें तुम्हांला. "

बोलतां बोलतां तिचा गळा एकदम दाटून आला आणि ती म्हणाली, " या परक्या जागीं चार पांच दिवस मला एकटी टाकून तुम्हीं पुंटूच्या लग्नाला का गेलां होतां ? इथं मी कसे दिवस काढले याची कल्पना तरी आहे का ? "

" तूं अशी अचानक येशील हें मला तरी कसं कळावं ? "

" होय तर–म्हणे अचानक ! तुम्हांला सारं कांहीं माहित होतं. नुसतं मला खिजवण्यासाठीं निघून गेलांत. "

रतन येऊन गुडगुडी माझ्या हातीं देऊन म्हणाला, " आधीं ऐका बाई, बाबूंचं जेवण व्हायचं आहे. भटजींना फराळाचं आणायला सांगूं ? बारा वाजले. मध्यान्ह रात्र झाली. "

बारा वाजले हे शब्द ऐकतांच राजलक्ष्मी अस्वस्थ झाली आणि म्हणाली, " तें भटजीला जमायचं नाहीं बाबा. मीच जाऊन आणतें. माझ्या झोंपायच्या खोलींत बसायची व्यवस्था कर. "

जेवायला बसलों तेव्हां गंगामाटींत असतांनाच्या शेवटच्या दिवसाची आठवण आली. त्यावेळीं हाच भटजी आणि हाच रतन माझ्या जेवणखाण्याची व्यवस्था ठेवीत होते. त्यावेळीं माझी खबर घ्यायला राजलक्ष्मीला फुरसत मिळत नव्हती. आज मात्र यांच्याकडून कांहीं होईना.अं ? सैंपाकघरांत तिला स्वतःला जावं लागलं अं ? पण हाच तिचा स्वभाव. हीच त्या स्वभावांतली मख्खी. कारण कांहीं असो, पण मला एवढं कळून चुकलं, कीं ती पुन्हां मूळपदावर आली.

जेवण झाल्यावर राजलक्ष्मीनं विचारलं, " पूंटूचं लग्न कसं काय झालं ? "

मी म्हटलं, " डोळ्यांनीं पाहिलं नाहीं. कानांनीं ऐकलं कीं चांगलं झालं. "

" डोळ्यांनीं पाहिलं नाहीं ? मग इतके दिवस होतां कुठं ? "

लग्नाची सारी हकीकत मी विस्तारपूर्वक सांगितली. ती ऐकल्यावर क्षणभर गालावर हात देऊन स्वस्थपणें पहात ती म्हणाली, " थक्क केलंत ! यायच्या पूर्वी पुंटूला कांहीं देणगी सुद्धां दिली नाहींत का ? "

" ती माझ्या वतीनं तूं दे. "

राजलक्ष्मी म्हणाली, " तुमच्या वतीनं का ? मी स्वतःदेखील त्या पोरीला कांहीं पाठवून देणार आहें. पण होतां कुठं तें तरी सांगाल ? "

मी म्हटलं, " मुरारीपुरच्या गोसाव्यांचा आखाडा आठवतो ? "

राजलक्ष्मी म्हणाली, " आठवतो म्हणजे ? तिथनंच वैष्णवी दारोदार भिक्षा

मागायला येत होत्या ना ? ती लहानपणची आठवण मी विसरलें नाहीं अजून."

" तिथंच होतों. "

ऐकतांच राजलक्ष्मीच्या अंगावर जसा कांहीं कांटाच उभा राहिला. ती म्हणाली, " त्या वैष्णवींच्या आखाड्यांत ? अग आई ग—म्हणतां तरी काय ? तिथं कांहीं म्हणे औरच्च प्रकार होत असतात!" बोलतां बोलतां ती मोठमोठ्यानं हंसत सुटली. शेवटीं पदरानं तोंड झांकीत म्हणाली, " त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. तुम्हीं काय वाटेल तें कराल. आन्याचं तें सोंग चांगलं आठवतं. डोक्यावर जटा, आंगभर रुद्राक्षाच्या माळा, हातांत पितळेचे वाळे—तें विलक्षण सोंग—"

पुढं बोलायला होईनां—हंसतां हंसतां तिची मुरकुंडी वळत होती. मी चिडून तिला उठून बसवलं. हंसतां हसतां तिला उचकी लागली होती. तोंडांत पदर कोंबून मोठ्या शिकस्तीनं हसूं आंवरीत ती म्हणाली, " वैष्णवी काय म्हणाल्या तुम्हांला ? मेल्या नकट्या, उल्की नेसलेल्या कितीतरी असतात तिथं त्या—"

पुन्हां तसाच हंसण्याचा जोर तिला येतो आहे असं पाहून मी सावध करीत म्हणालों, " आतां हंसलीस तर अशी चोपून काढीन—उद्यां नोकरचाकरांसमोर तोंड दाखवतां यायचं नाहीं. "

घाबरून ती दूर झाली, " तुमच्यासारख्या वीर पुरुषांचीं कामं नव्हेत तीं. स्वतःच लाजाल तोंड दाखवायला. तुमच्यासारखा भेकड माणूस जगांत आहे का कुणी ? "

मी म्हटलं, " तुला माहित नाहीं लक्ष्मी, तूं मला भेकड म्हणते आहेस खरी पण तिथं एक वैष्णवी होती ती मला अहंकारी म्हणे, दांभिक म्हणे. "

कां ? तिला काय जाणवलं ? "

" कांहींच नाहीं. तिनं माझं नांव ठेवलं होतं नवे गोसाई. ती म्हणे," गोसाई तुमच्यासारख्या उदासीन, वैरागी माणसाइतका दांभिक माणूस या जगांत दुसरा कुणी नाहीं. ' "

राजलक्ष्मीचं हसं थांबलं. ती म्हणाली, " काय म्हणाली ती ? "

" म्हणाली, असल्या उदासीन वैरागी मनाच्या माणसाइतका दांभिक माणूस दुनियेंत शोधून मिळायचा नाहीं ! अर्थात् तिच्या दृष्टीनं मी एक दुर्धर्ष वीर होतों. भेकड मुळींच नव्हे. "

राजलक्ष्मीची मुद्रा गंभीर झाली. माझ्या थट्टेच्या भाषणाकडे तिनं लक्ष दिलं

नाहीं. ती म्हणाली, " तुमच्या उदासीन मनाचा पत्ता त्या मेलीला कसा लागला ?"

मी म्हटलं, " वैष्णवींना उद्देशून असली अशिष्ट भाषा वापरणं बरं नाहीं."

राजलक्ष्मी म्हणाली, " तें माहित आहे मला. तिनं तुमचं नांव ठेवलं होतं नवे गोसाई—अन् तिचं नांव काय ? "

" कमललता. कुणि कुणि रागानं तिला कमलीलताही म्हणत. कुणि म्हणत, तिला जादुगिरी येते. कुणि म्हणत, तिच्या गाण्यानं माणूस वेडा होतो अन् ती जें मागेल तें देतो."

" तुम्हीं ऐकलं तिचं गाणं ? "

" हो ऐकलं. फार सुंदर. "

" काय होतं तिचं वय ? "

" मला वाटतं तुझ्याच वयाची असावी. कदाचित् थोडी मोठीही असेल. "

" दिसायला कशी काय ? "

" ठीक होती. तशी कांहीं कुरूप नव्हती. नकट्या, उल्की नेसलेल्या ज्या वैष्णवी तूं पाहिल्या होत्यास तसली कांहीं नव्हती. गृहस्थाघरची होती. "

राजलक्ष्मी म्हणाली, " तिचं तें भाषण तुम्हीं सांगितलं, तेव्हांच तें कळलं मला तुम्हीं तिथं होतां तोंवर तुमची काळजी घेत होती का चांगली ? "

मी म्हटलं, " हो, तक्रारीला जागा नव्हती. "

एकदम एक मोठा सुस्कारा सोडून राजलक्ष्मी म्हणाली, " असेल, असेल, ज्या साध्यसाधनेनं तुमची प्राप्ति व्हायची तिनं ईश्वरसुद्धां मिळेल. तें वैष्णव वैराग्यांचं काम नव्हे. कुठल्या कुणा या कमललतेची मला कसली भीति ? छेः !" असं म्हणून ती उठून बाहेर निघून गेली.

अगदी नकळत मीही एक सुस्कारा सोडला. मला वाटतं, क्षणभर मी भानावर नव्हतों – या आवाजानं भानावर आलों. मोठा तक्क्या ओढून घेऊन आडवा पडून गुडगुडी ओढूं लागलों. वर कुठंतरी एक भला मोठा कोळी चकरा घालीत घालीत जाळं विणीत होता. गॅसच्या दिव्यानं पडलेली त्याची सावली मोठी भयंकर दिसत होती. प्रकाशाच्या आडोशामुळं त्यांची सांवली कितीतरी पटीनं मोठी झाल्यामुळं तो कुणितरी महा भयंकर प्राणी असावा असं क्षणभर मला वाटलं.

राजलक्ष्मी परत आली आणि माझ्याच तक्क्याला हनवटी टेंकून बसली. मी हात लावून पाहिलं तों तिच्या माथ्यवरचे केंस भिजलेले होते. आतांच ती तोंड

धुवून आली असावी. मी विचारलं, “लक्ष्मी, अशी एकाएकीं कलकत्त्याला कां आलीस ?”

राजलक्ष्मी म्हणाली, “एकाएकीं कांहीं म्हणतां यायचं नाहीं. त्या दिवसापासून अहोरात्र चोवीस घंटे मन कसंसच होऊन गेलं होतं. कुठंच कांहीं लक्ष लागेनासं झालं होतं—चट्कन् हार्ट-फेल् होईल अशी भीति वाटली. वाटलं, या जन्मीं कांहीं पुन्हां भेट होत नाहीं—” असं म्हणून तिनं गुडगुडीची नळी माझ्या तोंडांतून काढून फेंकून दिली. ती म्हणाली, “जरा थांबा, या धुरापुढं तुमचं तोंडसुद्धां दिसत नाहीं. सारं धूरमय होऊन गेलंय अगदीं.”

गुड्गुडीची नळी गेली खरी पण तिच्या ऐवजीं तिचा हात माझ्या मुठींत राहिला.

मी विचारलं, “आजकाल बंकू काय म्हणतो ?”

उदासपणें हंसत राजलक्ष्मी म्हणाली, “बायको घरीं आली कीं सारे मुलगे जें म्हणतात तेंच !”

“त्यापेक्षां जास्त कांहीं नाहीं ?”

“नाहीं असं तरी कसं म्हणूं ? पण तो मला कसला त्रास देणार ? मला त्रास देणारे काय ते एक तुम्हीं. बायकांच्या जातीला खराखरा त्रास देणारा तुमच्याशिवाय कोण आहे दुसरा ?

“पण मी तुला त्रास केव्हां दिला लक्ष्मी ?”

उगीच माझं कपाळ आपल्या हातांनीं पुसून घेत राजलक्ष्मी म्हणाली, “हो, कधींच नाहीं ! आजपर्यंत मीच काय ती तुम्हाला त्रास देत आलें ! स्वतःच्या सुखासाठीं लोकांच्या नजरेनं मीच तुम्हांला उणेपणा आणला ! उगीच खेळीमेळीनं तुमचा अपमान मीच केला ! त्याची शिक्षा आतां दुथडी भरून वहात चालली आहे ? दिसते आहे ना तुम्हाला ?”

मी हंसून म्हटलं, “छे, नाहीं.”

राजलक्ष्मी म्हणाली, “हो का ? कुणि तरी मंत्र घालून तुमच्या दोन्हीं डोळ्यांवर झांपड आणलेली दिसते !”

एक क्षणभर थांबून ती नंतर म्हणाली, “एवढं पाप हातून घडलं तरीही या जगांत माझ्यासारखी भाग्यवान् कुणि कधीं पाहिली आहे का ? पण तेवढ्यानंही माझी हांव मिटेना. कुठूनशी धर्माची वावटळ आली अन् मी माझ्या हातच्या लक्ष्मीला पायाच्या ठोकरीनं उडवली. गंगामाटीहून परत आलें तरीही डोळे

उघडले नाहींत. काशीला तुमची हेटाळणी करून तुम्हांला निरोप दिला—"

तिचे दोन्ही डोळे पाण्यानं डंवरून आले होते. मी ते पुसूं लागलों तेव्हां ती म्हणाली, " विषाचा वृक्ष स्वतःच्या हातानं रोंवला त्याचीं फळं आज मिळताहेत. जेवण रुचत नाहीं, झोंप सुचत नाहीं, डोळ्यावरची झांपड सुकून गेली, कसलं मेलं कशाचं भय वाटतं त्याचा आदिअंत नाहीं!—गुरुदेव तेव्हां घरीं होते, त्यांनीं कसलंस एक कवच दंडांत बांधलं आणि म्हटलं, 'पोरी, सकाळपासून एकासनावर बसून मंत्राचा दहा हजार जप कर.' पण जप कुठं झाला? मन सारखं ओसंडून येत होतं. पूजेला बसलें तर दोन्ही डोळ्यांतून सारखीं आसवं गळत होतीं!—इतक्यांत आलं तुमचं पत्र—अन् तेव्हांच रोगाचं निदान सांपडलं."

" कुणाला सांपडलं? गुरुदेवाला? आतां वाटतं त्यांनीं आणखी एक कवच बांधलं तुझ्या हातांत?"

" हो! कवच दिलं पण तें माझ्या हातांत नाहीं बांधलं, तुमच्या गळ्यांत बांधायला सांगितलं."

" तेवढ्यानं तुझा रोग दूर होत असेल तर बांधून टाक एकदांच."

राजलक्ष्मी म्हणाली, " त्या पत्राच्या पायी माझे दोन दिवस गेले. कसे गेले ते माझे मलाच माहीत. रतनच्या हातीं पत्राचं उत्तर पाठवून दिलं. गंगेवर गेलें स्नान केलं, अन्नपूर्णेच्या देवळांत जाऊन देवीसमोर उभं राहून सांगितलं, 'आई, वेळींच पत्र त्यांच्या हातीं पडूं दे. आत्महत्या करून मरायची पाळी माझ्यावर येऊं देऊं नकोस!'" माझ्या तोंडाकडे पहात ती म्हणाली, " असा मला डाग दिलात काय म्हणून?

या प्रश्नाचं उत्तर मला चट्कन् सुटेना. क्षणभर थांबून मी म्हणालों, "तुम्हां बायकांच्या जातीला हें जें काय वाटतं, त्याची आम्हांला कल्पनासुद्धां करतां येत नाहीं—समजणं तर दूरच राहो."

" एवढं तरी कबूल?"

" हो! कबूल."

पुन्हां कांहीं वेळ माझ्याकडे पहात राजलक्ष्मी नंतर म्हणाली, " खरोखरच हें पटतंय का? कीं आम्हां बायकांनाच हें कळतं,—पुरुषांना कळणं शक्यच नाहीं?"

कांहीं वेळ दोघेही उगीच बसून राहिलों होतों.

राजलक्ष्मी म्हणाली, " देवळांतून बाहेर आलें तो तिथं पाटण्याचा लछमन

साहु भेटला. तो मला बनारसी साड्या पुरवीत असे. म्हताऱ्याची माझ्यावर फार माया. मला 'बेटी' म्हणून हांक मारी. तो आश्चर्यचकित होऊन म्हणाला, 'बेटी, तूं इथं ?' त्याचं दुकान कलकत्त्याला होतं तें मला माहित होतं. म्हणून मी म्हटलं, 'साहुजी, मला कलकत्त्याला जायचं आहे. माझ्यासाठीं एक घर जमवून द्याल का ?'

"तो म्हणाला, 'देतों.' बंगाली पाड्यांत त्याचं स्वतःचंच एक घर होतं. त्यानं तें थोडक्यांत घेतलं होतं. तो म्हणाला, 'वाटलं तर तेंच घर त्याच रकमेंत तुला देतों.' साहुजी मोठा पापभीरु माणूस आहे. माझा त्याच्यावर मोठा विश्वास होता. मी कबूल केलं अन् त्याला घरीं बोलावून आणून पैसे दिले. त्यानं पावती लिहून दिली. त्याच्याच माणसांनीं हें सारं सामानसुमान आणून दिलं. सात आठ दिवसांनीं रतनला बरोबर घेऊन इथं निघून आलें. मी आपल्याशींच म्हटलं, 'आई अन्नपूर्णे, तुझ्या दयेनं हें एवढं झालं!' नाहींतर हा योग आला असता का ? भेट होणार ही माझी खात्री होती. आतां झालीच कीं नाहीं भेट ?"

मी म्हटलं, "पण मला आतां लवकरच ब्रह्मदेशला जायचं आहे लक्ष्मी."

राजलक्ष्मी म्हणाली, "ठीक, मग चला ना! तिथं अभया आहे, जिकडेतिकडे बुद्धदेवाचीं मोठीं मोठीं मंदिरं आहेत, तीं एकदां पहायला तरी मिळतील."

मी म्हटलं, "पण तो मोठा ओंगळ देश आहे लक्ष्मी. सोवळ्याओंवळ्याला तिथं धरबंध नाहीं. आचारविचार सारे तिथल्यातिथं रहातील. तिथं तूं कशी येणार ?"

माझ्या कानाजवळ तोंड आणून राजलक्ष्मीनं अगदीं हलक्या आवाजांत कांहींतरी सांगितलं. पण तें मला चांगलंसं ऐकूं आलं नाहीं. मी म्हटलं, "जरा ओरडून बोल ना, ऐकूं दे मला."

राजलक्ष्मी म्हणाली, "नाहीं!"

ती तशीच अस्ताव्यस्तपणें पडून राहिली होती. माझ्या गळ्यावर आणि गालावर तिचे उष्ण निश्वास येऊन आदळत होते.

## १०

"अहो तुम्हीं आतां उठा, जरा हातपाय धुवा. कपडेबिपडे बदला. रतन चहा घेऊन वाट पहात राहिलाय्!"

माझं उत्तर कांहीं मिळत नाहीं असं पाहून राजलक्ष्मी पुन्हां ओरडून म्हणाली, " दिवस वर आला. किती निजाल आतां ? "

या कुशीवरून त्या कुशीवर वळून मी आळसावलेल्या आवाजांत म्हणालों, " झोंप घ्यायला दिलीस कुठं ? हा आतां पहांटे डोळा लागला."

टेबलावर चहाचा पेला रतननं ठेवला त्याचा आवाज मला ऐकूं आला. मला वाटतं, तो लाजून पळून गेला.

राजलक्ष्मी म्हणाली, " छे, छे ! हा काय वेडेपणा ? उगीच माणसाला निष्कारण कां लाजवायचं तें ? सारी रात्र कुंभकर्णासारखे घोरत पडलांत अन् मी सारी रात्र जागून पंख्यानं वारा घालीत होतें—म्हटलं उकाडा झाला तर झोंप मोडायची ! अन् आतां उलट मलाच असं म्हणतां ? उठा म्हणतें ना ! नाहींतर अंगावर पाणी ओतीन आतां."

मी उठून बसलों. फारसा उशीर झाला नव्हता खरा, तरीही सकाळ झाली होती. खिडक्या उघडल्या होत्या. सकाळच्या कोंवळया उन्हाच्या तिरिपेंत राजलक्ष्मीचं ते विलक्षण सौंदर्य पाहून थक्क झालों.

तिचं स्नान, पूजा, आन्हिक समाप्त झालं होतं. गंगेच्या घाटावर भटजीनं लावलेला पांढऱ्या नि रक्तचंदनाचा टिळा तिच्या मस्तकावर चमकत होता. ती तांबडी बनारसी साडी नेसली होती. पूर्वेकडच्या खिडकींतून एक लहानसा सोनेरी किरण तिरपा होऊन तिच्या चेहऱ्याच्या एका बाजूला पडला होता. जिवणीच्या टोंकाला लाजून हंसण्याची छटा झळकत होती. खोट्या रागानं आकुंचित झालेल्या दोन्हीं भिवयांखालची चंचल डोळयांतली दृष्टि उसळलेल्या आवेगानं झगमगत होती. पहात असतां आजही मी थक्क होऊन गेलों. ती उगीच एकदम हंसली आणि म्हणाली, " कालपासून एवढं पहातां काय माझ्याकडे ? "

मी म्हटलं, " तूंच सांग ना काय पहातोंय तें."

पुन्हां थोडंसं हंसून राजलक्ष्मी म्हणाली, " मला वाटतं, तुम्हीं ताडून पहातांहां कीं हिच्यापेक्षां पुंटू बरी दिसते कीं कमललता बरी दिसते ? होय ना ? "

मी म्हटलं, " नाही. दिसायच्या बाबतींत कुणिच तुझ्या पासंगाला पुऱ्या पडणार नाहींत. त्यासाठीं एवढं निरखून पहायला नको. "

राजलक्ष्मी म्हणाली, " तें जाऊं द्या. अन् गुणानं ? "

" गुणानं होय ? त्याबाबतींत मात्र मतभेद होण्याचा संभव आहे खरा."

" गुणाच्या बाबतींत तर मला कळलंच—गाणीं गातां येतात—"

" हो, सुंदर ! "

" सुंदर—तें कसं कळलं तुम्हांला ? "

" वा, म्हणजे काय ! मला काय कळत नाहीं ? विशुद्ध ताल, लय, सूर —"

राजलक्ष्मी मध्येंच म्हणाली, " हो हो ! ताल कशाला म्हणतात ? "

मी म्हटलं, " ताल म्हणतात त्याला—लहानपणीं तुझ्या पाठीवर धरीत होतों तो. आठवत नाहीं ? "

राजलक्ष्मी म्हणाली, " कसं नाहीं आठवणार ? तेंच तर चांगलं आठवतं. काल उगीच तुम्हांला भेकड म्हणून मी नांव ठेवलं. कमललतेला केवळ तुमच्या उदासी मनाचा पत्ता लागला—ती तुमची वीरत्वाची कहाणी तिला कळली नाहीं वाटतं ? "

" नाहीं. आपली आपण स्तुति करूं नये. तें तूंच तिला ऐकीव. पण तिचा गळा सुंदर आहे यांत मात्र शंका नाहीं. "

" मलाही नाहीं. " असं म्हणतांना तिचे दोन्ही डोळे प्रच्छन्न कौतुकानं उजळून उठले. ती म्हणाली, " खरंच, तें गाणं आठवतं का ? तें तुमचं गाणं—शाळेला सुट्टी पडली म्हणजे तुम्हीं म्हणत होतां अन् तें ऐकून आम्हीं थक्क होत होतों—तें !—कुठं गेला जिवीचा जिव्हलग । बाप दुर्योधन रे ऽऽऽऽ!"

हसूं दाबण्यासाठीं तिनं पदरानं तोंड झांकून धरलं. मीही हंसत सुटलों. राज-म्हणाली, " किती छान छान गाणं होतं तें. तुमच्या तोंडून ऐकतांच गुरावास-रांच्या डोळयांतून सुद्धां पाणी येई—तिथं माणसाची काय कथा ? "

रतनच्या पायाची चाहूल लागली. तितक्यांत तो येऊन दाराजवळ उभा राहिला आणि म्हणाला, " पुन्हां चहाचं आधण ठेवलंय. इतक्यांत चहा तयार होईल." असं म्हणून तो खोलींत आला आणि त्यानं चहाचा पेला उचलून हातीं घेतला.

राजलक्ष्मी मला म्हणाली, " आतां उठा पाहूं. पुरे झालं ! उशीर झाला. आतां चहा फुकट गेला तर रतनचं माथं फिरेल. असली उधळमाधळ त्याला खपत नाहीं. कसं रतन ? "

केव्हां कसं उत्तर द्यावं हें रतन चांगलं जाणत होता. तो म्हणाला, " आप-ल्याला खपत नसेल बाई, पण बाबूंच्या बाबतींत मला सर्व कांहीं खपतं." असं म्हणून तो पेला घेऊन निघून गेला.

राग आला कीं रतन राजलक्ष्मीला ' आपण ' म्हणत असे. एरव्हीं केव्हांही ' तुम्ही ' म्हणे.

राजलक्ष्मी म्हणाली, " रतनचा मोठा लोभ आहे तुमच्यावर. "

मी म्हटलं, " हो, मलासुद्धां असंच वाटतं. "

" हो. काशींतून तुम्हीं निघून आलांत त्यावेळीं भांडण करून त्यानं माझं काम सोडलं. मी रागावून म्हटलं, ' आजवर तुझं एवढं हित केलं रतन, त्याचं हेंच का बक्षिस ? ' तो म्हणाला, ' रतन निमकहराम नाहीं बाई. मीही चाललों ब्रह्मदेशांत. बाबूजींची सेवा करून तुमचं ऋण फेडीन. ' तेव्हां हातींपायीं धरून त्याची कशीबशी एकदां समजूत घातली तेव्हां एकदांचा शांत झाला. "

क्षणभर थांबून ती म्हणाली, " त्यानंतर तुमची लग्नाची आमंत्रणपत्रिका आली—"

मी तिला थांबवून म्हटलं, " उगीच खोटं बोलूं नकोस. मी नुसतं तुझं मत विचारलं होतं—"

आतां उलट मलाच थांबवून ती म्हणाली, " होय हो होय, तें माहित आहे मला. रागाच्या भरांत मी म्हटलं असतं, कीं लग्न करा म्हणून—तर केलं असतंत ? "

" नाहीं. "

" नाहीं काय ? तुम्हीं काय हवं तें कराल. "

" नाहीं. साऱ्यांना सारंच कांहीं जमत नाहीं. "

राजलक्ष्मी बोलूं लागली, " रतनला स्वतःलाच काय वाटलं कोण जाणे, नुसतं माझ्याकडे त्यानं पाहिलं मात्र, त्याचे दोन्ही डोळे आंसवांनीं भरून आले. पत्र लिहून मी त्याच्या हातीं दिलं अन् टपालांत टाकायला सांगितलं तेव्हां तो म्हणाला ' छे, छे, हें पत्र टपालांत टाकण्याजोगं नाहीं. मी स्वतः जाऊन त्यांच्या हातीं देतों.' मी म्हटलं, उगीच पैसे खर्चीं घालण्यांत काय लाभ बाबा?' डोळे पुशीत रतन म्हणाला, 'काय झालंय तें काय मला माहीत नाहीं. पण तुम्हांला पाहिलं कीं असं वाटतं, कीं पद्मानदीचा तळ खचून गेलाय. झाडझाडोरा, घरदार घेऊन केव्हां वाहून नेईल त्याचा पत्ता नाहीं ! तुमच्या कृपेनं मला कांहीं कमी नाहीं बाई, हे पैसे तुम्हीं दिलेत तरी मी घेणार नाहीं. पण काशीविश्वेश्वरानं तुम्हांला बुद्धि दिली तर गांवीं तुमच्या दासीला कांहीं प्रसाद पाठवून द्या. ती निभावून घेईल.' "

मी म्हटलं, " बेटा न्हावी मोठा हुषार खरा."

राजलक्ष्मी ओंठ दाबून थोडीशी हंसली मात्र. ती म्हणाली, " आतां उशीर करूं नका. जा पाहूं. "

दुपारीं ज्यावेळीं ती मला वाढायला बसली त्यावेळीं मी म्हटलं, " काल नुसती साधी साडी नेसली होतीस, आज सकाळपासून ही बनारसी साडी नेसायची हौस कां आली ? "

" तुम्हींच सांगा ना. "

" मला माहित नाहीं. "

" खास माहित आहे. ओळखलीत का ही साडी ? "

" ओळखली. मीच ब्रह्मदेशांतून पाठवली होती. "

राजलक्ष्मी म्हणाली, " त्याच दिवशीं मी निश्चय केला कीं, आयुष्यांतल्या अत्यंत महत्त्वाच्या दिवशीं ही साडी नेसायची. त्याखेरीज हिला हात लावायचा नाहीं. "

" म्हणून आज नेसलीस ? "

" हो. म्हणूनच आज नेसलें. "

मी हंसून, " पण आतां तें होऊन गेलं. आतां बदलणार का ही ? "

ती उगीच राहिली. मी म्हटलं, " तूं आतां कालिघाटावर जाणार आहेस म्हणून कळलं मला. "

राजलक्ष्मी आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " इतक्यांत ? असं कसं होईल ? तुम्हांला खायला जेवायला घालून तुम्हीं झोंपी गेलांत कीं मग मला सवड व्हायची."

मी म्हटलं, " आतां सवड राहिली. हल्लीं तूं खाणंजेवणं टाकलं आहेस असं रतन म्हणत होता. काल दोन घांस खाल्ले होतेस अन् आज पुन्हां उपास सुरू झालाय. मी काय बेत केलाय माहित आहे ? आजपासून तुला अगदीं कडक शिस्तींत ठेवायचं. वाटेल तें करूं द्यायचं नाहीं. "

हंसत हंसत राजलक्ष्मी म्हणाली, " तर मग बरंच झालं म्हणायचं. आपलं जेवूनखाऊन स्वस्थ रहावं—कसलाच कांहीं जंजाळ नाहीं. "

मी म्हटलं, " म्हणूनच आज कालिघाटावर जायचं नाहीं. "

हात जोडून राजलक्ष्मी म्हणाली, " तुमच्या पाया पडतें. आजच्यापुरती एवढी भिक्षा घाला. त्यानंतर नबाबबादशहांच्या विकत घेतलेल्या बाँदीसारखी गुपचुप पडून राहीन. "

" ही एवढी लाडीगोडी कां ? "

" लाडीगोडी नव्हे—अगदीं खरोखर आजवर तुमचं वचन राखलं नाहीं, तुमचं ऐवलं नाहीं, चुकावर चुका करीत नुसतीं संकटं वाढवलीं मात्र. तुमच्यावर सत्ता गाजवणारी ती आपली लक्ष्मी आजपासून गेली—तिचा तिनंच आपला अधिकार घालवून टाकला ! "

मी पाहिलं, तों तिचे डोळे पाण्यानं भरून आले होते. ती म्हणाली, "आजच्या दिवसापुरती परवानगी द्या. नुसती देवीची आरती पाहून येतें. "

मी म्हटलं, " तें कांहीं नाहीं—उद्यां जा. सारी रात्र सेवा करीत बसलें होतें असं तूंच मला सांगितलंस. आज फार थकली आहेस—"

राजलक्ष्मी म्हणाली, " नाहीं—मुळींच थकलें नाहीं. नुसतं आजच कशाला, जेव्हां केव्हां तुमची प्रकृति बिघडे तेव्हां तेव्हां रात्रीच्या रात्री मी जागून काढल्या आहेत. पण मला कधीं कष्ट वाटले नाहींत. कसं कोण जाणे-पण आपोआप साऱ्या श्रमांचा परिहार होई. आज कित्येक दिवस देवधर्म विसरून गेलें होतें—मनच लागत नव्हतं—असं काय हें ! आजचा दिवस मला नाहीं म्हणूं नका—जायची परवानगी द्या. "

" तर मग चल, दोघंही बरोबर जाऊं. "

राजलक्ष्मीचे दोन्ही डोळे उल्हासानं उजळून उठले. ती म्हणाली, " चला तर. पण मनांत देवाची निंदा करणार नाहीं ना ? "

मी म्हटलं, " शपथेवर सांगतां यायचं नाहीं. तुझी वाट पहात फार तर देवळाच्या दारीं उभा राहिन. माझ्यासाठीं देवाजवळ जें कांहीं मागायचं तें तूंच माग म्हणजे झालं. "

" काय मागूं देवाजवळ ? "

अर्धा घांस तोंडात ठेवून विचार करूं लागलों पण कोणतीच कामना मनांत येईना. तेव्हां उलट मीच तिला विचारलं, " आतां तूंच सांग लक्ष्मी, माझ्या साठीं तूं काय मागशील ? "

राजलक्ष्मी म्हणाली, " आयुष्य मागेन, स्वास्थ्य मागेन, अन् यापुढं तुम्ही माझ्या बाबतींत अगदीं कठोर व्हावं असं मागेन. उगीच मला माझ्या लहरीनं वागूं देतांना तुम्हीं माझा सत्यानाश करणार नाहीं, असंही मागेन. आतां केलंच होतं कीं तसं ! "

" लक्ष्मी, हें बोलतेयस नुसती रागावून ! "

" राग तर आहेच. तें तुमचं पत्र विसरेन का कधीं ? "

मान खालीं घालून उगीच राहिलों.

स्वतःच्या हातानं माझं तोंड वर उचलून ती म्हणाली, " म्हणजे एवढंही मला सहन होत नाहीं वाटतं ? तुम्हीं कांहीं कधीं कडकपणा दाखवीत नाहीं—तुमचा स्वभावच नाहीं तसा ! आतां माझं मलाच यापुढं कडक झालं पाहिजे ! आतां हेळसांड करून चालायचं नाहीं. "

मी विचारलं, " काय आलंय मनांत ? आणखिन् खडा उपास ? "

राजलक्ष्मी हंसून म्हणाली, " उपासानं मला शिक्षा लागत नाहीं. उलट अहंकार वाढतो ! माझा मार्गच नव्हे तो. "

" मग कोणता मार्ग ठरवला आहेस ? "

" बरं, मी मनांत आणलं तर केव्हांतरी कठोरपणा दाखवूं शकेन, हें तरी पटतं का तुला ? "

" होय हो होय–अगदीं पटतं."

" मुळींच नाहीं. खोटं बोलतेस."

मान वेळावीत हंसत राजलक्ष्मी म्हणाली, " वाः ! खोटं तर ! पण तेंच माझं संकट झालंय ना गोसाई. बरं नांव शोधून काढलं त्या कमललतेनं. नुसतं अहो जाहो करतांना पुरे जन्म झाला होता. आजपासून आतां ' नवे गोसाई ' म्हणूनच म्हणणार. "

" खुशाल म्हण. "

राजलक्ष्मी म्हणाली, " तर मग एखादे वेळेस चुकून मीच कमललता म्हणून वाटायचं तुम्हांला !—तसं वाटलं तरी बरं म्हणतें मी ! काय बरोबर कीं नाहीं ? "

मी हंसून म्हटलं, " लक्ष्मी, माणसाचा स्वभाव मेल्याशिवाय जात नाहीं. बादशाही अंमलांतल्या दासीची गोष्ट कशाला हवी,—इतक्यांत तुला जल्लादाच्या हातीं देण्यांत आलं असतं. "

तें ऐकून राजलक्ष्मी हंसत सुटली आणि म्हणाली, " जल्लादाच्या हातीं केव्हांच दिलंय मला. "

मी म्हटलं, " पहिल्यापासून तूं इतकी दुष्ट आहेस, कीं कुठल्याच जल्लादाच्या

ह्यातून तुझी मुंडी छाटली जायची नाहीं!"

राजलक्ष्मी कांहीं तरी उत्तर देणार होती पण तितक्यांत एकदम दचकून उठून उभी राहिली आणि म्हणाली, "हें काय, जेवण झालं वाटतं? दूध कुठं घेतलं? माझ्या गळ्याची शपथ आहे—आधीं उठूं नका—"बोलत बोलत ती घाईघाईनं निघून गेली.

मी एक सुस्कारा सोडला अन् आपल्याशींच म्हटलं, "ही पुन्हां तीच कमललता!"

एक दोन मिनिटांत ती परत आली. दुधाची वाटी ताटाजवळ ठेऊन हातीं पंखा घेऊन वारा घालीत म्हणाली, "यापूर्वी असं वाटे, हें ठीक नाहीं—कुठं तरी पाप सांचलंय माझं. तिथं गंगामाटीला मन लागलं नाहीं—म्हणून परत काशीला आलें. गुरुदेवांना बोलावून आणलं, केंस कापले, दागिने फेकून दिले, एकदम तपस्विनी बनून पाहिलं. वाटलं कीं आतां कांहीं चिंता नाहीं—स्वर्गाला जायची सोन्याची शिडी तयार झालीसं वाटलं. एक अडचण तुम्हीं,—तेही निघून गेलांत. पण त्या दिवसापासून डोळ्यांतलं पाणी कांहीं खळेना. गुरूमंत्र विसरून गेलें, देवदेवतार्चन नाहींसं झालं, काळीज अगदीं कोरडं पडलं,—अशी भीति वाटली, कीं धर्मसाधन म्हणजे जर हें, तर असं कां होतं? शेवटीं वेड का लागणार मला?"

मी तोंड वर करून तिच्या तोंडाकडे एकदां पाहिलं आणि म्हणालों "तपस्या सुरू झाली कीं देवता पहिल्यानं अशी भीति दाखवते. त्यांतून टिकलं तर पुढं सिद्धिलाभ होतो."

राजलक्ष्मी म्हणाली, "सिद्धीची आतां मला जरूर नाहीं. ती मिळाली मला."

"कुठं मिळाली?"

"इथं—या घरांत."

"अगदीं खोटं! पुरावा दाखीव."

"तुम्हांला कसला पुरावा दाखवायचा? अडलंय माझं!"

"पण गुलामबांदी असं भाषण कधीं करीत नाहींत."

"पहा हं! मला चिडवूं नका. शंभर वेळ पुन्हां पुन्हां 'गुलामबांदी, गुलामबांदी' म्हटलं तर कामावर गोष्ट पडायची नाहीं माझ्या!"

"ठीक आहे. आतां सोडून दे तें. आजपासून तूं स्वतंत्र."

राजलक्ष्मी पुन्हां हंसत सुटली आणि म्हणाली, "स्वतंत्र कितीशी आहे तें आतां नसांनसांतून जाणवतंय मला. काल बोलतां बोलतां तुमचा डोळा लागला. माझ्या गळ्यावर असलेला तुमचा हात बाजूला सारून मी उठून बसलें. हात लावून पाहिलं, तों घामानं कपाळ भिजलेलं पदरानं घाम पुसून एक पंखा घेऊन बसलें. मिणमिणता दिवा सारून मोठा केला—तुमच्या झोंपलेल्या चेहऱ्यावरून माझे डोळे ढळेनात. पूर्वी कसं मला दिसलं नाहीं?—कसा तो सुंदरपणा मी पाहिला नाहीं? एवढे दिवस मी आंधळी का होतें? मी आपल्याशींच म्हटलं, 'हेंच जर पाप असेल तर हवं कशाला मला तें पुण्य? हाच जर अधर्म असेल तर आतां राहूं दे ती धर्मचर्चा. आयुष्यांत जर याला खोटं म्हणायचं, तर अजाणपणीं यांना मी वरलं तें कुणाच्या सांगण्यामुळं?'—हें काय? दूध नको वाटतं? तसंच दूध पडून राहिलंय तें."

"आतां पुरे झालं."

"तर मग फळं आणूं का थोडीं?"

"नको. आतां कांहीं नको."

"किती थकलां आहांत तुम्हीं हे!"

"थकलोंच असेन तर तो फार दिवसांच्या हेळसांडीमुळं. एकच दिवसांत सगळी भरपाई करूं लागलीस तर उगीच मरून जाईन."

आंतरिक वेदनेनं तिचा चेहरा पांढरा फटक पडला. ती म्हणाली, "आज-पासून नाहीं. झाली शिक्षा तेवढी पुरे झाली. हें मिळालं हेंच पुष्कळ आहे—" क्षणभर उगीच राहून ती हळूहळू बोलूं लागली, "उजाडतांच उठून बाहेर आलें. ही तुमची कुंभकर्णी झोंप सहज मोडत नाहीं म्हणून बरं, नाहीं तर लोभाच्या लालचीनं तुम्हांला उगीच जागं केलं असतं मात्र. त्यानंतर दरवानाला बरोबर घेतला आणि गंगेवर जाऊन आंघोळ केली. आई गंगेनं सारा मनस्ताप धुवून टाकला. घरीं येऊन आन्हिकाला बसलें, तेव्हां कुठं मला कळलं, कीं तुम्हीं कांहीं एकटेच आलां नाहींत!—पूजेचा मंत्र आला, माझी इष्टदेवता आली, गुरुदेव आले—आणि माझे श्रावणांतले मेघ पण आले. आज देखील डोळयांतून तसंच पाणी सांडूं लागलं. पण तें काळीज पिळून काढलेलं रक्ताचं आसूं नव्हतं—आनंदाच्या कल्लोळानं उठलेल्या त्या झरण्या होत्या—अगदीं अंतर्बाह्य मला भिजवून धुवून पुसून टाकलं त्यांनीं!—दोन फळं आणूं का? विळी घेऊन जवळ

बसून स्वतःच्या हातानं फार दिवसांत तुम्हांला फळं तासून दिलीं नाहींत मी ! जाऊं ? आणूं ? ”

तशीच एकदम उठून राजलक्ष्मी निघून गेली.

पुन्हां मी एक मोठा सुस्कारा सोडला. ही पुन्हां तीच कमललता.

हिच्या जन्मकाळीं सहस्रनामांतून शोधून काढून ‘ राजलक्ष्मी ’ नांव कुणी कां दिलं कोण जाणे !

कालीघाटावरून दोघंही परत फिरलों तेव्हां रात्रीचे नऊ वाजले होते. स्नान करून वस्त्र बदलून राजलक्ष्मी अगदीं सहजपणें माणसासारखी येऊन माझ्याजवळ बसली. मी म्हटलं, “ राजपोषाख गेला !—सुटलों ! ”

मान वेळावीत राजलक्ष्मी म्हणाली, “ खरोखरच तो माझा राजपोषाख— खुद्द राजानंच दिलेला ना ? मी मेलें कीं तीच साडी माझ्या अंगावर घालायला सांगा. ”

“ ठीक आहे. तसंच करूं हं ! पण सारा दिवस तूं आज नुसती स्वप्नं बघतच का घालवणार ? . जेव ना आतां घासभर. ”

“ जेवतें. ”

“ रतनलाच सांगतों, कीं भटजीला म्हणावं, तुझं जेवण इथंच घेऊन ये. ”

“ इथं ? ऐका तर खरं ! तुमच्यासमोर बसून जेवण जाईल का मला ? कधीं पाहिलं होतं का समोर जेवतांना ? ”

“ पाहिलं नव्हतं, पण पाहिलं तर त्यांत काय दोष ? ”

“ असं कधीं झालंय ? बायकांचं खाणं राक्षसी असतं. तुम्हां लोकांना तें कसं दिसूं देऊं आम्हीं ! ”

“ आज हें ढोंग चालायचं नाहीं बरं लक्ष्मी. निष्कारण उपास करायला यापुढं मी मुळींच द्यायचा नाहीं तुला. आतां जेवली नाहींस तर मी बोलणार नाहीं तुझ्याबरोबर. ”

“ ... न का बोलाना ! ”

“ मीही जेवण बंद करीन ! ”

राजलक्ष्मी हंसत सुटली. ती म्हणाली, “ आतां मात्र जिंकलंत. तेवढं मात्र पटायचं नाहीं मला. ”

भटजीनं फराळाचं आणून ठेवलं—फळंमुळं, मिठाई. उगीच थोडंसं उष्टावून ती म्हणाली, “ रतननं तुमच्याकडे तक्रार केली कीं मी जेवीत नाहीं म्हणून—

पण कसं जेवण जाईल सांगा ना ? बुडालेल्या दाव्यावर अपिल करण्यासाठीं कल-कत्त्याला आलें. रोज रतन तुमच्या घरीं जात होतां आणि रोज परत येत होता. पण तुमची भेट झाली असं तो म्हणेल या भीतीनं त्याला कांहींच विचारीत नव्हतें. पण बाबू कांहीं आले नाहींत ? असा हा मूर्खपणा केला मी. मला बोलायला कुठलं तोंड आहे ? "

" बोलायची काय जरूर ? कोळी जसा माशीला पकडतो तसं स्वतः घरीं येऊन मला पकडून नेतां आलं असतं कीं ! "

" माशी कोण ? तुम्हीं ? "

" असं वाटतं मला. माशीसारखा निरुपद्रवी प्राणी कोण आहे या जगांत ?"

बराच वेळ उगीच राहून नंतर राजलक्ष्मी म्हणाली, " तसं पाहिलं तर तुमची मला जितकी भीति वाटते तितकी दुसऱ्या कुणाचीच नाहीं. "

" ही थट्टा झाली—पण कारण विचारूं का या भीतीचं ? "

पुन्हां क्षणभर माझ्याकडे पहात राहिल्यानंतर राजलक्ष्मी म्हणाली, " त्याचं कारण हेंच—मी तुम्हांला ओळखतें. तुम्हांला बायकांच्या जातीबद्दल मनापासून एवढीसुद्धां आसक्ति नाहीं. आहे काय तो तोंडदेखला शिष्टाचार. या जगांत तुम्हांला कुणाबद्दल कसलाच ओढा नाहीं. तुम्हांला त्याची जरूरीही वाटत नाहीं. तुम्ही ' नाहीं ' म्हटलंत तर तुम्हांला मागं परतवायचं कसं ? "

मी म्हटलं, " थोडीशी चूक होतेय लक्ष्मी. या जगांत एकाच वस्तूबद्दल मला ओढा आहे,—ती तूं ! केवळ एवढ्याच जागीं ' नाहीं ' म्हणणं मला कठीण जातं. एवढं सोडून हा श्रीकांत या दुनियेंतल्या सर्वस्वावर लाथ मारील हें तुला अजूनपर्यंत कळलं नाहीं ! "

" हात धुवून येतें ! " असं म्हणून राजलक्ष्मी तडकाफडकीं उठून निघून गेली.

दुसऱ्या दिवशीं सकाळपासून संध्याकाळपर्यंतचीं सारीं कामंधामं उरकून राज-लक्ष्मी माझ्याजवळ येऊन बसली आणि म्हणाली, " आतां कमललतेची गोष्ट सांगायची गडे. "

जेवढं मला माहित होतं तेवढं सर्व तिला सांगितलं. फक्त स्वतःच्या बाबतींत कांहीं कांहीं गोष्टी बाद दिल्या. म्हटलं, उगीच गैरसमज व्हायला नको.

अथपासून इतिपर्यंत सारी हकिकत ऐकून घेतल्यावर ती हळुहळू म्हणाली, " यतिनच्या मृत्यूचा धक्का तिला कोणत्याही गोष्टीपेक्षां जास्त जाणवला असला

पाहिजे. तिच्याच चुकीनं मेला ना तो ?"

"तिची चूक कसली ?"

"चूक नव्हे तर काय ? कमललतेनं आधीं त्यालाच बोलावलं होतं— निष्कारण डाग लागूं नये म्हणून आत्महत्या करण्यासाठीं त्याची मदत मागितली. त्यावेळीं यतिननं कबूल केलं नाहीं. पण तसाच प्रसंग त्याच्या स्वतःवर आला त्यावेळीं तोच मार्ग त्याला नजरेसमोर दिसला. असंच होतं हें ! तेव्हां पापाच्या बाबतींत मदत करायला कधीं मित्राला हाक घालूं नये. त्यामुळं एकाचं प्रायश्चित्त दुसऱ्याच्या मानगुटीवर बसतं. ती स्वतः बचावली—पण मेलं तिचं मायेचं माणूस !"

"तुझं धोरण कळलं नाहीं मला लक्ष्मी ?"

"तुम्हाला कसं कळेल तें ? तें कळेल कमललतेला—तें कळेल तुमच्या राजलक्ष्मीला."

"अं: !—असं का ?"

"असं तर काय ? तुमच्याकडे पाहूं लागलें म्हणजे मला कांहींच बोलतां येत नाहीं."

"पण कालच मला सांगितलंस ना, कीं मनांतली सारी झांपड दूर झाली म्हणून ?—सारी ग्लानि गेली म्हणून ?—तें खोटंच का ?"

"खोटं तर काय. सारी झांपड एकदांच जाईल—मेल्यावर ! त्यापूर्वी नव्हे. मरावंसं वाटत होतं पण जगून राहिलें केवळ तुमच्यासाठीं."

"तें माहित आहे मला. पण पुन्हां पुन्हां जर हेंच ऐकवीत राहशील मला, तर असा नापत्ता होईन, कीं शोधून सुद्धां दाद लागायची नाहीं तुला."

घाबरून माझा हात धरून राजलक्ष्मी तो आपल्या हृदयाशीं नेत म्हणाली, "असं कांहीं बोलायचं नाहीं बरं. तुमचा नेम नाहीं—तुम्हीं हवं तें कराल—तुमच्या निर्दयपणाला सीमा नाहीं."

"तर मग तूं देखील असं कांहीं बोलणार नाहींस म्हणून कबूल कर."

"नाहीं बोलणार."

"मनांतसुद्धां आणणार नाहींस तसं ?"

"मला टाकून केव्हांच कुठं जाणार नाहीं म्हणून आधीं कबूल करा."

"मी कधींच तुला टाकून गेलों नाहीं लक्ष्मी. जेव्हां केव्हां दूर झालों तो तुलाच माझी जरूरी वाटली नाहीं म्हणून."

" ती लक्ष्मी तुमची लक्ष्मी नव्हे—ती सटवी होती दुसरीच कुणी तरी."

" त्या दुसऱ्याच कुणीतरीची भीति वाटते ना मला!"

" नाहीं, आतां तिची भीति नाहीं. ती सटवी आतां मेली!" असं म्हणून माझा हात अगदीं जोरानं दाबून ती उगीच बसून राहिली.

पांच चार मिनिटें अशाच प्रकारें गेल्यावर तिनं दुसराच विषय काढला. ती म्हणाली, " खरोखरच का ब्रह्मदेशाला जाणार ?"

" खरोखरच जाणार."

" जाऊन काय करणार ? नोकरी ? आपण सारीं दोन माणसं—आपल्याला असं काय आणखी हवंय ?"

" पण कांहीं तरी हवं आहे ना ?"

" तें देव देईल. पण तुमच्यानं कांहीं नोकरी व्हायची नाहीं. नोकरीसाठीं तुमचा जन्म नव्हे—"

" नाहीं झाली नोकरी तर परत येईन."

" परत याल तें माहित आहे. नुसती अढी धरून एवढ्या दूर मला ओढून नेऊन त्रास द्यायचा एवढंच तुमच्या मनांत आहे झालं."

" मग त्रास करून घेऊं नको."

रागानं माझ्याकडे पहात राजलक्ष्मी म्हणाली, " चला, ढोंग करूं नका."

मी म्हटलं, " ढोंग करीत नाहीं. तूं माझ्याबरोबर आलीस तर खरोखरच तुला त्रास होईल. रांधणं वाढणं, भांडीं घासणं, घरदार झाडून पुसून साफ करणं बिछाना घालणं—"

राजलक्ष्मी म्हणाली, " मग नोकर चाकर काय करणार ?"

" कुठले आलेयत नोकर चाकर ? पैसे कुठं आहेत नोकर ठेवायला ?"

राजलक्ष्मी म्हणाली, " नसले नोकर तर नसले. तुम्हीं कितीही भीति घातलीत तरी मी येणारच."

" चल तर. तूं अन् मी सारखीं कामाला लागतों,—कीं झगडा करायला फुरसदच मिळायची नाहीं कुणाला. पूजा—आन्हिक—उपास करायलासुद्धां वेळ मिळायचा नाहीं."

" नाहीं तर नाहीं! काम करायला मी भीतें वाटतं ?"

" भीत नाहींस खरी पण तसलीं कामं तुला झेपायचीं नाहींत. दोन दिवसांत

" तें कबूल आहे मला. पण हें एवढं सामानसुमान, ही एवढी मेवामिठाई, ही सगळी तयारी—"

राजलक्ष्मी म्हणाली, " देवदेवतेच्या स्थळांत जायचं तें काय रिकाम्या हातांनीं ? अन् तुम्हांला तर वाहून न्यावं लागत नाहीं ना हें ? तुम्हांला कां पंचाईत ? "

मला पंचाईत कसली होती हें मी कुणाला सांगूं ? सर्वांत मला मोठी भीति होती ती, वैष्णव बैराग्यांच्या शिवाशिवीचा देवाचा प्रसाद ती मस्तकीं धारण करील पण तोंडांत घालणार नाहीं याचीच. तिथं गेल्यावर कांहीं तरी कारण काढून कदाचित् उपवास सुरू करील, कीं स्वतः रांधायला बसेल, तें सांगतां आलं नसतं. कांहीं झालं तरी राजलक्ष्मी मनानं मोठी सभ्य होती एवढी माझी खात्री होती. निष्कारण कुणावर तुटून पडून कुणालाही त्रास देण्याची प्रवृत्ति तिला नव्हती. असं कांहीं करावंसं वाटलं तर गंमती गंमतीनं, हंसतमुखानं तिनं अशा रितीनं तें जमवून घेतलं असतं, कीं मी आणि रतनखेरीज इतर कुणालाच त्यांतलं रहस्य कळलं नसतं.

स्वतःच्या देहाची राजलक्ष्मी फारशी पर्वा करीत नसे. संयम आणि उपास यांच्या संवयीनं तिच्या देहाला एक दीप्तिमान दुर्बलता आली होती. अलिकडची तिची राहणी मोठी विचित्र झाली होती. सकाळींच उठून स्नान करायचं, गंगेच्या घाटावर जाऊन उढिया पांड्यानीं तयार केलेला अलकाचा टिळा माथीं लावायचा, फुलं—फळं—पानंवेलीनीं नटवलेली वृंदावनी साडी नेसायची, अंगावर एकादा दुसरा ठळकसा दागिना असायचा—मुद्रेवर मोठी गोड प्रसन्नता धारण करून ती आपल्याच रंगांत कांहींतरी कामांत गुंतलेली असायची.

काल मोठे आरसे लावलेल्या दोन आलमारी विकत आणल्या होत्या. आज जायच्यापूर्वी घाईघाईनं बरंचसं सामानसुमान ती त्यांत कोंबून टाकीत होती. काम करीत असतांना हातांतल्या बांगड्यांचे पैलू मधून मधून चमकत होते. हिरे आणि पाच बसवलेल्या गळयांतल्या हाराच्या निरनिराळ्या रंगांच्या छटा नेसलेल्या वस्त्राच्या आंतून झळकून उठत होत्या. कानाजवळ देखील कसली तरी निळीनिळी चमक मारत होती. टेबलावर चहा प्यायला बसल्या वेळीं मी सारखा तें दृश्य पहात होतों.

तिचा एक मोठा दोष होता, घरीं ती कधीं चोळी पोलकं घालीत नसे. त्यामुळं कंठ आणि बाव्हळे केव्हां केव्हां बेसावधपणें क्षणभर उघडे होऊन पडत—आणि

विचारलं तर ती हंसून म्हणे, "एवढं होत नाहीं बुवा आपल्याला. किती झालं तरी मी खेडेगांवची रहाणारी. रात्रंदिवस बिबीगिरी करणं मला नाहीं सोसत!"

अर्थात याचा अर्थ असा, कीं अंगावर फार कपडे घालणं हें प्रकृतीच्या दृष्टीनं फारसं चांगलं नव्हे.

आलमारीचा दरवाजा बंद करतांना आरशांतलं माझं प्रतिबिंब तिच्या नजरेला आलं. घाईघाईनं पदर ओढून घेऊन ती एकदम फिरून माझ्याकडे पाहून रागाचा आव आणून म्हणाली, "अजून पहात राहिलां आहांत? असं पुन्हां पुन्हां माझ्याकडे पहात रहातां कशाला ?" असं म्हणून ती सारखी हंसूं लागली.

मीही हंसलों आणि म्हणालों, "कुणाच्या ऑर्डरबरहुकूम ब्रह्मदेवानं तुला घडवलं याचा मी विचार करीत होतों."

राजलक्ष्मी म्हणाली, "तुमच्या! नाहींतर असली जगावेगळी पसंती असायची कुणाची ? माझ्या आधीं पांच सहा वर्षं आलांत ना, येतांना ब्रह्मदेवाला सांगून आलांत त्याची आठवण नाहीं वाटतं ?"

"नाहीं. पण तुला कसं कळलं हें ?"

"इकडे पाठवतांना त्यानं हळूच माझ्या कानांत सांगितलं!—झाला ना चहा घेऊन ? उशिर झाला तर आज जाणं व्हायचं नाहीं."

"नाहीं तर नाहीं."

"कां बरं ?"

"तिथं त्या गर्दीत तूं मला शोधून सुद्धां सांपडायची नाहींस."

राजलक्ष्मी म्हणाली,"मी सांपडेन,पण तुम्हींच सांपडलांत मला कीं भाग्य माझं."

मी म्हटलं, "तेंही एकंदरींत ठीक नव्हे."

ती हंसून म्हणाली, "चला, पुष्कळ झालं! उठा पाहूं आतां. तिथं नव्या गोसाव्यासाठीं एक म्हणे स्वतंत्र खोली आहे. मी तिथं गेलं कीं आधीं तिथला कडीकोयंडा तोडून टाकीन, मग कांहीं शोधीत रहायची जरूरी नाहीं. हवी तेव्हां दासी हजर."

"चल तर मग."

आम्हीं जेव्हां मठांत जाऊन पोंचलों तेव्हां नुकतीच देवाची मध्यान्हीची पूजा संपली होती. बोलवल्याशिवाय, कळवल्याशिवाय, एवढे प्राणी अकस्मात हजर झाले हें पाहून ते लोक खूष झाले कीं काय, हेंच मला कळेना.

बडे गोसावी आश्रमांत नव्हते. आपल्या गुरुजीच्या भेटीसाठीं पुन्हां नवद्वीपला गेले होते. या मधल्या मुदतींत एकदोन बैराग्यांनीं येऊन माझ्या खोलींत ठाणं दिलं होतं.

कमललता, पद्मा, लक्ष्मी-सरस्वती आणि आणखीही बऱ्याच जणींनीं येऊन मोठ्या आदरानं आमचं स्वागत केलं. गहिऱ्या आवाजांत कमललता म्हणाली, " नवे गोसाई, इतक्या लवकर तुम्हीं येऊन भेट द्याल असं कांहीं वाटलं नव्हतं. "

कधीं काळची ओळख असावी त्याप्रमाणं राजलक्ष्मीनं बोलायला सुरवात केली. ती म्हणाली, " कमललता ताई, गेले कांहीं दिवस हे सारखे तुमच्या गोष्टी बोलत होते. यापूर्वींच येणार होतें इकडे. केवळ माझ्यामुळं येणं घडलं नाहीं. तो सारा माझा दोष."

कमललतेचा चेहरा क्षणभर गोरामोरा झाला. फिस्कन हंसून पद्मेनं नजर फिरवली.

राजलक्ष्मीचा एकंदर रुबाब आणि चेहरा पाहून ती कुणीतरी घरंदाज बाई असावी असं सर्वांनाच वाटलं होतं. केवळ तिचं माझं नातं काय याचाच त्यांना नक्की अंदाज करतां येत नव्हता. तिचा परिचय करून घेण्यासाठीं साऱ्याच उतावीळ झाल्या होत्या हें राजलक्ष्मीच्या ध्यानीं आल्यावांचून राहिलं नाहीं. ती म्हणाली, " कमललताताई, मला नाहीं का ओळखलं ? "

कमललता मान हलवून म्हणाली, " नाहीं."

" वृंदावनांत कधीं पाहिलं नाहीं मला ? "

कमललताही वस्ताद होती. तिनं ही थट्टा ओळखली आणि हंसून म्हटलं, " कांहीं आठवत नाहीं बाई."

राजलक्ष्मी म्हणाली, " तेंच बरोबर आहे ताई. मी याच गांवची. उभ्या जन्मांत कधीं वृंदावनाच्या आजूबाजूलासुद्धां गेलें नाहीं." असं म्हणून ती हंसू लागली.

लक्ष्मी—सरस्वती आणि बाकीच्या सगळ्या निघून गेल्यावर ती माझ्याकडे निर्देश करून म्हणाली, " आम्ही दोघेंही एकाच गांवचे. एकाच पंतोजीच्या शाळेंत शिकत होतों. अगदीं भाऊबहिणीसारखा आमचा लोभ होता. गांवच्या चालीप्रमाणें मी यांना ' दादा ' म्हणून हांक मारी. अगदीं बहिणीसारखं यांचं माझ्यावर प्रेम होतं—कधीं माझ्या अंगाला बोटसुद्धां लावलं नव्हतं यांनीं." माझ्याकडे वळून ती म्हणाली, " खरं आहे ना मी सांगतें आहे तें ! "

पद्मा खूष होऊन म्हणाली, " तरीच तुम्हीं एवढीं सारखीं दिसतां तीं !

दोघंही सारखीं उंच—तुम्हीं गोऱ्या दिसतां, नवे गोसाई काळे आहेत—तरी दोघांना पहातांच पटलं, कीं दोघंही सारखींच!"

राजलक्ष्मी गंभीर होऊन म्हणाली, "तसं असायचंच. आम्हीं एकासारखीं एक असणार नाहीं तर असणार कशीं, पद्मा?"

"अगबाई, माझं नांवसुद्धां माहित आहे तुम्हांला? नव्या गोसाव्यांनीं सांगितलं वाटतं?"

"सांगितलं म्हणूनच तुम्हां लोकांना भेटायला आलें. म्हटलं, एकटेच कां जातां, मीसुद्धां येतें बरोबर. तुम्हीं बरोबर असलांत कीं मला कसलीच भीति नाहीं—दोघंही बरोबर असलीं कीं कुणी नांवं ठेवायचं नाहीं. अन् ठेवलंच नांव तर बिघडलं काय? वीष नीळकंठाच्या गळ्यापर्यंत रहायचं, पोटांत जायचं नाहीं."

आतां माझ्यानं स्वस्थ रहावेना. बायकांची थट्टेची रीत कशी असते ती त्यांची त्यांनाच माहित. मी रागारागानं म्हटलं, "उगीच कशाला त्या पोरीसमोर अशी खोटीनाटी थट्टा करतेस?"

राजलक्ष्मी अगदीं साळसूदपणें म्हणाली, "मग खरी थट्टा कशी करायची ती सांगा ना मला. जें कांहीं सांगायचं तें मी सरळपणें सांगितलं, त्याचा एवढा राग कां आला तुम्हांला?"

मला राग आला होता—तरीही तिचं तें उसनं अवसान पाहून मी हंसत सुटलों. मी म्हटलं, "अगदीं खरंखरं सांगतों कमललता, असली फाजील, सैतान बाई या जगांत दुसरी सांपडायची नाहीं. मोठी मतलबी आहे ही, हिच्या बोलण्यावर सहसा विश्वास ठेवूं नकोस."

राजलक्ष्मी म्हणाली, "कां उगिच माझी निंदा करतां गोसाई? तुमच्याच मनांत माझ्याविषयीं कसला तरी किंतु आहे वाटतं!"

"आहे तर."

"पण माझ्या नाहीं. मी निष्कलंक आहें."

"होय बरं युद्धिष्ठिरमहाराज!"

कमललता हंसली, पण ती राजलक्ष्मीच्या बोलण्याच्या अवसानामुळं. तिला एकंदरींत चांगलासा अंदाज आला नसावा असं वाटलं. ती घोंटाळ्यांत पडलेली दिसली. पूर्वी मी कुणाही स्त्रीसंबंधीं तिच्याजवळ कांहींच बोललों नव्हतों—नुसता अंदाजसुद्धां दिला नव्हता. अन् द्यायची जरुरी तरी काय होती? तो अंदाज

द्यायला त्यावेळीं कारण तरी काय होतं ?

कमललतेनं विचारलं, " नांव काय तुमचं ? "

" माझं नांव राजलक्ष्मी—त्यांतलं अर्धं टाकून हे नुसतं ' लक्ष्मी ' म्हणतात मला. मी यांना नुसती ' अहो, जाहो ' म्हणतें. हल्लीं हल्लींच मी यांना ' नवे गोसाई ' म्हणायला सुरवात केली आहे. आतां तुम्हींच सांगा, हें बरं कीं नाहीं ? "

एकदम टाळी पिटून पद्मा म्हणाली. " जळ्ळं मेलीचं तोंड, मोठीच अक्कल-वान कीं नाहीं ! काय कळलं सांग पाहूं ? "

" अगदीं बरोबर कळलं. सांगूं ? "

" काय नको सांगायला जा. " असं म्हणून तिनं मोठ्या प्रेमानं राजलक्ष्मीचा हात धरून म्हटलं, " उगीच बोलण्यांत वेळ जातोय, दुपारच्या उन्हांत चेहरा कसा सुकून गेलाय. खाणंपिणं उरकून कांहीं येणं झालं नसेल. चला, हातपाय धुवून देवाला प्रणाम करा, मग सारीं मिळून देवाचा प्रसाद घेऊं. तुम्हींही चला हो गोसावी ! " असं म्हणून तिनं तिला मंदिराच्या बाजूकडे ओढून नेलं.

आतां मात्र मोठी पंचाईत झाली. इथं येतांच प्रसादाचं आमंत्रण येणार हें ठरलेलंच होतं. शिवाशिवीच्या बाबतींत राजलक्ष्मीचीं मतं अशीं कांहीं निश्चित होऊन बसलीं होतीं, कीं त्या बाबतींत खऱ्याखोट्याचा प्रश्न आणणं चुकीचं झालं असतं. ती तिची नुसती श्रद्धा नव्हती—तो तिचा स्वभाव होऊन राहिला होता. त्याखेरीज तिला जगतांच आलं नसतं. आयुष्यांतील या एकाच आचाराच्या सहज आणि सक्रीय सजीवतेमुळं कित्येक प्रसंगीं कित्येक संकटांतून ती कशी बचावली होती तें इतरांना सांगून कळलं नसतं. ती स्वतः बोललीच नसती—अन् तें कळण्यांत तरी कोणता लाभ होता ?

राजलक्ष्मीची भेट व्हावी अशी अपेक्षा नसतांना दैववशात् तिची भेट झाली. आज माझ्या सर्वस्वांतली मोठ्यांतली मोठी ठेव ती होती, एवढंच मी जाणतों —पण यावेळीं त्या गोष्टी कशाला ?

तिचे जे हे कांहीं कठोर नियम होते ते स्वतःपुरते. तीं बंधनं ती दुसऱ्यांवर लादीत नसे. उलट हंसून म्हणे, ' एवढा त्रास कुणी कशाला घ्यावा ? इतकं बारीकसारीक पाहूं लागलं तर माणसाला जगणंसुद्धां कठीण होईल. '

मी असलीं बंधनं मानीत नव्हतों हें तिला माहित होतं. तिच्या नजरेसमोर मी

कसला कांहीं अत्याचार केलेला तिला दिसला नाहीं म्हणजे ती खूष असे, तिच्या दृष्टीआड माझ्याकडून घडलेल्या अनाचारांबद्दल जर कांहीं तिच्या कानीं आलं तर दोन्ही कानांत बोटं घालून ती आपलं समाधान करून घेई—केव्हां केव्हां गालावर हात ठेवून आश्चर्य प्रदर्शित करी आणि म्हणे, " कां असं हें करतां ? हें माझंच का दुर्दैव ? तुमच्यामुळं माझे सारे आचारविचार फुकट गेले. "

पण आजचा प्रसंग अगदींच वेगळा होता. या निर्जन मठांत जे कांहीं प्राणी सुखासमाधानानं रहात होते ते वैष्णवधर्माची दीक्षा घेतलेले होते. हे लोक जातीभेद मानीत नसत. कुणाच्या पूर्वाश्रमीची कथा कुणि हिशेबांत घेत नसे, त्यामुळं अतिथि म्हणून कुणि आला, कीं निःसंकोच श्रद्धेनं ते देवाचा प्रसाद त्याला देत आणि आजवर अशा रीतीनं दिलेला प्रसाद कुणि दूरही लोटीत नसे. पण आज केवळ माझ्यामुळं अनाहुतपणें हा असला अप्रीतिकर प्रसंग घडून आला तर माझ्या दुःखाला पारावार राहिला नसता. कमललता तसं कांहीं बोलून दाखवणार नाहीं. कुणाला तसं बोलूंही देणार नाहीं,—कदाचित् नुसतं माझ्याकडे एकवार पाहून मान खालीं घालून निघून जाईल हें मला माहीत होतं. त्या अबोल तक्रारीला जबाब कशा प्रकारें द्यायचा याचा मी विचार करीत होतों. तितक्यांत पद्मा आली आणि म्हणाली, "चला नवे गोसाई, त्या बोलावताहेत तुम्हांला. हातपाय धुतलेत का ? "

" नाहीं. "

" या तर मग. मी पाणी देतें. प्रसाद तयार आहे. "

" प्रसादाला काय आहे आज ? "

" आज देवाला अन्नाचा नैवेद्य आहे. "

.मी मनांतल्या मनांत म्हटलं, ' तर मग हा प्रसंग बिकट आहे. ' मी उघड विचारलं, " कुठं पानं मांडलीं आहेत ? "

पद्मा म्हणाली, " देवघराच्या व्हरांड्यावर. बुवाजींबरोबर तुम्ही बसायचं अन् आम्हीं बायका मागनं बसूं. राजलक्ष्मीताई स्वतः वाढणार आहे आम्हांला."

" ती नाहीं का जेवायची ? "

" नाहीं. ती कांहीं आमच्यासारखी वैष्णव नव्हे. ब्राह्मणाची बाई—आमच्या हातचं पाणीसुद्धां चालायचं नाहीं तिला. "

" मग तुझी कमललताताई रागावली नाहीं तिला ? "

" कां रागावेल ?—उलट हंसूं लागली. राजलक्ष्मीताईला म्हणालें, 'पुढल्या जन्मीं आपण दोघी एका आईच्या उदरीं जन्माला येऊं. मी आधीं येईन अन् तूं मागाहून ये. अन् मग दोघीही बहिणी एका ताटांत बसून आईनं वाढलेलं जेवण जेवूं. अन् मग बाटाबाटीचं नांव काढलं तर आई चांगले कान पिळील तुझे !' "

तें ऐकून मी खूष झालों. वाटलं, आतां हें ठीक जमलं. आजवर राजलक्ष्मीला कुणी तोडीला तोड माणूस मिळालं नव्हतं.

मी विचारलं, " मग ती काय म्हणाली ? "

पद्मा म्हणाली, " तें ऐकून राजलक्ष्मीताईसुद्धां हसूं लागली. म्हणाली, 'आईच कशाला हवी ताई ? तूंच मोठी बहीण म्हणून मला चांगलीच कानपिळणी दे ना ! धाकट्या बहिणीचा हट्ट कोण मानतंय ?' "

तिचं तें उत्तर ऐकून मी उगीच राहिलों. या भाषणाच्या आड असणारा अर्थ कमललतेला कळला नाहीं म्हणजे ठीक, एवढीच मागणी करीत होतों.

माझी मागणी मंजूर झाल्यासारखी दिसली—कमललतेनं तें भाषण हिशेबांत घेतलं नाहीं, इतकंच नव्हे, पण ही मतभेदाची बाब कबूल करूनसुद्धां इतक्यांतच त्या दोघींची मोठी गट्टी जमल्यासारखी दिसली.

तीन प्रहरच्या गाडीनं बडे गोसाई द्वारकादास परत आले. त्यांच्याबरोबर आणखी एक बुवाजी आला होता. त्याच्या अंगावरील छापाचं परिणाम आणि वैचित्र्य पाहून तो अगदींच साधारणपैकीं नव्हता असं दिसून आलं.

मला पहातांच बडे गोसाई फार खूष झाले. पण त्यांच्या साथीदारांनीं मला फारसं हिशेबांत धरलं नाहीं. कां धरावं ? कारण त्यांतला एकजण मोठा प्रख्यात कीर्तनकार आणि एकजण मृदंगवादनपटु असल्याचं मला कळलं.

प्रसादसेवन झाल्यावर मी मठाबाहेर पडलों. तीच मरतुकडी नदी आणि तींच जंगली झाडंझुडपं. चोहींकडे असलेल्या कळक आणि बेताच्या बेटांतून आंगची चामडी निभावून जाणं मुष्कील.

सूर्यास्ताच्या वेळीं नदीच्या कांठीं बसून निसर्गाची शोभा पहाण्याचा मी बेत केला. पण जवळच कुठं तरी 'अंधारमाणिक' फूल फुललं होतं. त्याच्या सडक्या मासाच्या घाणीसारख्या वासामुळं तिथं बसवेना. मी आपल्याशींच म्हटलं, " हे कवी फुलांचं एवढं कौतुक करतात—कुणी तरी हें फूल नेऊन त्यांना कां

देत नाहीं ? ”

संध्याकाळीं परत येऊन पाहिलं तों तिथं मोठी धामधूम सुरू होती. देवघर सजवलं होतं. आरती झाल्यावर कीर्तनाची बैठक बसणार होती.

पद्मा म्हणाली, “ नवे गोसाई, तुम्हांला कीर्तन फार आवडतं—आज मनोहर-दास बुवाजींचं गाणं ऐकलं तर तुम्हीं थक्क होऊन जाल. भारीच सुंदर गातात.”

वैष्णव कवींच्या मधुर पदांइतकं मला दुसरं कोणतंच गाणं आवडत नसे. मी म्हटलं, “ खरोखरच मला फार आवडतं पद्मा. लहानपणीं दोन चार कोसांत कुठं कीर्तन होणार म्हणून ऐकलं तर मी धांवत जात असे. घरीं रहाणं अशक्य होई मला. कळो वा न कळो, पण शेवटपर्यंत बसत असे. तूं आज गाणार ना कमललता ? ”

कमललता म्हणाली, “ नाहीं गोसाई, आज नाहीं. तसा कांहीं माझा अभ्यास झालेला नाहीं. या मोठ्या लोकांसमोर गायला मला लाज वाटते. शिवाय मागं आजारी पडलें होते तेव्हांपासून गळा धरलाय तो अजून बरा झाला नाहीं. ”

मी म्हटलं, “ पण लक्ष्मी तर तुझंच गाणं ऐकण्यासाठीं आलीय. तुझ्या गाण्याबद्दल मी अति करून सांगतों असं तिला वाटतं. ”

कमललता लाजून म्हणाली, “ खरोखरच तुम्हीं अति करून सांगत असाल गोसाई. ” राजलक्ष्मीकडे वळून ती हंसून म्हणाली, “ पण तूं कांहीं मनांत आणूं नकोस ताई, जें काहीं मला येतंय तें पुन्हां केव्हांतरी ऐकवीन.

प्रसन्न मुद्रेनं राजलक्ष्मी म्हणाली, “ बरं तर. ज्या दिवशीं तुला गावंसं वाटेल त्या दिवशीं मला बोलावणं पाठीव, मी मुद्दाम येऊन तुझं गाणं ऐकून जाईन. ” ती मला उद्देशून म्हणाली, “ तुम्हांला वैष्णवाचं कीर्तन एवढं आवडतं हें यापूर्वी मला कुठं सांगितलं नाहींत कधीं ? ”

मी उत्तर दिलं, “ कशाला सांगूं तुला ? गंगामाटीला आजारी असतांना बिछान्यावर पडून होतों. त्या भकास माळाकडे बघत दुपारची वेळ घालवीत होतों. संध्याकाळीं घर खायला येई—एकटं बसवत नसे—”

चट्कन् माझ्या तोंडावर हात ठेवून राजलक्ष्मी म्हणाली, “ आतां आणखी बोलाल तर पायाजवळ डोकं आपटून प्राण देईन. ”

तिचं तिलाच चमत्कारिक वाटलं. तेव्हां हात काढून घेऊन ती म्हणाली, “ कमललताताई, तुमच्या नव्या गोसाव्यांना सांगा, कीं आज बुवाजींचं कीर्तन

झाल्यावर मी देवापुढं दोन पदं म्हणेन."

संदिग्धपणें कमललता म्हणाली, "पण हे बुवाजी मोठे विलक्षण असतात—"

राजलक्ष्मी म्हणाली, "असेनात का, देवाचं नांव घेतल्यासारखं तरी होईल." देवाच्या मूर्तीकडे हात दाखवून ती हंसून म्हणाली, "हे खूष होतील, त्या बुवाजींची मला एवढी फिकीर वाटत नाहीं, पण आमचे हे दुर्वास मुनि प्रसन्न झाले, कीं गंगेला घोडीं न्हालीं."

मी म्हटलं, "प्रसन्न झालों तर बक्षीस मिळेल."

राजलक्ष्मी घाबरून म्हणाली, "माफ करा गोसाई, सवासमक्ष बक्षिस द्यायला येऊं नका. तुम्हीं काय कराल याचा नेम नाहीं."

तें ऐकून साऱ्या वैष्णवी हंसूं लागल्या. पद्मा टाळी देऊन म्हणाली, "आ—म्हां—ला क—ळ—लं!"

तिच्याकडे पहात कमललता मोठ्या वात्सल्यानें हंसत म्हणाली, "चल दूर हो काळतोंडे, गप्प बैस." ती राजलक्ष्मीला म्हणाली, "हिला घेऊन जा पाहूं. भलतंच कांहीं तरी चट्‌कन् बोलून बसायची."

संध्याकाळीं देवाची आरती झाल्यावर कीर्तनाची बैठक बसली. जिकडे तिकडे दिवेच दिवे लावले होते. मुरारीपूरचा वैष्णवांचा आखाडा मोठा नांवाजलेला होता. कुठून ना कुठून तरी कीर्तनकार बैरागी आले म्हणजे असंच अवडंबर मांडलं जात असे.

मठांत सर्व प्रकारचीं वाद्ययंत्रें होतीं. सारीं वाद्यं आणून ठेवण्यांत आलीं होतीं. एका बाजूला आम्हांला परिचित असलेल्या साऱ्या वैष्णवी बसल्या होत्या. दुसऱ्या बाजूला अगदींच अपरिचित असलेले बरेच बैरागी बसले होते. त्यांतले कांहीं लहान, कांहीं मोठे, तसेच त्यांचे चेहरेही वेगवेगळ्या तऱ्हेचे होते. मध्यभागीं प्रख्यात कीर्तनकार मनोहरदास आणि त्याचा मृदंगवाला बसला होता. सध्यां माझी खोली बळकावून बसलेला एक छोकरा बुवाजी हार्मोनियम घेऊन बसला होता. कुणितरी एक घरंदाज बाई कलकत्त्याहून आली आहे आणि ती गाणार आहे असं सर्वांना कळवलं होतं. ती तरुण आहे, देखणी आहे, श्रीमंत आहे तिच्या बरोबर नोकरचाकर आहेत, तिनं येतांना बरोबर खूप मेवामिठाई आणली आहे—आणि तिच्याबरोबर कुणि 'नवा गोसाई' याच भागांतला तो एक भटक्या आहे, असं सर्वत्र बोललं जात होतं.

मनोहरदासाच्या कीर्तनाचा पूर्वरंग आणि नंतर होणारी गौरचंद्रिका यांच्या मध्यांत केव्हांतरी राजलक्ष्मी येऊन कमललतेजवळ बसली. एकाएकीं बुवाजींचा आवाज कापूं लागल्यासारखा वाटला आणि मृदंगाचे बोल लंगडे पडले. हा एक योगायोग म्हणायचा. मात्र द्वारकादास भिंतीला टेकून डोळे झांकून जसे बसले होते तसेच होते. कुणी आलं कीं नाहीं याची त्यांना खबर होती कीं नाहीं कोण जाणे !

राजलक्ष्मी नीलांबरी साडी नेसून आली होती. तिच्या साडीच्या जरी किनारी-बरोबर अंगांतली निळी चोळी मिसळून गेली होती. बाकी सर्व रोजच्यासारखंच होतं. केवळ सकाळीं पांडे लोकांनीं दिलेले कपाळावरचे मुद्रांचे छाप आतां बरेच पुसले गेले होते—जे कांहीं शिल्लक होते ते आश्विनांतल्या फुटक्यातुटक्या मेघां-सारखे निळया आकाशांत कुठल्याकुठं मिसळून गेले होते.

मोठ्या शिष्टपणें आणि शांतपणें ती येऊन बसली. माझ्याकडे तिनं ढुंकूनही पाहिलं नाहीं—जशी कांहीं माझी ओळखच नाहीं—तरीही तिनं ओठांवरचं हसूं दाबलं असावंसं वाटलं. तें कां तें तिचं तिलाच माहित. कदाचित माझाच गैरसमज झाला असेल.

आज बुवाजींचं गाणं जमलं नाहीं. पण तो कांहीं त्यांचा दोष नव्हे. लोक अधीर झाले होते हिचं गाणं ऐकायला. नुसत्या नजरेनंच द्वारकादासांनीं राज-लक्ष्मीला बोलावलं आणि म्हटलं, " ताई, आतां देवापुढं तुमची हजिरी लागूं दे. अन् ऐकून आमचंही समाधान होऊं दे."

राजलक्ष्मी त्याच बाजूला तोंड करून फिरून बसली, मृदंगियाकडे बोट करून द्वारकादास म्हणाले, " हें चालेल ना तुम्हाला ? "

राजलक्ष्मी म्हणाली, " चालेल."

तें ऐकतांच, केवळ तेच नव्हे, तर मनोहरदाससुद्धां आश्चर्यचकित झाले. कारण साधारणपणें गाणाऱ्या बायका असल्या उस्तादाबरोबर गाऊं शकतील अशी त्यांची कल्पना नव्हती.

गाणं सुरूं झालं. संकोचाची अडचण नाहीं—अजाणपणाची द्विधा एवढीसुद्धां नाहीं—अगदीं सरळ सरळ निर्भयपणें पाण्याच्या झोताप्रमाणें गाण्याचा ओघ सुरू होता.

संगीत विद्येंत ती सिद्धहस्त होती हें मला माहित होतं—तोच तिचा उदर-निर्वाहाचा पेशा होता—पण बंगालचं हें अस्सल संगीत तिनं एवढं हस्तगत केलं

होतं याची मलासुद्धां कल्पना नव्हती. प्राचीन आणि आधुनिक वैष्णव कवींची इतकीं निरनिराळीं पदं तिनं केव्हां अवगत करून घेतलीं होतीं कोण जाणे. केवळ सूर, ताल आणि लय एवढ्याच बाबतींत नव्हे, तर वाक्याची विशुद्धता, उच्चारांची स्पष्टता आणि स्वरसौष्ठवाची मधुरता प्रदर्शित करून यावेळीं तिनें जें विस्मयपूर्ण वातावरण उत्पन्न केलं तें अगदीं अनपेक्षित होतं. दगडाचा देव तिच्या समोर होता—मागं दुर्वासमुनि बसले होते—त्यांतल्या कुणाला प्रसन्न करण्यासाठीं ती जीवाचा आटापीटा करीत होती कोण जाणे. गंगामाटीला असतांना केलेल्या अपराधाचं ती अशा प्रकारें का प्रायश्चित्त करीत होती? गात असतांना ती गोष्ट तिच्या मनांत होती कीं नाहीं कुणाला ठाऊक! ती गात होती:—

**तव पदपंकज-पंक-विभूषित कंटकिं जर्जर झालें।**
**आतुर दर्शनिं कांहिं न कळलें असुखहि निवटुनि गेलें॥**
**मधुर मुरलिरव श्रवणिं प्रविशतां सांडिलि गृहसुख आस।**
**पथिं पथिं पळतां कष्ट न अणुभरि वदला गोविंद दास॥**

बड्या गोसाईच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा वहात होत्या. आवेगाच्या भरांत आनंदाच्या प्रेरणेनें ते उठून उभे राहिले आणि मूर्तीच्या गळ्यांतील मल्लिकेची माळ काढून घेऊन त्यांनीं ती राजलक्ष्मीच्या गळ्यांत घातली. ते म्हणाले, "तुझं सारं अकल्याण देव दूर करो एवढीच माझी प्रार्थना!"

राजलक्ष्मीनं वांकून त्यांना नमस्कार केला. त्यानंतर ती उठून माझ्याकडे आली आणि सर्वांसमक्ष तिनं माझ्या पायावर डोकं ठेवलं. ती हळूच म्हणाली, "ही माळ सध्यां ठेवून देतें. बक्षिसाची भीति दाखवली नसतीत तर इथल्या-इथंच ही तुमच्या गळ्यांत घातली असती." असं म्हणून ती निघून गेली.

गाण्याची बैठक संपली. जीवनाचं सार्थक झालंसं वाटलं.

प्रसाद वाटण्याची गडबड सुरू झाली. तिला बाजूला आडोशाला बोलावून मी म्हटलं, "ही माळ अशीच ठेवून दे. घरीं गेलों, कीं तुझ्या हातून ही माझ्या गळ्यांत पडली पाहिजे."

राजलक्ष्मी म्हणाली, "अस्सं! इथं देवाच्या समोर माळ घातली तर ती काढून टाकतां यायची नाहीं अशी भीति वाटली वाटतं?"

"छे, छे, आतां भीतिबीति सारी नाहींशी झाली आहे. सारी पृथ्वी माझी असती तर आज तुला बक्षिस देऊन टाकली असती."

" हंः ! मोठे दातेच कीं नाहीं ? मला देऊन टाकली तरी तुमचीच व्हायची ना ? "

मी म्हटलं, " आज किती धन्यवाद देऊं तुला ? "

" पण कां ? "

मी म्हटलं, " आज असं वाटतं मला, कीं मी कांहीं तुला साजेसा नाहीं. रूपानं, गुणानं, रसिकतेनं, विद्येनं, बुद्धीनं, स्नेहानं आणि सौजन्यानं परीपूर्ण असं जें हें धन मला अयाचित मिळालं आहे त्याला या जगांत तोड नाहीं. स्वतःची अयोग्यता पाहून मला लाज वाटते लक्ष्मी. केवढे उपकार वाटताहेत तुझे मला ! "

राजलक्ष्मी म्हणाली, " आतां मात्र खरोखरच रागावेन अं. "

" होऊन जाऊं दे. हें ऐश्वर्य ठेवूं कुठं याचाच विचार मी करतों आहें. "

" कां ? चोरीला जाईल म्हणून भीति वाटली ? "

" मुळींच नाहीं. एवढा धीराचा माणूस कुणी दिसत नाहीं मला. चोरी करून तुला पकडून ठेवायला साजेशी जागा त्या बिचाऱ्याला मिळेल कुठं ? "

राजलक्ष्मीनं उत्तर दिलं नाहीं. माझा हात धरून ओढून क्षणभर आपल्या हृदयाजवळ नेत ती म्हणाली, " अशी आपण समोरासमोर काळोखांत उभीं राहिलों अन् कुणी पाहिलं तर तीं हंसतील ना ? तें खरं—पण आज तुमचा बिछाना कुठं घालायचा त्याचाच विचार करतेंय. जागा तर कुठंच ठीक नाहीं. "

" नसेना का, इथंच कुठं तरी पडून रात्र काढीन. "

" तें खरं आहे. पण प्रकृति ठीक नाहीं. उद्यां आजारी पडलांत तर ? "

" त्याची काळजी नको तुला, हे लोक कांहीं तरी व्यवस्था करतील माझी."

तरी तिला काळजी वाटतच होती. ती म्हणाली, " सारं कांहीं मी पहातें आहें. काय व्यवस्था करणार आहेत कोण जाणे. बाकीच्यांची कांहीं काळजी वाटत नाहीं मला. चला या, दोन घास खाऊन एकदां विश्रांति घ्या."

खरं पाहिलं तर पाहुण्यांची गर्दी इतकी झाली होती, कीं झोंपायला कुठं जागाच नव्हती. त्या रात्रीं एका उघड्या व्हरंडयावर मच्छरदाणी लावून कशीबशी माझ्या झोंपण्याची व्यवस्था झाली. राजलक्ष्मीचा जीव वरखालीं होत होता. कदाचित् रात्रीं मधून मधून येऊन ती पाहून गेली असेल देखिल !—पण माझी झोंपमोड कांहीं झाली नाहीं.

दुसरे दिवशीं सकाळीं बिछान्यावरून उठलों आणि पाहिलं तो हे एवढे हारे

भरून फुलं घेऊन दोघीही आल्या. आज माझ्याऐवजीं कमललतेनं राजलक्ष्मीला बरोबर नेलं होतं. तिथं एकांतांत त्यांचं काय भाषण झालं कोण जाणे, पण आज त्या दोघींची मुद्रा पाहून मला मोठं समाधान वांटलं. जशा कांहीं किती दिवसांच्या दोघी मैत्रिणी—किती जुन्या काळचा लागाबांधा !

काल दोघीही एकत्र एका बिछान्यांत झोंपल्या होत्या. तिथं मात्र जातीचा अडथळा आला नाहीं. एक दुसरीच्या हातचं खात नाहीं या बाबतींत कमललता मला उद्देशून हंसून म्हणाली, "ती काळजी नको तुम्हांला. ती सारी व्यवस्था होऊन गेली आहे. आतां पुढल्या जन्मीं मी मोठी बहीण होऊन येणार आहें अन् हिचे दोन्ही कान चांगले पिरगळणार आहें.

राजलक्ष्मी म्हणाली, "अन् त्याच्या बदल्यांत मी सुद्धां एक ठरवून घेतलंय गोसाई. मी जर मेलें तर हिला या वैष्णवगिरीपासून सोडवून तुमच्या सेवेला रुजू करीन. तुमच्या वांचून मला मुक्ति नाहीं हें मी चांगलं जाणतें. म्हणून भूत होऊन या अक्काच्या मानगूटीला बसेन—सिंदबादच्या मानेवर तो राक्षस बसला होता ना,—तशी हिच्या मानेवर बसून सारीं कामं हिच्याकडून करून घेईन तेव्हां सोडीन."

कमललता हंसत म्हणाली, "तेवढ्यासाठीं कांहीं मरायला नको. तुला खांद्यावर घेऊन हिंडायची ताकद कांहीं माझ्यांत नाहीं."

चहा घेऊन सकाळींच गोहरच्या तपासासाठीं बाहेर पडलों. कमललता येऊन म्हणाली, "फार उशीर करूं नका गोसाई—अन् येतांना त्यांनाही आणा. आज एकजण भटजी पकडून आणलाय देवाचा नैवेद्य रांधायला. जसा ओंगळ तसाच घामट आहे. राजलक्ष्मी गेली आहे त्याला मदत करायला."

मी म्हटलं, "हें बरं केलं नाहींस. आज राजलक्ष्मीला अन्न जाईल खरं पण तुझा देव उपाशी पडेल."

कमललता घाबरून जीभ चावीत म्हणाली, "असलं कांहीं बोलूं नका. तिच्या कानीं गेलं तर ती तोंडांत पाणीसुद्धां घेणार नाहीं."

मी हंसून म्हणालों, "पुरते चोवीस घंटे गेले नाहींत तोंच तिला अचुक ओळखलंस ?"

तीही हंसून म्हणाली, "होय तर, ओळखलंच मुळीं. शंभर लाखांत अशी कुणी शोधून सांपडायची नाहीं. तुम्हीं मोठे भाग्यवान !"

गोहरची भेट झाली नाहीं. तो घरीं नव्हता. त्याची एक विधवा मामेबहिण सुनामगांवीं रहात होती. तिथं कसलीतरी सांथ आली होती. खूप माणसं मरत होतीं असं नवीननं सांगितलं. दरिद्री बहिण, पोराबाळांसह संकटांत पडलेली म्हणून हा गृहस्थ तिच्या खबरीसाठीं गेला होता. दहाबारा दिवस झाले पण त्याची कांहींच खबर न कळल्यामुळं बिचारा नवीन अर्धमेला झाला होता. त्याचा पत्ता कसा लावायचा हेंच त्याला कळत नव्हतं. एकदम भडभडून येऊन रडत तो म्हणाला, "माझे बाबू जिवंत नाहींत खास. खुळा भोळा कुणबी मी, कधीं गांवाच्या सीमेबाहेर गेलों नाहीं; तें गांव कुठं आहे, तिथं जायचं कसं, कांहीं-सुद्धां माहित नाहीं. मरेना कां हा घर संसार. माहित असतं तर अजून राहिलों असतों का इथं ? रोज त्या चक्रवर्तीकडे जाऊन विनवीत असतों, 'भटजी दया करा. जमीन विकून तुम्हांला मी स्वतः शंभर रुपये देतों पण मला तिथवर घेऊन चला.' पण हराम तो ब्राह्मण ऐकेल तर. पण हें तुम्हांला सांगून ठेवतों बाबूजी, माझ्या धन्याचं तिथं जर कांहीं बरं वाईट झालं तर या चक्रवर्तीच्या घराला मी माझ्या हातानं आग घालीन अन् शेवटीं त्याच आगींत आत्महत्या करीन–पण असल्या या निमकहरामाला जिवंत राहूं देणार नाहीं."

कसंबसं त्याचं समाधान करण्यासाठीं मी विचारलं, "कोणत्या जिल्ह्यांत तें गांव आहे तें माहित आहे का तुला नवीन ?"

नवीन म्हणाला, "नदिया जिल्ह्यांत कुठं तरी तें गांव आहे म्हणून मी ऐकलंय. स्टेशनपासून फार लांब आहे. बैलगाडींतून जावं लागतं. त्या चक्रवर्तीला माहित आहे. पण तो बामण तें कांहीं सांगत नाहीं."

जुनेपुराणे कागदपत्र गोळा करून आणले पण त्यांतून कांहींच मागमूस लागला नाहीं. नुसती एवढीच बातमी मिळाली, कीं दोन महिन्यांपूर्वी विधवा मुलीच्या लग्नासाठीं चक्रवर्तीनं दोनशें रुपये गोहरकडून नेले.

भोळ्या गोहरकडे पैसा होता. अर्थांत गरीबगुरीब त्याला फसवून पैसे काढीत—या बाबतींत चीड येणं फुकट होतं—पण चक्रवर्तीनं केलेल्या सैतानगिरीला तोड नव्हती यांत शंकाच नाहीं.

नवीन म्हणाला, "बाबू मरायचीच तो वाट पहातोय. तसं झालं, कीं तो हातोहात मोकळा होईल. कर्जाऊ घेतलेल्या पैशाची मग फेड करायला नको."

असं असणं अशक्य नव्हतं.

गेलों चक्रवर्तीच्या घरीं. एवढा विनयी, मधुभाषणी, परदुःख-कातर सद्-गृहस्थ जगांत मिळणं दुर्लभ. पण म्हातारपणामुळं त्याची स्मरणशक्ति एवढी क्षीण झाली होती, कीं त्याला कांहींच आठवत नव्हतं—जिल्ह्याचं सुद्धां नांव आठवेना.

मोठ्या प्रयासानं एक रेल्वेचं टाईमटेबल मिळवलं आणि त्यांतल्या उत्तर आणि पूर्व बंगाल मधल्या सगळ्या रेल्वे स्टेशनांची नांवं एकामागून एक वाचीत गेलों पण स्टेशनाच्या आद्याक्षरापर्यंत देखील त्याला आठवेना. काकुळतीला येऊन तो म्हणाला, “ लोक किती जिन्नसपान्नस, पैसारुका उसना घेऊन जातात माझ्याकडून, पण काय सांगूं बाबा, ध्यानांत रहात नाहीं त्यामुळं वसुली होत नाहीं. मी आपल्याशींच म्हणतों, देव आहे, धर्म आहे, तो काय तो पाहून घेईल. ”

नवीनला आतां असह्य झालं. तो एकदम ओरडून म्हणाला, “ हो, हो, तोच तुला पाहून घेईल. नाहींतर मी आहेंच ! ”

अगदीं प्रेमळपणें गोडगोड शब्दांत चक्रवर्ती म्हणाला, “ नवीन, उगीच कशाला रागवतोस दादा ? दस गेले पांच उरले, आठवलं असतं तर नसतं कां सांगितलं ? गोहर मला परका का आहे ? माझ्या पोटच्या पोरासारखा रे तो !”

नवीन म्हणाला, “ तें कांहीं सांगूं नका मला. तुम्हांला शेवटचं सांगतों, बाबूकडे आम्हांला घेऊन जायचं असलं तर चला–नाहींतर ज्या दिवशीं त्यांची बरीवाईट खबर येईल त्यादिवशीं तुम्हीं अहांत अन् मी आहें ! ”

उत्तरादाखल कपाळावर हात मारून चक्रवर्ती नुसतं म्हणाला, “ नशीब, नवीन नशीब ! नाहींतर कां असं बोलला असतास मला ! ”

शेवटीं दोघेही निघून बाहेर आलों. घराबाहेर आल्यावर क्षणभर थांबून वाट पाहिली—म्हटलं, चक्रवर्तीला पश्चात्ताप होऊन जर त्यानं पुन्हां हांक मारली तर ? पण त्यानं हुं कीं चूं केलं नाहीं. दरवाजाच्या फटींतून पाहिलं तों चक्रवर्ती चिलीम उपडी करून टाकून शांतपणें पुन्हां चिलमींत तंबाखू भरीत होता.

गोहरचा पत्ता कसा लावावा याचा विचार करीत जेव्हां आखाड्यांत परत आलो तेव्हां तीन वाजले होते. देवघराच्या व्हरांड्यावर बायकांची गर्दी जमली होती. बुवाजी कुणीच नव्हते. बहुधा प्रसादावर भरपूर हात मारल्यामुळं थकून कुठंतरी आराम करीत असावेत. रात्रीं पुन्हां हातातोंडाची लढाई करायला ताकद वाढली पाहिजे होती ना !

डोकावून पाहिलं, तों त्या गर्दींत एक जोशी पंचांग, पोथी, पाटी पेन्सिल वगैरे

ज्योतिषाचीं उपकरणीं घेऊन बसला असल्याचं दिसून आलं. सर्वांच्या पूर्वी पद्मेची नजर माझ्याकडे गेली. ती एकदम ओरडत उठली, " नवे गोसाई आले. "

कमललता म्हणाली, " तेव्हांच मला वाटलं होतं, कीं गोहर गोसाई तुम्हांला असे सोडायचे नाहींत. काय बेत होता तिथं ?—"

राजलक्ष्मी तिचं तोंड दाबून म्हणाली, " तें राहूं दे. तसलं कांहीं विचारूं नको. "

तिचा हात लोटून कमललता म्हणाली, " उन्हानं तोंड वाळून गेलंय. पायींची धूळ माथ्यावर चढली आहे. स्नानबिन तरी झालं आहे का ? "

राजलक्ष्मी म्हणाली, " तेलाला शिवतसुद्धां नाहींत. नाहींतर नसता का हा माथ्यावरचा बोजा गेला ? "

" नवीननं सारी कांहीं व्यवस्था केली होती. पण मीच नाकबूल केलं. स्नान केल्याशिवाय, जेवल्याशिवाय निघून आलों. "

राजलक्ष्मी मोठ्या आनंदानं म्हणाली, " ज्योतिषीबुवांनीं माझा हात पाहून सांगितलं, कीं मी राजराणी होणार. ".

" काय दिलंस त्याला ? "

पद्मेनं सांगून टाकलं, " पांच रुपये. राजलक्ष्मीआक्काच्या पदराला बांधलेले होते. "

मी हंसून म्हणालों, " तेवढे मला दिले असतेस तर मी यापेक्षांही चांगलं भविष्य सांगितलं असतं. "

ज्योतिषी उढीया ब्राह्मण—चांगली बंगाली भाषा येत होती त्याला—बंगालीच म्हटला तरी चालेल—तोही हंसून म्हणाला, " नाहीं महाराज. पैशासाठीं नाहीं सांगितलं. पैसा खूप मिळतो आहे मला. खरोखरच इतका सुंदर हात मी कधीं पाहिला नव्हता. माझं भविष्य कधीं खोटं होणार नाहीं, तुम्ही पहालच. "

मी म्हटलं, " जोशीबुवा, हात पाहिल्याशिवाय कांहीं सांगाल का ? "

तो म्हणाला, " सांगेन. एका फुलाचं नांव घ्या. "

मी म्हटलं, " शिमुल फुल. "

जोशीबुवा हंसून म्हणाला, " शिमुल फुल का ? ठीक ! पहा आतां एवढ्या वरूनच सांगतों तुमच्या मनांतली गोष्ट. " असं म्हणून त्यानं खडू घेऊन एक-दोन मिनिटं पर्यंत आंकडे मांडून पाहिलं. तो म्हणाला, " कसली तरी खबर पाहिजे आहे आपल्याला. "

" कसली खबर ? "

तो माझ्याकडे पहात पहात बोलूं लागला, " नाहीं—कोर्टाखटल्याची नव्हे, आपल्याला कुणातरी माणसाचा पत्ता हवा आहे. "

" पत्ता सांगाल का जोशीबुवा ? "

" सांगेन. खबर चांगली आहे—एकदोन दिवसांत तुमच्या कानीं येईल. "

त्याचं उत्तर ऐकून माझं मलाच आश्चर्य वाटलं. माझी मुद्रा पाहून इतरांनींही तसेच अनुमान बांधलं.

राजलक्ष्मी खूष होऊन म्हणाली, " पाहिलंत ? मी नव्हतं सांगितलं ? किती छान आहेत आमचे जोशीबुवा ? पण तुमचा विश्वासच नाहीं कुणावर ? नुसते हंसून उडवून देतां. "

कमललता म्हणाली, " त्यांत कसला अविश्वास ? नवे गोसाई, तुमचा हात दाखवा पाहूं जोशीबुवांना. "

मी माझा हात पसरला, तेव्हां तो आपल्या हातीं धरून एक दोन मिनिटं-पर्यंत बारकाईनं आंखून मापून पाहून, जोशीबुवा म्हणाला, " महाराज, असं दिसतंय मला, कीं आपल्यावर मोठं संकट येणार आहे. "

" संकट ? केव्हां ? "

" अगदीं लवकर. जगण्यामरण्याची बाब आहे. "

राजलक्ष्मीची मुद्रा बदलली होती. भीतीनं ती पांढरी फटक पडली होती.

माझा हात सोडून तो राजलक्ष्मीला म्हणाला, " जरा तुमचा हात पुन्हां दाखवा पाहूं बाईसाहेब. "

" आतां नाहीं. आतां पुन्हां नाहीं पाह्यचा माझा हात बस्स झालं. "

तिच्या मनावर झालेला परिणाम स्पष्ट दिसत होता. आपण केलेला अंदाज चुकला नाहीं हें त्या धूर्त जोशाच्या ध्यानीं आलं. तो म्हणाला, " मी नुसता दर्पण आहें बाईसाहेब. जी छाया पडेल, ती माझ्या तोंडून बाहेर येते. त्याची एक क्रिया आहे—साधारण दहावीस रुपये खर्चाची बाब आहे—"

" आमच्या कलकत्त्याच्या घरीं याल का तुम्हीं ? "

" कां नाहीं येणार बाईसाहेब ? नेलांत तर येईन. "

ग्रहांच्या कोपांवर पुरा विश्वास असला तरी त्यांना प्रसन्न करायच्या बाबतींत मात्र त्याची खात्री नव्हती असं मला दिसून आलं.

कमललता म्हणाली, " चला गोसाई, चहा करून देतें तुम्हांला—वेळ

झाली चहाची. ”

राजलक्ष्मी म्हणाली, “ मी करतें सारी तयारी. तूं यांच्या बसायच्या जागेची कांहीं तरी व्यवस्था कर. रतनला म्हणावं, गुडगुडी भरून दे. कालपासून त्याची सांवलीसुद्धां नाहीं दिसली कुठं. ”

दक्षिणेकडच्या उजव्या व्हरांड्यावर असलेली माझी दोरीची खाट रतननं झाडूनपुसून साफ केली, मला तंबाखू भरून दिला, हात पाय धुवायला पाणी आणून दिलं,—काल सकाळपासून बिचारा अविश्रांत खपत होता पण मालकीण म्हणत होती, कीं त्याची सांवलीसुद्धां दृष्टीस पडत नाहीं म्हणून. माझ्यावर लवकरच संकट येणार होतं—पण रतनला विचारलं असतं तर तो म्हणाला असता, “ जी नाहीं. संकट आपल्यावर नव्हे, माझ्यावर आहे तें ! ”

व्हरांड्याच्या खालीं बसून कमललता गोहरची खबर विचारीत होती तोंच राजलक्ष्मी चहा घेऊन आली. तिचा चेहरा पडला होता. समोरच्या स्टूलावर चहाचा पेला ठेवून ती म्हणाली, “ हें पहा, शंभर वेळ तुम्हांला सांगतें कीं रानावनांतून फिरूं नका म्हणून—केव्हां काय होईल सांगतां का येतं ? हात जोडून पदर पसरून पुन्हां सांगतें, कीं आतां तरी माझं सांगणं ऐका. ”

चहा तयार करीत असतांना राजलक्ष्मी याच विषयाचा विचार करीत असावी ‘ अगदीं लवकर ’ याचा अर्थ दुसरा काय करायचा ?

आश्चर्यचकित होऊन कमललता म्हणाली, “ रानावनांत भटकायला गोसाईं गेले होते केव्हां ? ”

राजलक्ष्मी म्हणाली, “ केव्हां गेले ते पहायला कांहीं मी पहारा ठेवलाय त्यांच्यावर ? दुसरं कांहीं कामच नाहीं वाटतं मला ? ”

मी म्हटलं, “ तिनं पाहिलं नाहीं. तो अंदाज आहे तिचा. त्या बेट्या ज्योतिषानं चांगली ठिणगी शिलगावून दिलीय ! ”

तें ऐकून रतन तोंड फिरवून एकदम निघून गेला.

राजलक्ष्मी म्हणाली, “ बिचाऱ्या ज्योतिषाचा काय दोष ? जें त्याला दिसलं तें त्यानं सांगितलं. जगांत संकट म्हणून कांहीं नाहींच वाटतं ? कधीं कुणावर संकट येतच नाहीं का ? ”

या साऱ्या प्रश्नांचीं उत्तरं देण्यांत हांशिल नव्हतं. कमललतेलाही आतां राजलक्ष्मीची ओळख पटली होती म्हणून तीही उगीच राहिली.

चहाचा पेला मी हातीं घेतांच राजलक्ष्मी म्हणाली, " चार दोन फळं अन् मिठाई आणूं का ? "

मी म्हटलं, " नको. "

" नको कां ? केव्हां झालं तरी 'नाहीं' म्हणतां 'होय' म्हणायची बुद्धि देव देतच नाहीं तुम्हांला ? " तितक्यांत माझ्या चेहऱ्याकडे तिची नजर गेली आणि निरखून पाहून अधिकच उद्विग्नपणें तिनं विचारलं, "तुमचे डोळे एवढे तांबडे कां झालेले दिसतायत ? नदींतल्या सडक्या पाण्यानं तर आंघोळ केली नाहीं ?"

" नाहीं, मुळीं आंघोळच केली नाहीं मी. "

" काय खाल्लंत तिथं ? "

" कांहींच खाल्लं नाहीं, खावंसं वाटलंच नाहीं. "

तिला काय वाटलं कोण जाणे, जवळ येऊन तिनं माझ्या कपाळाला हात लावून पाहिलं—सदऱ्यांतून हात घालून माझ्या छातीला हात लावून पाहत ती म्हणाली, " मला वाटलंच तें. कमललताताई, जरा यांच्या अंगाला हात लावून पहा—अंग गरम वाटतंय का ? "

उगीच उतावीळपणा करून कमललता कांहीं उठून आली नाहीं. ती म्हणाली, " होईना का अंग गरम. त्याला कशाला भ्यायला हवं राजू ? "

नांवं देण्यांत ती मोठी वाकबगार होती. हें नवं नांव आतां माझ्याही कानीं आलं.

राजलक्ष्मी म्हणाली, " अग, अंग गरम म्हणजे ताप येणं."

कमललता म्हणाली, " बरं, आला ताप तर काय झालं ? इथं कांहीं समुद्रांत येऊन पडलां नाहीं ! आमच्या घरीं आलां आहांत—सारी व्यवस्था करूं आम्ही एवढी काळजी करायला नको तुला ! "

आपण एवढा अवास्तव अस्वस्थपणा दाखवला पण दुसऱ्यावर त्याचा परिणाम झाला नाहीं हें दिसल्यामुळं राजलक्ष्मी भानावर आली आणि म्हणाली," तें खरं आहे ताई, तरी पण इथं कुणी डॉक्टरवैद्य नाहीं म्हणून वाटलं—अन् यांचं असं आहे, आजार आला कीं लवकर बरा होत नाहीं—फार भोगावं लागतं—अन् कुठून मेला हा ज्योतिषी आला अन् मेल्या भद्रकपाळ्यानं मला घाबरवून सोडलं. "

" अन् घाबरवलं म्हणून काय झालं ? "

" नाहीं बरं ताई; मी पाहिलं आहे, चांगलीं भविष्यं फळाला येत नाहींत पण

वाईट तेवढं इटकून खरं होतं."

कमललता हळूच हंसून म्हणाली, "भ्यायचं कांहीं कारण नाहीं राजू. आजचं कांहीं व्हांयचं नाहीं. सकाळपासून उन्हांतान्हांतून गोसाई सारखे फिरताहेत, वेळीं स्नान भोजन झालं नाहीं, तेव्हां अंग गरम झाल्यासारखं वाटत असेल. उद्यां सारं ठिकठाक होऊन जाईल."

लालूची आई येऊन म्हणाली, "बाईसाहेब, सैंपाकघरांत भटजी बोलावताहेत तुम्हांला."

"आलें हं!" असं म्हणून कमललतेकडे कृतज्ञ दृष्टीनं पाहून ती निघून गेली.

कमललतेनं केलेलं माझ्या रोगाचं निदान खरं ठरलं.

दुसऱ्याच दिवशीं ताप गेला नाहीं खरा पण एक दोन दिवसांत प्रकृतीला आराम वाटला. पण या एकंदर प्रकारामुळं आम्हां दोघांबद्दलचा अंदाज कमललतेला आला—आणखीही एका माणसाला, मला वाटतं, हा अंदाज आला—अन् ते स्वतः बडे गोसाई—

जायच्या दिवशीं कमललतेनं आम्हांला बाजूला बोलावलं आणि विचारलं, "तुमच्या लग्नाचं वर्ष आहे का तुमच्या ध्यानांत?"

जवळच पाहिलं तों एका थाळींत देवाचं प्रसादी चंदन आणि फुलांची माळ होती. प्रश्नाचं उत्तर दिलं राजलक्ष्मीनं. ती म्हणाली, "त्यांना काय कपाळ माहीत आहे? माहीत आहे मला."

हंसतमुखानं कमललता म्हणाली, "ही काय गंमत? एकाच्या ध्यानांत रहातं अन् दुसऱ्याच्या रहात नाहीं?"

राजलक्ष्मी म्हणाली, "तेव्हां हे फार लहान होते कीं नाहीं—म्हणून. तेव्हां चांगलं कळत नव्हतं यांना."

"पण हे तुझ्यापेक्षां वयानं मोठे आहेत राजू!"

"अंः! म्हणे मोठे! असतील फार तर पांच सहा वर्षांनीं मोठे. माझं वय तेव्हां आठ नऊ वर्षांचं. एक दिवशीं गळयांत माळ घातली आणि मनांतल्या मनांत म्हटलं, 'आजपासून तुम्ही झालांत माझे पति!, पति! पति!'" असं म्हणून ती माझ्याकडे इंगित करून म्हणाली, "पण या राक्षसानं त्याचवेळीं माझी माळ तिथंच उभ्याउभ्यानं खाऊन टाकली."

कमललता आश्चर्यानं म्हणाली, "फुलांची माळ खाल्ली? कशी?"

मी म्हटलं, " फुलांची माळ नव्हे—पिकल्या करवंदांची माळ ! मग कोण कशी खाणार नाहीं सांगा पाहूं ! "

कमललता हंसू लागली. राजलक्ष्मी म्हणाली, " अन् तेव्हांपासून माझ्या छळाला सुरवात झाली. यांना हरवून बसलें. त्या पुढली हकिगत सांगायलाच नको ताई,—पण लोकांना वाटते तशी ती नव्हे हो—लोकं वाटेल ते कुतर्क करतात !—त्यानंतर कित्येक दिवस रडूनकढून काढले. शोधतां शोधतां मेटा-कुटीला आलें. तेव्हां कुठं देवाला दया आली. जसं त्यानं एकदम यांना माझ्या दृष्टिआड केलं होतं, तसंच अकस्मात एक दिवस हातोहात माझ्या हवाली केलं. " असं म्हणून तिनं देवाला उद्देशून प्रणाम केला.

कमललता म्हणाली, " बड्या गोसाव्यांनीं देवाची माळ आणि चंदन पाठवून दिलंय. आज परत जायच्या वेळीं उभयतां एकमेकांना माळ घालून टिळा लावा. "

राजलक्ष्मी हात जोडून म्हणाली, " त्यांची इच्छा त्यांना माहित. पण मला मात्र असलं कांहीं सांगूं नका. बालपणाची ती रंगीत माळ, आज डोळे झांकून पाहिलं तरी, यांच्या बाळगळ्यांत रुळत असलेली दिसते मला. देवदयेनं लाभलेली ती माळ तशीच चिरकाल राहूं दे ताई. "

मी म्हटलं, " पण ती माळ तर मी खाऊन टाकली होती ! "

राजलक्ष्मी म्हणाळी, " होय हो राक्षसराज, आतां एकदां मलासुद्धां खाऊन टाका ! " असं म्हणून तिनं हंसत हंसत चंदनाच्या वाटींत सारीं बोटं बुडवून माझ्या कपाळावर छाप मारले.

द्वारकादासजींचा निरोप घेण्यासाठीं त्यांच्या खोलींत गेलों. ते कसलासा ग्रंथ घेऊन वाचीत होते. त्यांनीं मोठ्या आदरपूर्वक म्हटलं, " या बाब्रांनो, बसा. "

राजलक्ष्मी जमिनीवरच बसली आणि म्हणाली, " आतां बसायला वेळ नाहीं गोसाई, फार त्रास दिला तुम्हांला. जायच्या पूर्वीं नमस्कार करून तुमच्या क्षमेची भिक्षा मागायला आलों आहोंत. "

गोसाई म्हणाले, " आम्हीं बैरागी माणूस. आम्हीं भिक्षा घेत असतों–देत नसतों बाई. पण पुन्हां त्रास द्यायला केव्हां येणार तें सांगा ना ताई ! आज या मठांत अंधार पसरेल आतां. "

कमललता म्हणाली, " खरोखरच गोसाई, खरोखरच असं वाटलं म्हणून आज कुठं दिवा लावला नाहीं. सारा अंधार पसरलाय. "

बडे गोसाई म्हणाले, "गाण्यांत आनंदात, हंसण्यांत, कौतुकांत जे कांहीं दिवस घालवले ते आठवले म्हणजे वाटतं, कीं चोहींकडे विजेची रोषणाई झाली होती!—कधींच झालं नव्हतं असं!" मला उद्देशून ते म्हणाले, "कमललतेनं तुम्हांला नांव दिलंय नवे गोसाई, अन् मी हिला आज नांव देतों आनंदमयी!—"

आतां मात्र त्याच्या या बोलण्याला अडथळा करणं मला भाग पडलं. मी म्हटलं, "बडे गोसाई, विजेची रोषणाई तुमच्या डोळयांना दिसली. पण अहोरात्र ज्यांच्या कानांत या विजेचा कडकडाट दणकत असतो त्यांना एकदां विचारा. या आनंदमयीच्या बाबतींत निदान रतनचं तरी मत घ्या—"

रतन मागंच उभा होता—तो पळून गेला.

राजलक्ष्मी म्हणाली, "यांचं बोलणं तुम्ही मनावर घेऊं नका गोसाई. माझ्या निंदेखेरीज यांना सारा दिवस दुसरं कांहीं सुचत नाहीं." माझ्याकडे पाहून ती म्हणाली, "आतां पुन्हां जेव्हां येईन तेव्हां या अरसिक, रोगट माणसाला घरीं कडीकुलपांत बंद करून ठेवून येईन! कुठं गेलं तरी यांच्या या ससेमिऱ्यामुळं मला कधीं सुख का लागत आहे?"

बडे गोसाई म्हणाले, "तें व्हायचं नाहीं, आनंदमयी, तें व्हायचं नाहीं! यांना सांडून तूं यायची नाहींस."

राजलक्ष्मी म्हणाली, "अगदीं नक्की येईन. केव्हां केव्हां मला असं वाटतं गोसाई, कीं एकदां मेलें म्हणजे सुटलें."

बडे गोसाई म्हणाले, "वृंदावनांत सुद्धां तिच्या तोंडून अशीच इच्छा एकदां प्रकट झाली होती. पण तिथंही तसं झालं नाहीं. काय आनंदमयी, तें पद आठवतं कीं नाहीं? 'सखी कुणा हातीं देऊं। कृष्णसेवा यथार्थ कोण करूं जाणे।'"

बोलतां बोलतां त्यांचं चित्त ठिकाणावरून उडाल्यासारखं वाटलं. ते म्हणाले "प्रेमाचं सत्य स्वरूप कितीसं कळतंय आम्हांला? केवळ आम्हीं स्वतःच स्वतःला फसवतों आहोंत! पण तें तुला कळलंय पोरी. म्हणून म्हणतों, कीं ज्या दिवशीं श्रीकृष्णाच्या ठायीं सर्वस्व अर्पण करशील आनंदमयी—"

राजलक्ष्मी एकदम शाहारून उठली आणि अस्वस्थ होऊन त्यांना मधेंच अडवून म्हणाली, "असला आशिर्वाद देऊं नका गोसाई. हें एवढं नको माझ्या नशिबीं. आशिर्वाद द्यायचा असला तर असा द्या कीं हंसत खेळत एक दिवशीं

यांना मागं ठेवून मरून जाईन."

सांवरून घेण्याच्या उद्देशानं कमललता म्हणाली, " बडे गोसाइ जें कांहीं बोलले, राजू, तें तुझ्या याच प्रेमाबद्दल. दुसरं कांहीं नव्हे."

एकच विषय सदोदित अनन्य भावनेनं पहाणारा द्वारकादास मी ओळखला होता. त्याच्या चिंतनाचा ओघ केव्हांही एकाच दिशेनं जात होता.

कोमेजलेल्या मुद्रेनं राजलक्ष्मी म्हणाली, " आधीं ही अशी प्रकृति—त्यांतून कांहीं ना कांहीं तरी दुखणं आहेच पाठीला लागलेलं—हाडकपाळी माणूस—कुणाचं कांहीं ऐकत नाहींत—कशी मी दिवस काढतें आहें—माझा जीव कसा सुकून जातो आहे तें कुणाला सांगू ताई ! "

आतां मात्र मी अगदीं उद्वीग्न झालों. अगदीं जायच्या वेळीं बोलण्यावरून बोलणं निघतां निघतां आडाचं पाणी वळचणीला जाऊं लागल होतं. हेळसांड करून मला काशी येथून निरोप दिला त्याचा राजलक्ष्मीच्या मनावर जो परिणाम झाला होता, तिला ज्या मर्मान्तिक वेदना होत होत्या, त्या झांकण्यासाठीं ती साऱ्या गोष्टी हंसण्यावारी नेत असे. पण त्या अपराधाची आपल्याला केव्हां तरी शिक्षा भोगावी लागेल ही त्या वृत्तीआड असणारी कल्पना तिच्या मनांतून सहसा दूर होत नसे. त्या कल्पनेवर आघात करून तिला शांत करण्याच्या उद्देशानं मी हंसून म्हणालों, " माझ्या या प्रकृतीबद्दल तूं लोकांकडे कितीही तक्रार केलीस लक्ष्मी, तरी मी तुला सांगतों, कीं हा देह असा नष्ट व्हायचा नाहीं. आधीं तूं मेल्याशिवाय मी मरत नाहीं खास—"

तिनं माझं भाषण पुरं होऊं दिलं नाहीं. एकदम सट्कन माझा हात धरून ती म्हणाली, " माझ्या गळ्याला हात लावून यांच्या समोर त्रिवार करा. आतां बोललांत तें खोटं व्हायचं नाहीं म्हणा ! " बोलतां बोलतां डंवरलेली आसवं तिच्या दोन्ही डोळ्यांतून सारखी सांडूं लागलीं.

सारींच थक्क होऊन गेलीं. राजलक्ष्मीही लाजली आणि माझा हात एकाएकीं सोडून देऊन बळेंच हंसून म्हणाली, " त्या भद्रकपाळ्या ज्योतिष्यानं उगीचच्या उगीच मला भीति घालून ठेवली आहे—"

तेंही वाक्य पुरं झालं नाहीं. हंसणं आणि लाजणं मुद्रेवर उघड उघड दिसत होतं तरीही डोळ्यांतलीं चार आसवं तिच्या गालावर ओघळून पडलींच.

पुन्हां एकदां सर्वांचा एकामागून एक निरोप घेतला बलरामपुराला आल्यावेळीं

आमच्या घरीं यायचं बड्या गोसाव्यांनीं अभिवचन दिलं. अन् त्याच वेळीं, पद्मेनं कधीं शहर पाहिलं नव्हतं, म्हणून तिलाही बरोबर आणायचं कबूल केलं.

स्टेशनवर येऊन पोंचतों, तों सर्वां आधीं नजरेला आला तो भद्रकपाळ्या ज्योतिषी. प्लॅटफॉर्मवर काबळं अंथरून त्यानं चांगला जम बसवला होता. आजु-बाजूला खूप लोक गोळा झाले होते.

मी विचारलं. " हा बरोबर येणार आहे का ? "

राजलक्ष्मी लाजून हंसली, पण मान फिरवून तिनं होकार दिला.

मी म्हटलं, " नाहीं. हा येतां कामा नये. "

" बरं होवो कीं न होवो, पण वाईट तर कांहीं होणार नाहीं ना ? येईना का बरोबर. "

मी म्हटलं, " नाहीं. बरं वाईट कांहीं असो—हा येतां कामा नये. त्याला काय द्यायचं असेल तें इथल्या इथं देऊन निरोप दे. ग्रहांची शांति करायची जर त्याची ताकद असेल जर तें जें कांहीं करायचं असेल तर तें तुझ्या दृष्टी-आड होऊं दे. "

" बरं तर तसंच करतें." असं म्हणून तिनं रतनला सांगून त्याला बोलावून घेतलं.

तिनं त्याला काय दिलं कोण जाणे, पण तो पुन्हां पुन्हां माना हालवून तिला सारखे आशिर्वाद देत हंसतमुखानं निरोप घेऊन निघून गेला.

तितक्यांत आगगाडी आली आणि आम्हीं कलकत्त्याला जाण्यासाठीं निघालों.

# १२

राजलक्ष्मीनं विचारलं तेव्हां, माझ्या द्रव्यसंचयाचा वृत्तांत तिला सांगावा लागला. आमच्या ब्रह्मदेशच्या आफिसांतल्या एका बड्या साहेबाला घोडदौडीचा नाद होता. होते नव्हते ते पैसे एकदां घालवल्यावेळीं त्यानं माझ्याकडून कांहीं रक्कम उसनवार घेतली होती.

नुसतं व्याजच नव्हे, तर बरकत आली तर नफ्यांतला अर्धा वाटा देण्याची अट त्यानं स्वतःच पत्करली होती. कलकत्त्याला आल्यावेळीं मी त्याला पैसे पाठवण्याविषयीं लिहिलं; त्यावेळीं त्यानं घेतल्या रकमेच्या चौपट पैसे पाठवून दिले होते. एवढंच काय तें माझं सर्वस्व.

" किती पाठवले ? "

" तुझ्या खिजगणतींत येतील इतके नसले, तरी माझ्या दृष्टीनं खूप ! "

" किती ते सांगा ना ? "

" सात आठ हजार. "

" ते मला देऊन टाका. "

मी घाबरून म्हणालों, " भलतंच काय बोलतेस ? लक्ष्मी दान करते—ती हात पसरून कधीं मागते का ? "

राजलक्ष्मी हंसून म्हणाली, " लक्ष्मीला अपव्यय पटत नाहीं. संन्यासीफकिरांवर तिचा विश्वास नाहीं. असल्या कामीं ते नालायक असतात. आणा पैसे ! "

" काय करणार त्यांचं ? "

" माझ्या अन्नवस्त्राची व्यवस्था करणार. यापुढं तेंच होईल माझ्या जीवनाचं मुद्दल. "

" पण एवढ्याशा मुद्दलावर चालणार कसं ? तुझ्या या नोकरचाकरांच्या पंधरा दिवसाच्या पगाराला सुद्धां ही रक्कम पुरायची नाहीं. त्याशिवाय गुरु आहेत, पुरोहित आहेत, कोटी देवदेवता आहेत, अनाथ विधवांचं भरणपोषण व्हायचं आहे,—त्यांचं कसं काय होणार ? "

" त्याची काळजी नको तुम्हांला, त्यांचं तोंड बंद व्हायचं नाहीं. मी माझ्या स्वतःच्या भरणपोषणाची गोष्ट बोलतेंय ! कळलं ? "

मी म्हटलं, " कळलं. कांहीं तरी ढोंग काढून स्वतःची फसवणूक करून घ्यायची आहे. होय ना ? "

राजलक्ष्मी म्हणाली, " छे, छे, तसं नव्हे. हें जें कांहीं आहे तें इतर कामाला लागेल. पण तुमच्याकडून हात पसरून जें कांहीं मी घेणार आहें. तीच माझी भविष्यकाळची पुंजी. तेवढी पुरली नाहीं तर उपास करीन. "

" तर मग तुझ्या कपाळीं तेंच दिसतंय. "

" काय दिसतंय ? उपास ? " असं म्हणून ती हंसली आणि म्हणाली, " तुम्हाला हें थोडं वाटतं—पण थोड्यांतलं थोडं घेऊन तें वाढवायचं कसं ही विद्या मला माहित आहे. माझ्याकडच्या दौलतीबद्दल तुमचा जो अंदाज आहे तो बरोबर नाहीं, हें कळून येईल तुम्हांला एक दिवशीं. "

" मग आजवर कां सांगितलं नाहींस तें ? "

" सांगितलं नाहीं, तुमचा विश्वास बसणार नाहीं म्हणून. माझ्या पैशाचा तुम्ही तिटकारा करतां, शिवतसुद्धां नाहीं, पण या तुमच्या हेटाळणीमुळं माझं काळीज फाटतंय."

ते उद्गार माझ्या मनाला लागले आणि मी म्हणालों, " एकदम याचवेळीं या गोष्टी कशाला काढल्यास लक्ष्मी ? "

क्षणभर माझ्या तोंडाकडे पहात राहून राजलक्ष्मी म्हणाली, " आज हें म्हणणं तुम्हांला आत्तांच मनाला लागलं. पण माझी रात्रंदिवसाची विवंचना होती ही ! अधर्मानं पैसे मिळवून मी देवदेवतांची सेवा करतें असं का तुम्हांला वाटतं ? तसा हा पैसा असता आणि त्यांतला कांहीं भाग मी तुमच्या शुश्रूषेसाठीं खर्च केला असता तर तुम्हांला जगवतां आलं असतं का मला ? देवानं माझ्याहातून केव्हांच तुम्हांला काढून नेलं असतं. मी सर्वस्वी तुमची आहें हें तरी अजून तुम्हांला कुठं पटतंय ? "

" पटतंय तर."

" नाहीं—मुळींच नाहीं."

तिला असं कां वाटावं हें मुला कळलं नाहीं.

ती बोलत होती, " कमललतेचा आणि तुमचा परिचय सारा दोन दिवसांचा, पण तिची हकिगत तुम्ही लक्षपूर्वक ऐकली. तुमच्यापरीनं तिचा सगळा दोष गेला. ती मुक्त होऊन गेली—पण तुम्हीं कधींच मला माझी हकिगत विचारली नाहीं ? कधींच असं म्हटलं नाहीं, कीं लक्ष्मी, तुझी काय हकिगत आहे ती मला उघड उघड सांग. कां विचारलं नाहीं ? भीति वाटली ? माझ्यावर विश्वास नाहीं तुमचा ? कीं स्वतःवर विश्वास नाहीं तुमचा ? "

मी म्हटलं, " तिला मी विचारलं नाहीं कीं तिची हकिगत कळायची माझी इच्छाही नव्हती ! तिनं होऊन मुद्दाम ऐकवली."

राजलक्ष्मी म्हणाली, " तरी पण ऐकवलीतच ? ती परकी—तेव्हां तिची हकिकत कशाला ऐकायची असं तुम्हांला वाटलं. मी देखील तशीच का ? "

" नाहीं. असं मी म्हणत नाहीं. पण तूं कमललतेची चेली का ? तिनं जें केलं तेंच तूं करायला हवं का ? "

" असं चकवूं नका मला. माझी सारी हकिगत ऐकली पाहिजे तुम्हांला."

" ही तर मोठी मुष्कील झाली. मला ऐकायची इच्छा नाहीं—तरीही मी

ऐकलीच पाहिजे ?"

"हो, ऐकलीच पाहिजे. ती ऐकल्यावर कदाचित् तुमचं माझ्याबद्दलचं मन बदलेल. तें प्रेम रहाणार नाहीं. कदाचित् मला दूर करावं असेंही वाटेल तुम्हांला—

"तुझ्यामतें तें इतकं का सोपं आहे ?"

राजलक्ष्मी एकदम हसूं लागली आणि म्हणाली, "तें कांहीं नाहीं. ऐकलंच पाहिजे. तुम्हीं पुरुषमाणूस. जर योग्य वाटलं तर मला दूर करावं ! इतकाही जोर नाहीं का तुमच्या मनामधें ?"

माझी अक्षमता स्पष्टपणें कबूल करून मी म्हणालों, "ज्या जोरदार पुरुषांचा उल्लेख करून तूं मला हिणवूं पहाते आहेस, ते सारे वीरपुरुष मला वंदनीय आहेत. त्यांच्या पायाच्या धुळीचीसुद्धां मला सर नाहीं, तुला दूर करून मला एक दिवस-सुद्धां जगतां यायचं नाहीं—असाच्याअसाच तुला परत आणण्यासाठीं धांवत सुटेन—अन् तूं नाहीं येत म्हटलंस तर माझ्या अधःपाताला एवढासुद्धां वेळ लागायचा नाहीं. असल्या या भयंकर गोष्टीची चर्चा आतां बंद कर."

राजलक्ष्मी म्हणाली, "लहाणपणीं माझ्या आईनं मला एका मैथिली राजपुत्राला विकलं होतं तें तुम्हांला माहित आहे ना ?"

"हो, आणखी दुसऱ्याच एका राजपुत्राच्या तोंडून मला तुझा पत्ता लागला तो त्यानंतर फारा दिवसांनीं."

राजलक्ष्मी म्हणाली, "होय तुमच्या मित्राचाच तो मित्र होता. एके दिवशीं चिडून मी आईला घालवून दिलं तेव्हां तिनं गांवीं जाऊन मी मेल्याची बातमी उठवली. हें तरी ऐकलं होतं ना तुम्हीं ?"

"हो, ऐकलं होतं."

"ऐकल्यावर काय वाटलं तुम्हांला ?"

"वाटलं, अरेरे ! विचारी लक्ष्मी उगीच मेली !"

"एवढंच ? आणखी नाहीं कांहीं ?"

"आणखीही वाटलं, काशीला मेली तेव्हां बिचारीला आतां स्वर्ग मिळेल ! अरेरे !"

राजलक्ष्मी चिडून म्हणाली, "चला—उगीच 'अरेरे अरेरे' करून कळवळून दाखवूं नका. नुसतं 'अरेरे' सुद्धां म्हटलं नसेल तुम्हीं ! अगदीं पक्की खात्री आहे माझी. सांगा पाहूं माझ्या गळ्याची शपथ घेऊन ?"

मी म्हटलं, " इतक्या वर्षांपूर्वीची हकिकत काय अचुक ध्यानीं राहते थोडीच ? असं कांहीं तरी म्हटलं असावं असं वाटतं खरं. "

राजलक्ष्मी म्हणाली, " राहूं दे. एवढ्या जुन्यापुराण्या गोष्टी बळेंच आठवायचा त्रास कशाला घेतां ? मला सारं कांहीं माहित आहे. " असं म्हणून ती क्षणभर थांबून नंतर म्हणाली, " आणि मी ? रडत ओरडत काशीविश्वेश्वराला रोज सांगत होतें, कीं देवा, काय हें माझ्या नशिबीं लिहून ठेवलं होतंस ? तुला साक्षी ठेवून ज्याच्या गळयांत माळ घातली, तो या जन्मीं आतां कधींच का दिसणार नाहीं ? चिरकाल मी अशीच का पापी रहाणार ? तेव्हांच्या गोष्टी आज आठवल्या तर आजसुद्धां आत्महत्या करून मरावंसं वाटतं मला !"

किती दिवस किती प्रकारें मनांतल्या मनांत या गोष्टी ती ताडून पहात होती. आपल्या अपराधामुळं भारावलेल्या मनांत उत्पन्न होणाऱ्या मर्मान्तिक यातना मुकाट्यानं सहन करीत होती. पण एक करतांना एक होईल, या भीतिनं ती कांहींच बोलत नव्हती. इतक्या दिवसांनंतर हें सामर्थ्य तिला मिळालं कमललते-कडून. आपलं प्रच्छन्न पाप उघडं करून वैष्णवीनं समाधान मिळवलं. भीति आणि खोट्या मर्यादेचं बंधन तोडून आज राजलक्ष्मी सुद्धां तिच्याप्रमाणें निर्मळ होऊं पहात होती. जें नशिबीं असेल तें होईल असं आतां तिला वाटत होतं.

ही विद्या तिला दिली कमललतेनं. आजपर्यंत एकाही माणसाकडे ज्या या अभिमानी स्त्रीनं मान वांकवली नाहीं, ती आज आपण होऊन आपल्या दुःखाची कहाणी उघडी करून मनाच्या समाधानाची याचना करायला तयार झाली आहे, हें पाहून माझ्या मनाला एक प्रकारचा अत्यानंद झाला.

कित्येक वेळपर्यंत आम्ही दोघंही एक शब्दसुद्धां न बोलतां उगीच बसलों होतों.

राजलक्ष्मी बोलूं लागली, " राजपुत्र एकाएकीं मृत्यु पावला. पुन्हां आईनं मला विक्रीला काढलं—"

" आतां कुणाकडे ? "

" दुसऱ्या एका राजपुत्राकडे. त्या तुमच्या मित्रशिरोमणीकडे—शिकारी-साठीं त्याच्याबरोबर आलां होतां ना तुम्हीं ? आठवत नाहीं का तें ? "

मी म्हटलं, " नाहीं आठवत. फार दिवसांची गोष्ट कीं नाहीं ! बरं मग पुढं ? "

राजलक्ष्मी म्हणाली, " तो तिचा डाव मी हुकवला. मी म्हटलं, ' आई, तूं

आतां घरीं जा.' आई म्हणाली, 'पण हजार रुपये घेतलेयत ना त्याच्याकडून ?' मी म्हटलं, 'घेतलेयत ते रुपये घेऊन तूं गांवीं जा. दलालीचे पैसे मी कांहींतरी करून फेडून टाकीन !' आणखी म्हटलं, 'आज रात्रीच्या गाडीनं जर तूं निघून गेली नाहींस आई, तर उद्यां सकाळीं मी स्वतःला विकून घेईन गंगेच्या डोहांत ! तूं चांगली ओळखतेस मला. मी उगीच भीति दाखवीत नाहीं.' आई निघून गेली. तिच्या तोंडूनच तुम्हांला मी मेल्याचं कळलं अन् तुमचे उद्गार निघाले, 'अरेरे, मेली बिचारी !'" असं म्हणून ती आपल्याशींच थोडीशी हंसली आणि म्हणाली, "एवढं 'अरेरे' म्हटलंत हें जरी खरं असतं, तरी मला तें पुष्कळ वाटलं असतं पण आतां यानंतर जेव्हां खरोखरच एक दिवस मी मरेन त्या दिवशीं डोळ्यांतून दोन टिपं गाळायला विसरूं नका. समजलं ? या जगांत कितीतरी वरवधूंनीं एकमेकांच्या गळ्यांत माळा घातल्या आहेत. त्यांच्या प्रेमानं जग पवित्र झालं आहे-परिपूर्ण झालं आहे. पण तुमच्या या कुलटा राजलक्ष्मीनं आपल्या नऊ वर्षांच्या छोट्या वरावर जें एकांतिक प्रेम केलं होतं, तसलं प्रेम या जगांत कधींच कुणी कुणावर केलं नसेल ! मी मरेन त्यावेळीं एवढी गोष्ट सांगाल ना माझ्या कानांत ? मेलें तरी ऐकायला येईल मला."

"हें काय ? तूं रडते आहेस ?"

पदरानं आपले डोळे पुसून ती म्हणाली, "निरुपाय पोरीवर तिच्या नातेवाईकांनीं जे अत्याचार केले ते अंतर्यामी ईश्वराला दिसलेच नाहींत असं वाटतं का तुम्हांला ? याचा विचार तो कांहींच का करायचा नाहीं ? डोळे झांकून उगीच का राहील ?"

मी म्हटलं, "त्यानं असं करणं योग्य नव्हे असं मला तरी वाटतं. पण देवाच्या बाबतींत तुम्हीच लोक काय तें सांगूं शकाल—माझ्यासारख्या पाखंडी माणसाचं मत तो केव्हांच घ्यायचा नाहीं."

राजलक्ष्मी उद्गारली, "थट्टा करतां आहांत होय ?" पण दुसऱ्याच क्षणाला ती गंभीर होऊन म्हणाली, "बरं—लोक म्हणतात, कीं स्त्री आणि पुरुष यांचा धर्म एकच नसला तर त्यांचं बनत नाहीं—पण धर्मकर्माच्या बाबतींत तुमचा अन् माझा अहिनकुलाचा संबंध. मग तुमचं आमचं हें जमायचं कसं ?"

"अहिनकुलासारखंच ! जीवें मारण्याची बंदी आहे ना, तेव्हां एकजण दुसऱ्याचा जीव घेत नाहीं. आपल्या धर्मसाधनेंत विघ्न येईल असं जेव्हां वाटतं

तेव्हां एकजण दुसऱ्याला निरोप देऊन घालवून देतं!”

“मग काय होतं?”

मी हंसून म्हणालों, “मग असं होतं, कीं तें एकजण स्वतःच रडत रडत येतं अन् नाकदुऱ्या काढून म्हणतं, ‘झाली एवढी शिक्षा पुरे झाली, या जन्मीं अशी चूक पुन्हां करणार नाहीं. झक मारतं माझं जपजाप्य—चुलींत गेले ते गुरुपुरोहित्—मला क्षमा करा!’ असं म्हणतं.”

राजलक्ष्मी हंसली! म्हणाली, “मग तिला क्षमा केली जाते कां?”

“होय तर. पण तुझी गोष्ट ती तेवढीच राहिली. पुढं काय झालं?”

राजलक्ष्मी म्हणाली, “सांगतें—”

क्षणभर डोळ्याचं पातंसुद्धां न हालवतां ती माझ्याकडे पहात बसली होती.

ती म्हणाली, “आई गांवीं निघून गेली. त्यावेळीं एक म्हतारा उस्ताद मला गाणं बजावणं शिकवीत होता. तो बंगाली होता. पूर्वी संन्यासी होता. पण संन्यास सोडून पुन्हां संसारी बनला होता. त्याची बायको होती मुसलमान. ती मला नाच शिकवीत असे. मी त्याला म्हणत असें दादामहाशय! माझ्यावर फार् लोभ होता त्याचा—मी रडत रडत म्हटलं, ‘दादामहाशय, यावेळीं तुम्हीं माझं रक्षण करा. हें असलं कांहीं माझ्यानं व्हायचं नाहीं.’ तो गरीब माणूस—एकदम त्याला धीर होईना. मी म्हटलं, ‘माझ्याकडे पैसा आहे. त्याच्यावर कित्येक दिवस निभावतील. मग पुढं काय नशिबीं असेल तें होईल. पण आज आपण इथून पाय काढूं या!’ त्यानंतर त्याच्या बरोबर कुठंकुठं भटकलें—अलाहाबाद, लखनौ, दिल्ली, आग्रा, जयपूर, मथुरा—शेवटीं येऊन मुक्काम ठोकला पाटण्याला. हातीं पुंजी होती त्यांतली अर्धी जमा दिली एका व्यापाऱ्याच्या पेढीवर आणि अर्धी खर्ची घालून एक स्टेशनरीचं आणि एक कापडाचं दुकान उघडलं. एक घर विकत घेतलं. बंकूचा पत्ता लावून त्याला आणला आणि शाळेंत घातला. उपजीविकेसाठीं काय करीत होतें तें तुम्हीं पाहिलंच आहे.”

तिचं भाषण ऐकून कांहीं वेळ मी स्तब्ध राहिलों आणि नंतर म्हणालों, “तूंच सांगते आहेस म्हणून पटतंय. दुसऱ्या कुणि सांगितलं असतं तर सारी गोष्ट बनावट वाटली असती.”

राजलक्ष्मी म्हणाली, “मला नाहीं का बनवून खोटं सांगायला यायचं?”

मी म्हटलं, “कदाचित् येईलही—पण आजवर माझ्याकडे तरी कधीं खोटं

बोलली नाहींस असा माझा समज आहे."

"कां असा समज झाला तुमचा?"

"कां? खोटं बोललं तर देवाचा कोप होईल—तो तुला शिक्षा लावील अन् शेवटीं सत्यानाश होईल अशी भीति वाटते तुला. होय ना?"

"माझ्या मनची गोष्ट कशी कळली तुम्हांला?"

"माझ्या मनांतल्या गोष्टी तुला कशा कळतात?"

"रात्रंदिवस तोच ध्यास असतो ना मला—म्हणून कळतात. पण तुमचं कांहीं तसं नाहीं."

"खूष होशील का तसं झालं तर?"

राजलक्ष्मी मान हालवून म्हणाली, "नाहीं, मी तुमची दासी—दासीपेक्षां मोठी मानूं नका मला एवढंच माझं मागणं."

मी उत्तर दिलं, "अगदींच जुन्या काळची दिसतेस! हजारों वर्षांपूर्वीचे जुनेपुराणे संस्कार आहेत हे."

राजलक्ष्मी म्हणाली, "तेवढंच पुरे आहे मला. मरेपर्यंत अशीच राहिलें कीं झालं!" असं म्हणून ती पुन्हां कितीतरी वेळ माझ्याकडे पहात राहिली आणि म्हणाली, "आतांच्या बायका मी पाहिल्या नाहींत असं का वाटतं तुम्हांला? कितीतरी पाहिल्या आहेत! कदाचित तुम्हींच पाहिल्या नसतील—किंवा पाहिल्या तर नुसतं त्यांचं बाहेरचं रूप दिसलं असेल तुम्हांला. त्या तसल्या कुणा बायकां-बरोबर माझी अदलाबदल करून बघा मग कळेल तुम्हांला. मी नाकदुऱ्या काढल्या म्हणून तुम्ही माझी थट्टा केलीत. पण तसल्या कुणाशीं गांठ पडली, कीं तुम्हांलाच दहा हात नाकदुऱ्या काढाव्या लागतील."

"पण असं कांहीं व्हायचा जिथं संभव नाहीं तिथं झगडा करण्यांत काय फायदा? मी एवढंच म्हणूं शकतों, कीं त्यांच्या बाबतींत तुझं मत अत्यंत चुकीचं झालंय."

राजलक्ष्मी म्हणाली, "चूक झाली असेल माझी—पण अत्यंत चूक झाली नाहीं एवढं मात्र खास. अहो गोसाईबुवा, मी देखील खूप हिंडलेंय, खूप पाहिलंय. जिथं तुम्हीं आंधळे झालां असाल तिथं मी दहा जोड्या डोळ्यांनीं पाहिलंय."

"पण तें सारं रंगीत चष्म्यांतून! म्हणून तें जें दिसलं तें सारंच चुकीचं. डोळ्याच्या दहाही जोड्या फुकट गेल्या."

हंसत हंसत राजलक्ष्मी म्हणाली, " काय बोलूं ? माझे हातपाय बांधले आहेत. नाहींतर तुमची अशी खबर घेतली असती, कीं जन्माची आठवण राहिली असती. जाऊं दे तें—मी आपली तुमची जुन्या काळांतील पायाची दासी होऊन राहीन. तुमची सेवा हेंच माझं आयुष्यांतलं मोठं काम. माझी काळजी करायचा एवढासुद्धां भार मी तुम्हांला घेऊं देणार नाहीं. या जगांत तुम्हांला पुष्कळ कामं करायचीं आहेत–इथून पुढं तीच सुरवात करा. या अभागिनीसाठीं तुमचा बराचसा काळ फुकट गेला आहे—बराचसा नाश झाला आहे—पण यापुढं मी तसं कांहीं होऊं द्यायची नाहीं. "

मी म्हटलं, " एवढ्यासाठींच तर मी म्हणतों आहें, कीं होईल तितक्या लवकर जाऊन एकदां नोकरीवर रुजू होतों. "

राजलक्ष्मी म्हणाली, " छे छे ! आतां तुम्हांला नोकरीच करूं द्यायची नाहीं मी. "

" पण स्टेशनरी दुकान चालवणं तर मला शक्य नाहीं. "

" कां शक्य नाहीं. "

" पहिलं कारण,—जिनसांच्या किंमती माझ्या ध्यानांत रहात नाहींत. दुसरं कारण–पैसे घेणं आणि चटकन् आंकडेमोडी करून बाकी परत करणं, तेंही मला व्हायचं नाहीं. दुकान तर उठणारच, पण गिऱ्हाईकाच्या बरोबर मारामारी झाली नाहीं कीं निभावलों. "

" तर मग कापड दुकान काढलं तर—? "

" त्यापेक्षां जित्या वाघसिंहांचं दुकान दे ना काढून ! तें चालवणं देखिल सोपं जाईल मला. "

राजलक्ष्मीला हंसू लोटलं. ती म्हणाली, " एवढी आराधना केली, शेवटीं देवानं जें माणूस गांठून दिलं तें हें असं निरुपयोगी—जगांत त्याचा काडीभर उपयोग नाहीं. "

मी म्हटलं, " आराधनेंतच चुकलं तुझं. अजून दुरुस्तीला अवधि आहे. अजून एकादा कामसू माणूस तुला मिळूं शकेल. चांगला धष्टपुष्ट निरोगी पेहलवान-जवान—ज्याला कुणी फसवणार नाहीं, दबवणार नाहीं, ज्याच्यावर कामाचा भार टाकला तर निश्चिंत रहतां येईल, हातीं पैसा अडका दिला तरी भीति नाहीं, ज्याच्यावर करडी नजर ठेवायला नको, गर्दीत कुठं हरवेल म्हणून काळजी

करायला नको, ज्याला सजवण्यांत समाधान—खाऊं घालण्यांत आनंद—जातीचा होयबा—नाहीं शब्दाची ओळख—नाहीं—"

राजलक्ष्मी मुकाट्यानं माझ्याकडे नुसती पहात राहिली होती. अकस्मात् तिच्या सर्वांगावर कांटा उभा राहिला. मी म्हटलं, "काय—झालं काय ?"

"नाहीं—कांहीं नाहीं."

"मग अशी शहारलीस कां ?"

राजलक्ष्मी म्हणाली, "आतांच तुम्हीं बोलतां बोलतां जें चित्र काढलं तें जर अर्धं खरं ठरलं तरीसुद्धां, मला वाटतं, मी धसका घेऊन मरेन."

"पण माझ्यासारखा असला निरुपयोगी माणूस तुझ्या काय कामाचा ?"

हसूं दाबून राजलक्ष्मी म्हणाली, "काय कामाचा म्हणजे ? जन्मभर देवाला शिव्याशाप देत जळूनपिचून मरायला तर मिळेल ? या जन्मीं आणखी कांहीं होईल असं कांहीं वाटत नाहीं मला !"

"त्यापेक्षां मला मुरारीपुरच्या आखाड्यांतच कां पाठवून देत नाहींस ?"

"त्यांना तरी काय उपयोग होणार तुमचा ?"

"त्यांना रोज फुलं तोडून आणून देईन. देवाचा प्रसाद मिळतोय तोंपर्यंत राहीन जीव धरून–अन् त्यानंतर बकुळीखालीं ते देतील मला समाधि ! छोटी पद्मा केव्हां तरी संध्याकाळीं तिथं दिवा लावील—एखाद्या वेळीं विसरेल—संध्याकाळचा दिवासुद्धां क्वचित् पेटणार नाहीं तिथं. पहाटेच्या वेळीं फुलं गोळा करून येत असतांना एखाद्या दिवशीं कमललता कधीं मल्लिकेचीं, तर कधीं कुंदाचीं, मूठभर फुलं त्या समाधीवर फेंकील अन् जेव्हां केव्हां एखादं ओळखीचं माणूस येईल तेव्हां आडवाटेला घेऊन त्याला ती समाधी मुद्दाम दाखवून देईल, 'हा इथं आहे आमचा नवा गोसाई,—हा उंचवटा आहे ना, या वाळलेल्या मल्लिकेच्या फुलांबरोबर बकुळीचीं वरून गळलेलीं फुलं मिसळलेलीं आहेत ना, तिथंच आहे तो.'"

राजलक्ष्मीचे डोळे पाण्यानं भरून आले. तिनं विचारलं, "अन् मग तें ओळखीचं माणूस काय म्हणेल ?"

मी म्हटलं, "तें मला काय माहित ? कदाचित् हजारों रुपये खर्च करून तें माणूस जिथं एखादं मंदिर बांधिल—"

राजलक्ष्मी म्हणाली, "नाहीं—तसं नाहीं. बकुळीचा पार सोडून तें माणूस जायचं नाहीं. झाडाच्या प्रत्येक फांदीवर पक्षी चिवचिवतील, गाणं गातील, भगडा

करतील,—त्यासरशीं वाळलेलीं पानं, वाळलेल्या डहाळया खालीं पडतील, तें सारं झाडून टाकायचं काम त्या माणसाला करावं लागेल. सकाळींच ती जागा झाडून पुसून फुलाची माळ गुंफून वाहील. रात्रीं सारीं माणसं झोंपी गेली, कीं वैष्णवकवींची गाणीं ऐकवील,—याउप्पर वेळ झाली, तर कमललतेला बोलावून आणून म्हणेल, ' ताई, अशीच एक समाधि माझ्यासाठीं बांध—त्यांत भेद रहातां नये—ही अन् ती दोन आहेत असं वाटतां नये पहाणाऱ्याला. अन् हा घे पैसा, दे एक मंदिर बांधून अन् तिथं कर राधाकृष्णाच्या मूर्तींची प्रतिष्ठा !' पण तिथं नांव लिंहू नकोस कुणाचं. कांहीं पुरावा ठेवूं नकोस. ही कोण, कुठली, कुठून आली हेंच कळतां नये कुणाला. "

मी म्हटलं, " वाः लक्ष्मी. तूं काढलेलं हें चित्र मात्र त्याहीपेक्षां मधुर—त्याहीपेक्षां सुंदर आहे. "

राजलक्ष्मी म्हणाली, " ही कांहीं कपोलकल्पित गोष्ट नव्हे गोसाई, अगदीं मूर्तिमंत सत्य आहे. फरक एवढाच, कीं मी हें करून दाखवीन—तुमच्यानं मात्र कांहीं व्हायचं नाहीं. तुम्हीं काढलेलं चित्र म्हणजे नुसतंच चित्र राहून जाईल."

" हें कसं कळलं तुला ? "

" कळलं तर ?—तुमच्यापेक्षां देखिल तें मला जास्त कळतं. ही तर माझी पूजा—हें तर माझं ध्यान—रोजचं आन्हिक पुरं करून मी अर्घ्य कुणाला वहातें ? कुणाच्या पायावर फुलं वहातें ? तुमच्याच ना ? "

खालून भटजीची हांक ऐकूं आली, " बाईसाहेब, रतन इथं नाहीं, चहाचं आधण तयार आहे. "

" आलें बाबा ! " असं म्हणून ती डोळे पुसून तशीच उठून गेली.

कांहीं वेळानं चहाचा पेला आणून माझ्यापुढं ठेवून ती म्हणाली, " वाचायची तुम्हांला फार आवड आहे, मग आतां तीच करा ना सुरवात. "

" पण त्यानं कांहीं पैसा कमावतां येत नाहीं. "

" पैसा हवा कशाला ? आहे माझ्याकडे तो खूप आहे, "

क्षणभर थांबून ती म्हणाली, " वर ही दक्षिणेकडची खोली आहे ना तें होईल तुमचं वाचनमंदिर. आनंदभावोजी पुस्तकं विकत आणील, अन् माझ्या आवडीप्रमाणें मी तीं रचून ठेवीन. त्याच्याच एका बाजूला माझी झोपायची खोली अन् दुसऱ्या बाजूला माझं देवघर—या जन्मीं हींच होतील माझी

तीनत्रिभुवनं—त्याच्या बाहेर कुठंच दृष्टी नको जायला!"

मी विचारलं, "अन् तुझं सैंपाकघर? आनंद आहे संन्यासी माणूस, जेवणाच्या या बाबतींत नजर ठेवली नाहीं तर त्याचं एक दिवस सुद्धां निभायचं नाहीं. पण त्याचा पत्ता लागला का कुठं? कधीं येणार आहे तो?"

राजलक्ष्मी म्हणाली, "कुशारीमहाशयांनीं त्याचा पत्ता लावलाय. लवकरच येतों असं आनंदनं कळवलं आहे. तो आला कीं आपण सारीं मिळून गंगा-माटीला जाऊं. राहूं तिथं कांहीं दिवस."

मी म्हटल, "हो जाऊं—पण त्यांच्यासमोर जायला आतां तुला लाज नाहीं वाटायची?"

राजलक्ष्मी हंसू आवरून मान वेळावीत म्हणाली, "काशीला मी नाक अन् केंस कापून सोंग सजवलं होतं तें त्यांना कुठं माहीत आहे? केंस आतां बरेच वाढले आहेत अन् नाकाचं भोंकही बेमालूम बुजत आलंय—आतां खूणसुद्धां दिसत नाहीं. अन् तुम्हीं बरोबर असलांत कीं मग माझे सारे दोष, सारी लाजलज्जा, आपोआप धुऊन निघेल."

क्षणभर थांबून ती म्हणाली, "ती दळभद्री मालती पुन्हां गांवीं आली आहे म्हणून कळलंय मला. बरोबर आणलंन आहे त्या नवऱ्याला. तिला एक मोहनमाळ करून देणार आहे मी!"

मी म्हटलं, "खुशाल दे—पण पुन्हां सुनंदेच्या पकडींत सांपडलीस—"

माझं भाषण मधेंच थांबवून राजलक्ष्मी म्हणाली, "नाहीं, हो नाहीं. ती भीति आतां नाहीं. तो भ्रम आतां गेला आहे. अग आई ग! काय धर्मबुद्धि दिली तिनं—अहोरात्र डोळ्यांतलं पाणी थांबेना—जेवणखाण सुचेना.—वेड लागलं नाहीं हेंच भाग्य म्हणायचं." असं म्हणून ती हंसत हंसत म्हणाली, "ही तुमची लक्ष्मी कशीही असो पण ती मनाची चंचल नाहीं. एकदां तिच्या बुद्धीला पटलं कीं मग तें बदलायची कुणाची प्राज्ञा नाहीं." पुन्हां क्षणभर उगीच राहून नंतर ती म्हणाली, "माझं सारं अंतःकरण यावेळीं आनंदानं भरून आलंय. प्रतिक्षणीं वाटतं, या जन्मीं जें काय मिळायचं तें मिळालं—आतां आणखी कांहीं नको मला. हाच तर खरा देवाचा आशिर्वाद नसेल! आजवर पूजा करतांना देवाकडे स्वतःसाठीं कांहीं मागितलं नाहीं. केवळ एवढंच मागत होतें,—जगांत सर्वत्र असाच आनंदी आनंद होवो. म्हणूनच ना आनंदभावोजीला बोलवायला पाठवलं?

आतां यापुढं त्याच्या कामांत थोडथोडा हातभार लावायचं ठरवलंय मी."

मी म्हटलं, "ठीक आहे, होऊन जाऊं द्या."

राजलक्ष्मी आपल्याशींच कांहीं वेळ विचार करीत होती. एकाएकीं तिनं बोलायला सुरवात केली. ती म्हणाली, "असं पहा, या सुनंदेइतकी सच्ची, इतकी निर्लोभ, इतकी सत्यवादी बाई कुठं पाहिली नाहीं. पण तिचा विद्वत्तेचा दंभ जोंपर्यंत सरत नाहीं तोंपर्यंत तिची विद्या कामीं लागायची नाहीं."

"पण सुनंदेला तर आपल्या विद्वत्तेचा अभिमान मुळींच नाहीं."

राजलक्ष्मी म्हणाली, "नाहीं. इतरासारखा नाहीं. मी तसं म्हणत नव्हतें. किती श्लोक, किती शास्त्रकथा, किती गोष्टी-आख्यानं तिला माहित आहेत! तें सारं तिच्या तोंडून ऐकतां ऐकतां माझी अशी धारणा झाली कीं मी तुमची कुणि नव्हे. हा आपला संबंध खोटा!—अन् त्याच समजावरच विश्वास ठेवायचा मी प्रयत्न करीत होतें. पण देवांनं माझा गळा दाबून मला समजावून दिलं, कीं तो सारा समजच खोटा होता. म्हणूनच मी म्हणतें, कीं तिच्या विद्वत्तेत कुठं तरी जबरदस्त भूल आहे. ती केव्हांच कुणाला सुखी करायला समर्थ होत नाहीं, सर्वांना नुसतं दुःख द्यायला कारणीभूत होते, असंच मला दिसून आलं. तिची मोठी जाऊ तिच्यापेक्षां फार चांगली. आपली जुन्या काळची माणूस—कांहीं लिहितां वाचतां येत नव्हतं तिला-पण तिचं अंतरंग दयेमायेनं भरलेलं होतं. किती गरीबगुरीब माणसांना ती चोरूनमारून मदत करी. कुणाला कळूं देत नसे. त्या ताँतीकुटुंबाबरोबर तिनं जें समेट करवलं तें काम सुनंदेला कधीं साधलं असतं का? नुसतं घर सोडून निघून जाण्यानं कसला कार्यभाग झाला? कशाला तो दिमाख? पण तें जमवलं तिच्या जावेनं—रडूनकढून नवऱ्याचे हातपाय धरून! साऱ्या जगासमोर चोर म्हणून सुनंदेनं वडील दीराला हलकेपणा आणला. शास्त्रं शिकल्याचं हेंच का लक्षण? ही पुस्तकी विद्या जोंपर्यंत माणसाचं सुखदुःख, बरंवाईट, पापपुण्य, लोभमोहाचा मिलाफ करूं शकत नाहीं, तोंपर्यंत या असल्या पुस्तकी ज्ञानाचं फळ माणसाला निष्कारण बाधणार मात्र! अत्याचारी होणार तें ज्ञान! जगांत कधीं कुणाचं कल्याण होणार नाहीं त्यामुळं—तुम्हांला सांगून ठेवतें."

तिचं भाषण ऐकून मी आश्चर्यचकित झालों. मी विचारलं, "कुठं शिकलीस हें ज्ञान?"

राजलक्ष्मी म्हणाली, "कुठं कोण जाणे? कदाचित् तुमच्याकडेसच असेल.

तुम्हीं बोलत नाहीं कांहींच, मागत नाहीं कांहींच, सत्ता गाजवीत नाहीं कुणावर. म्हणून तुमच्याकडे शिकणं म्हणजे नुसतं शिक्षण नव्हे, तर तें खरं खरं प्रत्यक्ष ज्ञान असतं. एकदम असं वाटतं—अगदीं आश्चर्य वाटूं लागतं—या साऱ्या कल्पना आल्या कुठून ? जाऊं दे तें. या खेपेला गेलें, कीं थोरल्या कुशारीबाई-बरोबर दोस्ती करणार. त्यावेळीं तिची हेटाळणी करण्यांत जी चूक झाली तिची भरपाई केली पाहिजे मला. मग येणार ना गंगामाटीला ? ”

“ अन् बर्मा ? माझी नोकरी ? ”

“ पुन्हां नोकरी ? सांगितलं ना मी एकदां—कीं मी तुम्हांला नोकरी करूं द्यायची नाहीं. ”

“ लक्ष्मी, किती छान तुझा स्वभाव. तूं बोलत नाहींस कांहींच, सत्ता गाजवीत नाहींस कुणावरच —अस्सल वैष्णवी तितीक्षेचा नमुना म्हणजे तूं ! ”

“ म्हणून का ज्याला जें आवडतं तें निमूट करूं द्यायचं ? जगांत दुसऱ्या कुणाला सुखदुःख होतच का नाहीं ? आपलंच तेवढं खरं करायचं का ? ”

“ तें खरं—पण अभया ? तिनं प्लेगची पर्वा केली नाहीं. त्या तसल्या प्रसं-गांत मला आसरा देऊन तिनं वाचवलं नसतं तर आज तुझी माझी भेट झाली नसती. आज ती कशी काय आहे हें सुद्धां नाहीं का पहायचं ? ”

कृतज्ञतेनं हृदय भरून आल्यामुळं राजलक्ष्मी क्षणभर सद्गदित झाली आणि कळवळून म्हणाली, “ तर मग तुम्हीं इथं रहा. आनंदभावोजीला घेऊन मी ब्रह्मदेशला जातें. तिला धरून बांधून इथं घेऊन येतें. इथं आल्यावर तिच्यासाठीं कांहीं ना कांहीं तरी करतां येईल. ”

मी म्हटलं, “ हो, तसं करतां येईल खरं पण ती मोठी मानी आहे. मी गेल्याशिवाय यायची नाहीं. ”

राजलक्ष्मी म्हणाली, “ पहा येते कीं नाहीं ती. तुम्हींच आलांत असं वाटेल तिला. पहा तर खरं. माझा अंदाज चुकायचाच नाहीं मुळीं. ”

“ मला इथं टाकून तूं जाशील ? ”

राजलक्ष्मी पहिल्यानं उगीच राहिली. त्यानंतर अनिश्चितपणें हळू हळू म्हणाली, “ तेंच संकट आहे ना ? तेंच कठीण जायचं कदाचित्. पण त्यापूर्वी कांहीं दिवस चला ना गंगामाटीला राहून येऊं. ”

“ तिथं कांहीं विशेष काम आहे वाटतं ? ”

" आहे थोडंसं. शेजारचा पोडामाटी गांव विक्रीला निघाला आहे, असं कुशारीबाबूंना कळलंय. म्हटलं, तो खरेदी करूं. तें घर देखील जरा चांगलंच दुरुस्त केलं पाहिजे म्हणजे तुम्हांला तिथं त्रास व्हायचा नाहीं. बसायला चांगली जागा नव्हती म्हणून त्यावेळीं तुम्हांला तिथं भारी त्रास झाला."

मी म्हटलं, " त्रास झाला तो बसायच्या जागेमुळं नव्हे.—त्रास झाला तो निराळ्याच कारणामुळं."

माझ्या उद्गाराकडे बुद्धिपुरस्सर दुर्लक्ष करून राजलक्ष्मी म्हणाली, " मी पाहिलंय, तुमची प्रकृति एकंदरींत तिथं बरी रहाते. फार दिवस शहरात रहाणं तुम्हांला मानवत नाहीं. म्हणून तर तुम्हांला घेऊन जायची एवढी घाई करतेंय मी."

" पण माझ्या या मोडक्यातोडक्या देहाची हरघडी काळजी करीत बसलीस तर आयुष्यांत तुला समाधानाचा एक क्षणसुद्धां मिळायचा नाहीं, लक्ष्मी!"

राजलक्ष्मी म्हणाली, " मोठा छान उपदेश केलात. पण असला उपदेश मला करायच्याऐवजीं जर स्वतःचीच काळजी घेतली असतीत तर खरोखरच मला एवढा त्रास भोगावा लागला नसता."

तिचे तें उद्गार ऐकून मी उगीच राहिलों. कारण या बाबतींत वादविवाद करणं जितकं निरर्थक होतं तितकंच असमाधानकारक होतं. तिची स्वतःची प्रकृती अगदीं निकोप होती. म्हणून ज्याची प्रकृती निकोप नाहीं तो कारण नसतांनासुद्धां आजारी पडतो कसा, हें सांगून तिला समजावतां आलं नसतं. मी म्हटलं, " शहरांत रहायची माझी केव्हांच इच्छा नाहीं. त्यावेळीं गंगामाटी हें तूं आज विसरतेयस लक्ष्मी!"

" नाहीं हो नाहीं, विसरलें नाहीं. उभ्या जन्मांत विसरणार नाहीं." असं म्हणून ती एवढंसं हंसली आणि म्हणाली, " कुठल्या कुठं अनोळखी जागेंत येऊन पडलों असं त्यावेळीं तुम्हांला वाटलं असेल. पण यावेळीं पहा तर खरं, अशी सारी बदलाबदल करून टाकली आहे, कीं ही तेव्हांचीच जागा हें तुम्हांला ओळखायलासुद्धां यायचं नाहीं. नुसतं घरदार बदलायचीच गोष्ट नव्हे, यावेळीं बदल करायचा आहे तो माझा मला स्वतःचा—आणि सर्वांपेक्षां मोडूनतोडून नवीन बनवायचं आहे तें तुम्हांला—माझ्या नव्या गोसाव्याला. असं बदलायचं आहे कीं, रस्तोरस्तीं भीक मागायला हा असलाच सोबती हवा असं म्हणायची

कमललतेला छातीच व्हायची नाहीं."

मी म्हटलं, "विचार करकरून हें सारं ठरवलं वाटतं ?"

हंसतमुखानं राजलक्ष्मी म्हणाली, "हो तर! तुम्हांला काय असं मोल दिल्या-शिवाय पदरांत बांधून घेऊं ? ऋण नको का फेडायला तें ? आणि तुमच्या जीव-नांत जी मी ही घुसलेंय त्याची खूण नको का ठेवून जायला मला ? अशी उगीचच का निघून जाऊं ? असं कांहीं होऊं द्यायची नाहीं बरं मी!"

मी तिच्या तोंडाकडे पाहिलं—श्रद्धेनं आणि स्नेहानं माझं अंतःकरण परिपूर्ण होऊन उठलं. मी आपल्याशींच म्हणालों, "हृदयाचा विनिमय करणं ही स्त्री-पुरुषांच्या आयुष्यांतील अगदीं सामान्य घटना आहे. जगांत रोज हेंच चालतं आहे. त्याला खळ नाहीं—त्यांत विशेषत्व नाहीं. व्यक्तिविशेषाच्या जीवनाच्या आसऱ्यानं, हे दान आणि प्रतिग्रह, किती विलक्षण आणि विस्मयपूर्ण गोष्टी निर्माण करतात ? यांचा महिमा माणसाच्या युगानुयुगें अभिषिक्त करूनही सारखा वाढतो आहे. हीच ती अक्षय संपत्ति—यानंच माणूस मोठा होतो—शक्तिमान होतो—अभावित कल्याणाच्या आधारावर नवी सृष्टी निर्माण करूं शकतो.

मी विचारलं, "बंकूचं काय करणार तूं ?"

राजलक्ष्मी म्हणाली, "त्याला मी आतां नको आहें. ही व्याद दूर झाली कीं सुटलों, असं त्याला वाटतंय."

"पण तो तर तुझा जवळचा संबंधी—तूंच त्याला लहानाचा मोठा केलास ना ?"

"तो संबंध तेवढा लहानाचा मोठा करण्यापुरताच. तेवढंच हवं होतं त्याला. तो कांहीं जवळचा नातेवाईक नव्हे माझा."

"कसा नव्हे ? नाहीं म्हणून कसं चालेल ?"

"नाहीं म्हणावं असं मलासुद्धां वाटत नाहीं—" असं म्हणून ती क्षणभर मुकाट्यानं राहून नंतर म्हणाली, "माझी सारी कथा तुम्हांलाही माहित नाहीं. माझ्या लग्नाची हकिकत माहीत आहे ना तुम्हांला ?

"माहित आहे—पण ती लोकांच्या तोंडून. पण त्यावेळीं मी कांहीं गांवीं नव्हतों—"

"हो, तुम्ही नव्हतांच त्यावेळीं. मोठा दुःखदायक आहे तो इतिहास. कुठंच घडला नसेल असला भयंकर प्रकार कधीं!—माझ्या आईला बाबांनीं टाकलं होतं.

मी त्यांना कधींच पाहिलं नाहीं. आम्ही दोघी बहिणी मामाच्या घरीं लहानाच्या मोठ्या झालों. हिंवतापानं लहानपणीं माझी काय दशा झाली होती तें आठवतं ना तुम्हांला ?"

"आठवतं तर!"

"तर मग ऐका. दोष नसतांना माणसाला कशी शिक्षा होते तें कळलं तर तुमच्या सारख्या निर्दय माणसाला सुद्धां दया येईल. तापानं पिचत होतें पण मृत्यु आलं नाहीं. माझे मामासुद्धां कांहीं ना कांहीं होऊन बिछान्याला खिळून पडले होते. तितक्यांत कुणि सांगितलं, कीं दत्तांच्या घरचा स्वैपाकी आमच्यांतलाच आहे. मामाइतकाच स्वभावकुलीन आहे*वयानं साठांचा असेल. दोन्ही बहिणींशीं लग्न करायची त्याची तयारी होती. हा सुयोग घालवला तर मुलींना आजन्म कुंवारी राहण्याचा प्रसंग येईल असं सारे म्हणूं लागले. तो मागत होता शंभर—मामांनीं लिलावाप्रमाणं दर आणला पन्नासांवर. एकाच ठिकाणीं एकाच वेळीं दोघींचीं लग्नं व्हायचीं. त्यामुळं श्रम कमी, खर्च कमी, म्हणून तो शंभर मागत होता. शेवटीं पंचाहत्तरावर आला. म्हणाला, 'महाशय दोन दोन कुलीन बहिणींचा उद्धार करायचा तिथं दोन बोकडांइतकी देखील किंमत नाहीं का देणार ?' पहाटे लग्न ठरलं होतं. आक्का रात्रभर जागत होती. माझी गठडी बांधून कसंबसं मला सजवलं. बाकीच्या पंचवीस रुपयांसाठीं सकाळपासून झगडा सुरू होता. मामा म्हणाले, 'आधीं कार्य होऊन जाऊं दे.' तो म्हणाला, 'मी एवढा वेडा नाहीं. असलीं कामं उधारीवर होत नाहींत.' त्यानं एकदम कुठं काळं तोंड केलं. प्रसंगांत सांपडलेले माझे मामा त्याचा शोध काढून रक्कम पुरी करतील आणि कार्यही पुरं करतील असं त्याला वाटलं होतं. एक दिवस गेला —दोन दिवस गेले—आईनं रडरडून घर डोक्यावर घेतलं. शेजारीपाजारी हसूं लागले. मामानं जाऊन दत्तांकडे तक्रार केली पण नवरा मुलगा कांहीं आला नाहीं. त्याच्या गांवीं जाऊन तपास केला पण तो तिकडे गेलाच नव्हता असं कळलं. मला पाहून कुणी म्हणत—'मेली हाडकपाळी!' कुणि म्हणत, 'मेली भद्रकपाळी!'—बिचारी आक्का लाजेनं अर्धीमेली झाली होती. घराच्या उंबरठ्याबाहेर कांहीं कधीं आली नाहीं!—ती

*बंगाल्यांतील कुलीन ब्राह्मणाची कल्पना आपल्या इकडे कळणें शक्य नाहीं. ब्राह्मण जातींतील हे अस्सल ब्राह्मण—म्हणून त्यांच्यांत लग्नें होणें फार कठीण जातें. मुली जास्त, मुलगे कमी, अशी या जातींत विकट परिस्थिति आहे.

जी घरांतून बाहेर आली ती सहा महिन्यानंतर—अन् तीही स्मशानांत नेण्यासाठीं. आणखी सहा महिने गेले. कलकत्त्याहून बातमी आली, कुठल्या तरी हॉटेलांत रांधतां रांधतां ताप येऊन नवरामुलगा मरून गेला. लग्न कांहीं पुरं झालं नाहीं.—"

मी म्हटलं, "पंचवीस रुपयांना नवरा मुलगा विकत घ्यायला गेलं, कीं हें असं होतं."

राजलक्ष्मी म्हणाली, "तरी पण त्याला माझ्या वांट्याचे पंचवीस रुपये तरी मिळाले होते. तुम्हांला काय मिळालंय ? तेवढी ती एक करवंदीची माळ !—तीही विकत घेतलेली नव्हे—रानांतून गोळा करून आणलेली."

मी म्हटलं, "बिनपैशाची वस्तू बिनमोल असते. माझ्यासारखी अशी ही बिन-मोल दौलत कुणाला मिळाली आहे तें दाखवून दे पाहूं."

"खरं सांगा, अगदीं मनापासून बोलतां कां हें ?"

"तुला पटत नाहीं ?"

"नाहीं हो नाहीं, पटत नाहीं, खरोखर पटत नाहीं—" बोलतां बोलतां तिला हसूं लोटलं. ती म्हणाली, "तुम्हीं झोंपी गेलेले असलांत, तुमच्या तोंडाकडे त्यावेळीं पहात राहिलें, कीं त्यावेळीं मात्र पटतं. जाऊं दे तें. आम्हां दोघी बहिणींच्या आयुष्याची जी ही वाताहात झाली तशीच आणखीही शेंकडों मुलींची होत असेल. कुत्र्यामांजरांचे हाल पाहिले तरीसुद्धां माणसाच्या मनाला लागतं—" असं म्हणून ती क्षणभर उगीच कुठंतरी पहात रहात नंतर म्हणाली. "माझी ही तक्रार उगीच मोठी करून मी सांगतें असं तुम्हांला वाटेल कदाचित्—असंही वाटेल, कीं कितीशीं आहेत अशीं उदाहरणं ? पण मी असं म्हणेन, कीं असलं एक उदाहरण म्हणजे देखिल साऱ्या देशाला कलंक आहे. त्याला देखिल उत्तर आहे माझ्याकडे—पण तें मी सांगणार नाहीं. नुसतं बोलून कशाला दाखवायचं ? येतां का माझ्याबरोबर ? ज्या विधवांना मी माझ्यापरीनं अल्पस्वल्प मदत करतें त्यांच्याकडे येतां का ? त्या स्वतः सांगतील—त्या स्वतः साक्ष देतील, कीं त्यांच्या वडील माणसांनीं हातपाय बांधून असंच त्यांना विहिरींत लोटलं होतं—"

मी म्हटलं, "म्हणूनच वाटतं तुझी त्यांच्यावर एवढी माया ती ?"

राजलक्ष्मी म्हणाली, "डोळे उघडून माझी दशा पाहिली असतीत म्हणजे तुम्हां-लाही असंच वाटलं असतं. आतां यापुढं तुम्हांला मी एकेक दाखवणार आहे—"

"मी पहाणार नाहीं. डोळे झांकून घेईन."

" काय ताकद आहे तुमची ? मी जीं कामं आरंभलीं आहेत त्यांचा भार एक दिवस तुमच्यावरच टाकून मला जायचं आहे. सारं कांहीं विसरतां येईल पण हें विसरणं फार कठीण जाईल ! " असं म्हणून ती कांहीं वेळ मुकाट्यानं बसली. पुन्हां तिला आपली पूर्वकथा आठवली. पूर्वीच्या बोलण्याचा धागादोरा घेऊन ती म्हणाली, " होईनात का हे अत्याचार ! मुळींच लग्न झालं नाहीं तर या देशांत धर्म बुडतो—जात बुडते—लाजेनं समाजांत तोंड दाखवणं कठीण जातं. नवरा लंगडा, पांगळा, आंधळा, कसाही असो ! पण तिथं उपाय नाहीं—एकदां उजवून टाकायचं ! एकाला फसवून जिथं दुसऱ्याला सावरलं जातं अशा या देशांत माणसाला जगायला कांहीं आधार आहे का ? त्यावेळीं सर्वांनीं मिळून आम्हां दोन्ही बहिणींची मोट बांधून जर आमचा बळी दिला नसता तर आमची आक्का मेली असती का ? आणि मी ?—कदाचित् या जन्मीं तुमची माझी गांठ पडली नसती पण माझ्या या मनाच्या देव्हाऱ्हांत तुमचीच मूर्ति टिकून राहिली असती. एवढंच काय, मला असं चकवून तुम्हीं गेलां नसतां. कुठून ना कुठून, केव्हां ना केव्हां तरी येऊन, मला घेऊन जाणं तुम्हांला भाग पडलं असतं. "

काय उत्तर द्यावं याचा विचार करीत होतों तोंच खालून कुणा मुलाची हांक ऐकूं आली, " मावशी ! "

आश्चर्यचकित होऊन मी विचारलं, " हा आणखी कोण भाचा ? "

" शेजारघरच्या थोरल्या सुनेचा मुलगा. " असं म्हणून तिनं खुणेनं तें घर मला दाखवलं.

" क्षितीश, वर ये ना बाळ. " ती म्हणाली.

सोळा सतरा वर्षांचा एक देखणा आणि सुदृढ प्रकृतीचा मुलगा तितक्यांत आंत आला. मला पहातांच तो पहिल्यानं मागं हटला, पण नंतर मला नमस्कार करून आपल्या मावशीला म्हणाला, " आपल्या नांवावर बारा रुपये वर्गणी पडली आहे मावशी. "

" पडूं दे. पण पोहतांना संभाळून हं. नाहीं तर भलताच प्रसंग यायचा. "

" छे. छे. ती भीति नको मावशी. "

कपाट उघडून राजलक्ष्मीनं रुपये काढून त्याच्या हातीं दिले. तो घाईघाईनं जायला निघाला पण तितक्यांत अर्ध्या जिन्यावर थांबून म्हणाला, " आईनं सांगितलंय, परवां सकाळीं छोटे मामा येऊन सारं एस्टिमेट करून देतील. '

एवढंच बोलून तो पळत निघून गेला.

मी विचारलं, " एस्टिमेट कसलं ? "

घराची दुरुस्ती करायची आहे ना ? पूर्वी त्यांनीं तिसरा मजला अर्धाच चढवून काम तेवढंच ठेवलं होतं. तें पुरं करायला हवं ना ? "

" तें होऊन जाईल. पण इतक्यांत या लोकांची कुटली ओळख काढलीस ?"

" वाः ! त्यांत काय ? माणसं शेजारघरचींच ना ? पण आतां राहूं दे तें. तुमच्या जेवणाची तयारी करायची वेळ झाली. " असं म्हणून ती उठून खालीं निघून गेली.

# १३

एके सकाळीं आनंद स्वामीजी येऊन हजर झाला. त्याला बोलावणं गेलं होतं हें रतनला माहित नव्हतं. आंबट तोंड करून त्यानं मला वर्दी दिली, " बाबू, गंगामाटीचा तो गोसावी येऊन हजर झालाय. धन्य आहे त्याची ! शोधशोधून तपास लावला बेट्यानं. "

सर्व प्रकारच्या साधूबैराग्यांना रतन संशयाच्या नजरेनं पाही. राजलक्ष्मीच्या त्या गुरुजीवर नजर टाकायची देखील त्याची तयारी नसे. तो म्हणे, " पहा तर खरं—आमच्या बाईला हा काय शिकवणार ? पैसे उकळायसाठीं हे असले धार्मिक लोक किती ढोंगं माजवतात पहा ! "

मी हंसून म्हटलं, " आनंद मोठ्या घरचा मुलगा आहे. डॉक्टरची परीक्षा पास झालाय. त्याला स्वतःला पैशाची गरज नाहीं. "

" हंः, म्हणे मोठ्या घरचा मुलगा ! आणि म्हणे पैसा आहे ! पैसा असेल तो कशाला असा भीक मागायला निघेल ? " एवढंच बोलून त्यानं आपलं निश्चित मत व्यक्त केलं.

रतनची मूळ आडकाठी होती ती याच गोष्टीला. बाईचा पैसा दुसऱ्या कुणी उकळला तर त्याला त्याचा भयंकर विरोध होता. अर्थात् त्याची स्वतःची बाब स्वतंत्र होती !

वज्रानंद आला आणि मला नमस्कार करून म्हणाला, " पुन्हां आलों एकदां दादा. सगळं ठीकठाक आहे ना ? ताई कुठं आहे ? पूजेला बसली आहे वाटतं. तिला कळलं नाहीं वाटतं ! तर मग मी स्वतःच खबर देतों. पूजेवरून उठायला

नको तिला. आतां सरळ सैंपाकघराकडे जातां येईल तिला. मग देवघर कुणीकडे आहे दादा ? हा बेटा हजाम गेला कुठं ? त्याला म्हणावं, चहाला आधण ठेव ना."

देवघर मी दाखवून दिलं. रतनला एक हांक ठोकून तो देवघराकडे गेला.

एकदोन मिनिटांत दोघंही आलीं. आनंद म्हणाला, " ताई, चार पांच रुपये दे. चहा घेतों आणि एकदां शियलदाच्या बाजारांत जाऊन चक्कर मारून येतों."

राजलक्ष्मी म्हणाली, " जवळच चांगलं मार्केट आहे. एवढं लांब कशाला जायला हवं आनंद ? आणि तूं स्वतः कशाला जायला हवं ? रतन जाईल ना. "

" रतन ना ? त्याचा भरंवसा नाहीं ताई. मी आलोंय म्हणूनच मुद्दाम बेचव कुबट मासे घेऊन येईल—" असं बोलत असता त्याची नजर दरवाजाकडे गेली—रतन तिथं उभा होता—जीभ चावून तो म्हणाला, " रतन, कांहीं मनांत आणूं नकोस बाबा. मला वाटलं तूं त्या तिकडे गेलास. हांक मारली तेव्हां ओ दिली नाहींस ना ? "

राजलक्ष्मी हंसूं लागली. मलाही हसूं आवरेना. रतननं तिकडे लक्ष दिलं नाहीं. तो गंभीर मुद्रेनं म्हणाला, " मी बाजाराला जातों बाई. किसननं चहाचं आधण ठेवलंय. " एवढंच बोलून तो निघून गेला.

राजलक्ष्मी म्हणाली, " रतनबरोबर आनंदाचं बनत नाहीं वाटतं ? "

आनंद म्हणाला, " त्याला दोष देतां येत नाहीं बाई. तो आपली फार काळजी वहातो. भलतीं माणसं आलेलीं त्याला खपत नाहींत. पण आज मात्र त्याच्या बरोबरच गेलें पाहिजे मला. नाहींतर जेवणाचं बरोबर जमायचं नाहीं. फारच दिवसांचे उपास आहेत ! "

राजलक्ष्मी तशीच तडक व्हरंड्यावर जाऊन रतनला हांक मारून म्हणाली, " रतन, आणखी एक दोन रुपये जास्त घेऊन जा बाबा. चागला मोठासा रुई मासा बघून आण. "

ती परत आली आणि म्हणाली, " आतां हातपाय धुऊन ये पाहूं भाई. मी चहा तयार करून आणतें. " असं म्हणून ती खालीं निघून गेली.

आनंद म्हणाला, " एकदम कां हा हुकूम सुटला मला ? "

" तें काय मला सांगतां येतंय आनंद ? "

आनंद हंसत म्हणाला, " अजून दादांचा नूर जुनाच आहे—राग गेला नाहीं. पुन्हा पळून जायचा तर बेत नाहीं ? काय ती त्यावेळीं गंगामाटीला

घाबरगुंडी उडवलीत आमची! इकडे साऱ्या गांवांत आमंत्रण, तिकडे घरचा मालकच कुठं नापत्ता, मधें सांपडलों मी—नवा माणूस—इकडे जात होतों, तिकडे जात होतों, ताई भोकांड पसरून रडत होती—तितक्यांत जमलेल्या लोकांना हांकून द्यायची लहर आली रतनला. काय गोंधळ झाला तों सांगतां येत नाहीं! भले आहांत झालं!"

मीही हंसूं लागलों, म्हटलं, "आतां तो राग गेला सारा. आतां काळजी नको."

आनंद म्हणाला, "तें सांगतां येत नाहीं. आपल्यासारख्या निस्संग, एकलकोंड्या माणसाची मला मोठी भीति वाटते. या जगाशीं आपण कां संबंध जोडतां त्याचाच मला विचार पडतो केव्हां केव्हां."

मी आपल्याशींच म्हणालों, 'नशिब माझं!' उघड म्हटलं, "तर मग माझा विसर पडला नाहीं म्हणायचा एकूण. मधूनमधून आठवण येत होती म्हणायची."

आनंद म्हणाला, "नाहीं दादा, तुम्हाला विसरणं कठीण, ओळखणं कठीण, आणि तुमचा मोह तोडणं त्याहूनही कठीण. खरं वाटत नसेल तर बोला—ताईला बोलावून रुजवात करतों! आपली ओळख सारी दोन तीन दिवसांची. पण त्या दिवशीं ताईबरोबर मीही भोकांड पसरून रडलों नाहीं, तो संन्याशाला शोभणार नाहीं म्हणूनच."

मी म्हटलं, "तेंही ताईसाठींच वाटतं? तिच्याच हुकुमानं तर आज एवढी लांबची मजल मारलीस ना?"

आनंद म्हणाला, "अगदींच खोटं नाहीं दादा. तिचं आमंत्रण म्हणजे आमंत्रण नव्हे—आई भवानीची हांक. पाय आपोआप चालूं लागतात. कितीतरी घरचा आश्रय मला घ्यावा लागलाय पण अशी कुणी कुठें पाहिली नाहीं. आपण सुद्धां खूप हिंडला आहांत, सांगा पाहूं, अशी कुणी दिसली आहे का तुम्हांला? एकतरी?"

मी म्हटलं, "एक कां? अनेक! अनेक!"

तितक्यांत राजलक्ष्मी आली. खोलींत पाऊल टाकतांच माझं भाषण तिच्या कानीं पडलं असावं. चहाचा पेला आनंदाच्या पुढ्यांत ठेवून तिनं मला विचारलं. "अनेक काय हो?"

बिचारा आनंद संकटांत पडला. मी म्हटलं, "तुझं गुणगान चाललं आहे. त्याला पटेना, म्हणून मी त्याला जोराचा विरोध करीत होतों."

चहाचा पेला आनंदानं तोंडाशीं नेला होता, हंसण्याच्या उकळीसरशीं तोंडचा अर्धा घोंट जमिनीवर सांडला. राजलक्ष्मी हंसत सुटली.

आनंद म्हणाला, " दादा, आपली समयसूचकता विलक्षण आहे. एका क्षणांत अगदीं उलट्याचं पालटं करून टाकायचं सुचलं कसं तुम्हांला ? "

राजलक्ष्मी म्हणाली, " त्यांत काय तुला एवढं वाटलं आनंद ? मनांतल्या गोष्टी दाबून दाबून ठेवण्यांत, अन् त्यासाठीं बनावट गोष्टी पचवून दाखवण्यांत, हे अगदीं महामहोपाध्याय होऊन बसले आहेत. "

मी म्हटलं, " म्हणजे ? माझ्यावर विश्वास नाहीं वाटतं तुझा ? "

" मुळींच नाहीं. "

आनंद हंसून म्हणाला, " बनावट बोलायच्या विद्येंत आपणही कांहीं कमी नाहीं ताई. एकदम 'मुळींच नाहीं' म्हणून गेलांत. "

राजलक्ष्मी हंसत सुटली. म्हणाली, " भाजूनपोळून शिकावं लागलंय बाबा. पण आतां उशीर करूं नकोस भाई–चहा घेऊन आधीं आंघोळ करून घे. काल गाडींत खायला कांहीं मिळालं नसेल त्याचा अंदाज आहे मला. यांच्या तोंडून माझं पुराण ऐकायला बसलास तर सारा दिवस पुरा पडायचा नाहीं. " असं म्हणून ती निघून गेली.

आनंद म्हणाला, " आपल्यासारखी ही जोडी जगांत विरळा. हा विलक्षण मेळ घालून मग देवानं आपल्याला या दुनियेंत धाडून दिलं, "

" त्याचा नमुना पाहिलास ना ? "

" नमुना पाहिला त्याचवेळीं—साईंथिया स्टेशनवरच्या झाडाखालीं! त्यानंतर कसला नमुना कांहीं पहायला मिळाला नाहीं. "

" वाः ! एवढं तिच्यासमोर सांगितलं असतंस तर आनंद ? "

आनंद कामसू माणूस. त्याची काम करण्याची ताकद आणि उत्साह अगदीं भरपूर असे. तो आल्यापासून राजलक्ष्मीच्या आनंदाला पारावार नव्हता. दिवसरात्र खाण्यापिण्याचं अवडंबर एवढं माजलं होतं, कीं खाणं म्हटलं कीं मला भीति वाटे. सारखीं दोघांचीं जीं काय खलबतं चालत तीं सारींच मला कळलीं नाहींत. एवढंच कानीं आलं, कीं गंगामाटीला एक मुलासाठीं आणि एक मुलीसाठीं अशा शाळा काढायचा बेत चालला होता. तिथं गरीब आणि हलक्या लोकांची वस्ती मोठी होती. ही योजना त्यांच्याचसाठीं होती. मला वाटतं, दवाखान्याबद्दलही कांहीं चर्चा चालली होती. या असल्या कामीं मी फारसा वाकबगार नव्हतों. परोपकाराची इच्छा असे पण शक्ति नव्हती. कुणी कांहीं असा बेत केला, तर आज नको उद्यां, म्हणून लांबणीवर टाकावं असं

मला वाटे. त्या साऱ्या भानगडींत मला ओढायचा आनंद मधूनमधून प्रयत्न करी. पण राजलक्ष्मी हंसून म्हणे, " या प्रकरणीं त्यांना ओढूं नकोस आनंद. तुझ्या सगळ्या संकल्पाची धूळधाण उडून जाईल. "

तिनं असं म्हटलं, तेव्हां कांहीं तरीं उत्तर दिलंच पाहिजे होतं म्हणून मी म्हटलं, " आतां यापुढं मला खूप कामं करायचीं आहेत असं जें त्या दिवशीं म्हणालीस, तीं हींच कामं वाटतं ? अन् मलाही कामाला जुंपणार आहेस वाटतं ? "

राजलक्ष्मी हात जोडून म्हणाली, " आतां हद्द झाली गोसाई ! यापुढं असं कांहीं बोलूं नका. "

" तर मग मी केव्हांच कांहीं काम करायचं नाहीं वाटतं ? "

" कां नाहीं ? आजारी पडून मला घाबरवून अर्धमेली केली नाहींत म्हणजे पुष्कळ झालं. तेवढेच मोठे उपकार होतील माझ्यावर. "

आनंद म्हणाला, " ताई, खरोखरच अशानं दादाला तूं निष्कर्मा बनवून टाकशील. "

राजलक्ष्मी म्हणाली, "मी कशाला बनवायला हवं भाई ? ज्या ब्रह्मदेवानं ह्यांना घडवलं त्यानंच ती व्यवस्था केली आहे. कांहीं कमतरता ठेवली नाहीं त्यानं.—" आनंद हंसूं लागला तेव्हां राजलक्ष्मी म्हणाली, "तितक्यांत कुठून एक भद्रकपाळ्या ज्योतिषी आला अन् त्यानं भीति घालून ठेवली. तेव्हापासून, हे घराबाहेर गेले कीं परत येईपर्यंत माझा प्राण डोळ्यांत येतो. कुठंच लक्ष लागत नाहीं. "

" हा आणखी ज्योतिषी कुठून आला ? काय म्हणाला तो ? "

यावेळीं मी उत्तर दिलं. मी म्हटलं, " माझा हात पाहून तो म्हणाला, कीं एक मोठं संकट आहे—अपमृत्यु आहे. "

" असल्या गोष्टींवर तुमचा विश्वास आहे ताई ? "

मी म्हटलं, " हो, आहे तर. अलबत आहे. संकट, अपमृत्यु म्हणून या जगांत कांहीं नाहींच का ?—कुणावर कधीं संकट येतच नाहीं का ?–असं तुझी ताई म्हणते. "

हंसत हंसत आनंद म्हणाला, " तें खरं आहे–पण नुसता हात पाहून तें कसं सांगतां येईल ताई ? "

रामलक्ष्मी म्हणाली, " तें कांहीं मला माहीत नाहीं भाई. माझा एवढाच विश्वास आहे—माझ्यासारखी भाग्यवान् मीच–माझ्यासारखीला देव कधीं संकटांत टाकील का ? "

स्तब्धपणें आनंदानें क्षणभर तिच्याकडे पाहिलं—आणि नंतर दुसराच विषय काढला.

या मधल्या मुदतींत घराचं खरेदीपत्र वगैरे झालं. दुरुस्तीच्या कामाला सुरवात झाली. विटा, लाकडं, चुना, खिडक्या, दरवाजे, वगैरे सामानाच्या राशी पडल्या. राजलक्ष्मीनं जुनं घर नवं बनवून टाकायचा बेत केला होता.

त्या दिवशीं दुपारीं आनंद म्हणाला, " चला दादा, जरा फिरून येऊं. "

मी बाहेर जावं म्हटलं, कीं अलिकडे राजलक्ष्मी नाराज होत असे. ती म्हणाली, " भटकत गेलांत म्हणजे परत येईपर्यंत रात्र होईल आनंद. थंडी बाधेल ना ? "

आनंद म्हणाला, " ताई, उकाड्यानं लोक अर्धमेले व्हायला आले आहेत. आहे कुठं थंडी ? "

आज माझी प्रकृति एकंदरींत ठीकशी नव्हती. मी म्हटलं, " थंडीची भीति नाहीं खरी. पण आज बाहेर पडावं असं कांहीं मला वाटत नाहीं आनंद. "

आनंद म्हणाला, " हा आळस बरं. संध्याकाळीं घरीं बसून राहिलं, कीं मग बाहेर जावंसं वाटत नाहीं. चला, निघा पाहूं बाहेर. "

त्याचं समाधान करण्याच्या उद्देशानं राजलक्ष्मी म्हणाली, " त्यापेक्षां आधीं माझं एक काम कर आनंद. परवां क्षितीशनं मला एक सुंदर हार्मोनियम आणून दिलाय. अजून तो वाजवून बघितला नाहीं. मी एक-दोन भजनं म्हणतें. तुम्ही दोघं बसून ऐका—संध्याकाळ सार्थकीं लागेल. " असं म्हणून तिनं रतनला पेटी आणायला सांगितली.

आश्चर्यचकित होऊन आनंद म्हणाला, " भजन म्हणजे गाणं वाटतं ताई ?"

राजलक्ष्मीनं मानेनं होकार दिला.

" ही विद्यासुद्धां आहे वाटतं ताईजवळ ? "

" आपली थोडीबहुत ! " मला उद्देशून ती म्हणाली, " लहानपणीं यांनींच पहिला धडा दिला मला. "

आनंद खूष होऊन म्हणाला, " रंगचोर आंब्यासारखे दिसताहेत आमचे दादा. आंत पिकला आहे कीं हिरवा आहे तें बाहेरून कळत नाहीं. "

त्याचं हें उदाहरण ऐकून राजलक्ष्मी हंसूं लागली. पण मी सरळपणें तिच्या सारखाच हंसलों नाहीं. आनंदला कांहीं कळायचं नाहीं, मी नाहीं म्हटलं तर तो ' उस्तादी विनय.' समजून तो उगीच मला त्रास देऊं लागेल—कदाचित् शेवटीं

रागावूनही बसेल ! पुत्रशोकातुर धृतराष्ट्राच्या विलापाचं दुर्योधनाचं तें गाणं मी म्हणत असें खरा पण तसलं गाणं कांही राजलक्ष्मीच्या गाण्यापुढं म्हणायचं ?

हा हार्मोनियम आणल्यावर पहिल्यानं देवाचीं एकदोन प्रचलित पदं म्हणून राजलक्ष्मीनं वैष्णव पदावलीला आरंभ केला. ती ऐकतांच मला असं वाटलं, कीं मुरारीपुरच्या आखाडयांत झालेलं गाणं यापुढं कांहींच नाहीं.

आनंद अगदीं वेडा होऊन गेला होता. मोठ्या आदरानं मला उद्देशून त्यानं तिला विचारलं, " हें यांनींच शिकवलं का तुला ताई ? "

" साऱ्याच विद्या कुणी एकाच माणसापासून शिकत नसतं. "

" तें खरं आहे ! " तो माझ्याकडे वळून म्हणाला, " दादा, आतां एकदां तुमची बैठक होऊन जाऊं दे. ताई थकली आहे वाटतं ? "

" नाहीं रे बाबा, माझी प्रकृति बरी नाहीं. "

" प्रकृतीचं मी पाहून घेतों, अतिथीचं मागणं नाहीं का द्यायचं ? "

" नाईलाज आहे. फारच विघडली आहे प्रकृती. "

राजलक्ष्मी गंभीरपणा कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत होती पण शेवटीं हंसण्याची उकळी बाहेर फुटून ती हंसता हंसता कोलमडून पडली.

आतां कुठं आनंदला कल्पना आली. तो म्हणाला, " तर मग आतां सांग, कुणाकडे ही विद्या शिकलीस ताई ? "

मी म्हटलं, " पैसे घेऊन जे विद्यादान करतात त्यांच्याकडे. माझ्याकडे नव्हे खास. असल्या विद्येच्या सांवलीला सुद्धां मी कधीं नव्हतों. "

क्षणभर उगीच राहून आनंद म्हणाला, " मलाही थोडं थोडं येतं ताई; पण शिकायची संधी मिळाली नाहीं. आतां जमलं तर तुझा गंडा बांधून एकदां हें शिक्षण पुरं करीन. पण इतक्यांत कां थांबलीस ? आणखी नाहीं का ऐकवणार ? "

राजलक्ष्मी म्हणाली, " आतां फुरसत नाहीं भाई. तुझ्या जेवणाच्या तयारीला लागलं पाहिजे ना ?

एक सुस्कारा सोडून आनंद म्हणाला, " तें मला माहित आहे. ज्याच्या खांद्यावर संसाराचा भार असतो त्याला वेळ मिळणं मुष्कील. मी वयानं लहान आहें—तुझाच धाकटा भाऊ. तूं मला शिकवायचं नाहीं तर कुणी ? अपरिचित ठिकाणीं जावं लागतं, तिथं वेळ जात नाहीं, अशा वेळीं एवढं मला शिकवलंस तर त्याचा उपयोग होईल. तेवढीच आठवण राहील माझ्याकडे. "

राजलक्ष्मी वात्सल्यपूर्णतेनं म्हणाली, " तूं डॉक्टर आहेस—हे तुझे दादा आजारी असतात. तिकडे विदेशांत यांच्यावर जरा नजर ठेव. मी मला जेवढं साधेल तेवढं तुला मोठ्या आनंदानं शिकवीन. "

" या दादाची काळजी करीत बसण्यापलिकडे तुलाः दुसरा धंदाच नाहीं का ताई ? "

राजलक्ष्मी उगीच राहिली. मला उद्देशून आनंद म्हणाला, " दादासारखं भाग्य माणसाला क्वचितच लाभतं ! "

मी त्याचं उत्तर दिलं. मी म्हटलं, " असला निरुद्योगी माणूस कधीं कुठं दिसला होता का आनंद ? देव दुबळ्यांची काळजी घेतो. त्याच्या होडीचं सुकाणूं कुणातरी बलवानाच्या हातीं देतो. नाहीं तर त्याची होडी कुठंतरी वाहून जायची —घाटाला लागणं अशक्य होऊन बसायचं. जगाच्या व्यवहाराची अशी ही तोंडमिळवणी करून ठेवली आहे भैय्या ! एकदां नीट पहा म्हणजे तुला प्रचिती येईल. "

कांही वेळ उगीच बसून राजलक्ष्मी निघून गेली. फार कामं होती ना तिला ?

याच सुमाराला घराच्या दुरुस्तीचं काम सुरू झालं. घरांतील चीजवस्त एका खोलींत बंद करून ठेवून राजलक्ष्मी निघण्याच्या तयारीला लागली. घर राखण्याचा भार आतां तुलसीदासावर राहिला.

जायच्या दिवशीं राजलक्ष्मीनं माझ्या हातीं एक पोस्टकार्ड दिलं आणि म्हटलं, " माझ्या चार ताव पत्राचं हें उत्तर बरं. वाचून पहा. " असं म्हणून ती निघून गेली.

बायकी अक्षरांत लिहिलेल्या तीनचार ओळी होत्या. कमललतेनं लिहिलं होतंः—" मी खुशाल आहें ताई. ज्याच्या सेवेला मी वाहून घेतलं आहे तोच माझ्या बऱ्याची काळजी वाहायला समर्थ आहे. त्याच्याच कृपेनं तुम्हां सर्वांचं कुशल असो. बड्या गोसाईजींनी आनंदमयीला आशिर्वाद सांगितले आहेत. इति—

श्रीराधाकृष्ण चरणाश्रिता, कमललता. "

तिनं माझ्या नांवाचा उल्लेखसुद्धां केला नव्हता. पण या चार ओळीआड किती गोष्टी सांठवल्या होत्या !

कुठं तरी एकादा अश्रूचा डाग दिसेल म्हणून मी निरखून पाहिलं. पण कुठंच कांहीं दिसलं नाहीं.

पत्र हातीं घेऊन मी मुकाट्यानं बसून राहिलों. खिडकीबाहेर डोकावून पाहिलं,

शेजारच्या घराच्या जवळ असलेल्या माडाच्या पातींमधून सूर्याच्या प्रखर किरणांनीं तापलेल्या निळ्या आकाशाचा कांहीं भाग दिसत होता. पहातां पहातां तिथं एकदम दोन चेहरे वहावत आलेले दिसले. एक माझ्या राजलक्ष्मीचा—कल्याणाची मूर्तिमंत प्रतिमा! दुसरा कमललतेचा—अस्पष्ट—अंधुक—जशी कांहीं स्वप्नांत दिसलेली छबी!

रतननं येऊन माझा ध्यानभंग केला. तो म्हणाला, "स्नानाची वेळ झाली बाबू. बाई ओरडताहेत!"

स्नानाची वेळ टाळायला सुद्धां सवड नाहीं.

पुन्हां एकदां सारी मंडळी गंगामाटीला येऊन पोंचलों. त्यावेळीं आनंद आला होता तो न बोलावतां—आतां तो आमंत्रित पाहुणा होता.

घराजवळ ही गर्दी झाली होती. ओळखी अनोळखी कितीतरी लोक आम्हांला भेटायला आले होते. प्रत्येक जण आमची खुशाली विचारीत होता. प्रत्येकाचा चेहरा आनंदानं फुललेला दिसत होता.

राजलक्ष्मीनं कुशारीबाईना नमस्कार केला. सुनंदा सैंपाकघरांत गुंतली होती, तिनंही बाहेर येऊन आम्हां उभयतांना प्रणाम केला. ती म्हणाली, "दादा, आपली प्रकृती तितकीशी चांगली दिसत नाहीं?"

राजलक्ष्मी म्हणाली, "प्रकृती चांगली होती कधीं? मला तरी कधीं दिसली नाहीं. आतां तुमच्या कृपेनं प्रकृती चांगली व्हावी म्हणून इथं तुमच्याजवळ घेऊन आलें आहे."

पूर्वीं इथं असतांनाच्या माझ्या आजारीपणाची हकिकत कुशारीबाईला आठवली असावी. वात्सल्यपूर्णतेनं आश्वासन देऊन ती म्हणाली, "कांहीं काळजी करूं नकोस. या गांवच्या हवापाण्यानं दोन दिवसांत यांची प्रकृती निकोप होईल."

मला असं काय झालं होतं आणि कां प्रत्येकाला माझी एवढी काळजी वाटत होती, हेंच मला कळेना.

यानंतर निरनिराळीं कामं मोठ्या धामधुमींत सुरू झालीं. पोडामाटी गांव विकत घ्यायच्या दरदामाच्या उठाठेवीपासून सुरवात करून मुलांची शाळा स्थापन करण्यासाठीं जागा ठरवण्यापर्यंत प्रत्येक काम मोठ्या उत्साहानं सुरू झालं.

उत्साह वाटत नव्हता काय तो माझ्या अंतःकरणाला. कदाचित् हा माझा स्वभावच असेल—कदाचित् दुसरंही कांहीं कारण असेल—माझ्या नजरेच्या

टापूंत न येणारं, हळुहळू माझ्या; साऱ्या प्राणशक्तीचा मूळांतून उच्छेद करणारं असं मला न समजणारं कांहीं कारण असेल.

पण माझ्या या उदासीनतेचं कुणालाच आश्चर्य वाटत नव्हतं म्हणून बरं होतं. कुणीच माझ्यापासून कशाचीही अपेक्षा करीत नव्हतं. मी दुबळा—मी आजारी—मी आज आहें उद्यां नाहीं! तरी पण मला कसलाच आजार नव्हता—चांगला खातपीत होतों. आनंद मधून मधून आपल्या डॉक्टरीच्या जोरावर मला वठणीला आणायचा घाट घाली तेव्हां राजलक्ष्मी मोठ्या प्रेमानं त्याला अडवून म्हणे, "यांच्यावर जबरदस्ती करण्यांत अर्थ नाहीं भैय्या. एक करतांना एक व्हायचं. शेवटीं मरावं लागायचं आहे मलाच."

आनंद म्हणे, "हें तुमचं असंच चाललं तर रोग वाढेल मात्र—कमी व्हायचा नाहीं. मी तुला सावध करून ठेवतों आहें ताई."

राजलक्ष्मीला तें त्याचं म्हणणं पटे. ती म्हणे, "तें मला माहित आहे आनंद. जन्मापासून देवानं हेंच माझ्या कपाळीं लिहून ठेवलं आहे."

यापुढं कोण काय बोलणार?

केव्हां पुस्तकं वाचीत बसत असें, केव्हां केव्हां स्वतःचं हें चरित्र लिहीत बसत असें, केव्हां त्या निर्जन माळावर एकटाच फिरत भटकत असें,—असे दिवस चालले होते.

कोणतंही काम करायची उत्सुकता माझ्या ठिकाणीं नाहीं एवढं मला कळून चुकलं होतं. झगडा करायचा, झटापट करायची, जगांतल्या दहा माणसांच्या मानगुटीला बसायचं, मला जमतही नव्हतं आणि रुचतही नव्हतं. सहज जें कांहीं होईल तेवढंच मला पुरेसं वाटे. घरदार, पैसारुका, विषयआशय, मान-संभ्रम हीं सारीं मला छायामय वाटत. दुसरा कुणि उद्योग करतो आहे असं दिसलं म्हणजे आपल्या निरुद्योगीपणाची जाणीव होऊन कर्तव्यबुद्धि जर जागी होऊं लागली तर तितक्यांतच माझे डोळे आपोआप मिटत आणि मी पाहातां पाहातां निष्क्रिय होऊन बसत असें—शेंकडों धक्क्यांनींसुद्धां हालचाल करावी असं वाटत नसे.

असं सुन्न झालेलं माझं मन एकाच गुणगुणीनं जागं होऊन उठे—मुरारी-पुरच्या दहा दिवसांची ती गोड आठवण! असं वाटे, कमललता मोठ्या प्रेमानं माझ्या कानांशी बोलते आहे, "नवे गोसाई एवढं हें करा पाहूं!—हें काय? सारं बिघडवून टाकलंत ना?—कुठली झक मारली न् हें तुम्हांला सांगितलं—

उठा आतां आंघोळ करा—ही मेली पद्मा गेली तरी कुठं ? आधण ठेव म्हणावं, चहाची वेळ झाली ना तुमची ?"

त्या दिवशीं चहाचं भांडं तिनं स्वतः विसळून ठेवलं. धुतांना मी फोडलं तर! आज त्या पेल्याची तिथं कांहीं जरूरी नाहीं—कदाचित् तिनं तो जपून ठेवला असेल—केव्हांतरी पुन्हां असाच उपयोगी पडेल असं तिला वाटत असेल.

तिथून पळून जायची तिला हुटहुटी लागली होती. कां कोण जाणे! पण मुरारीपुरच्या आश्रमांत रहायचे तिचे दिवस आतां भरत आले आहेत असं मात्र मला निश्चित वाटत होतं. कदाचित् तीच बातमी अचानक कानीं यायची. निराश्रित, असहाय, रस्तोरस्तीं भिक्षा मागत तिला फिरावं लागेल या कल्पनेनं माझे डोळे ओले होत. अशा वेळीं मन अस्वस्थ झालं कीं समाधानासाठीं राजलक्ष्मीकडे माझी नजर वळे. सर्वांच्या कल्याणासाठीं ती सारखी कांहीं ना कांहीं उद्योग करीत होती—तिच्या दोन्हीं हाताच्या दहा बोटांतून कल्याणाच्या धारा जशा कांहीं धो धो कोसळत होत्या. तिच्या सुप्रसन्न चेहऱ्यावर शांति आणि समाधान यांची स्निग्ध छाया पसरली होती. हृदयाची यमुना नदी करुणेनं, ममतेनं, दुथडी भरून वाहून चालली होती. निरवच्छिन्न प्रेमाच्या सर्वव्यापी अधिकारानं तिनं माझ्या हृदयांत जें सिंहासन प्रतिष्ठित केलं होतं तें अतुलनीय होतं यांत शंकाच नाहीं.

विदुषी सुनंदेच्या अनिवार प्रभावामुळं क्षणभर तिचं मन चळलं होतं. आतां अनुभवाच्या चटक्यानं जागी होऊन ती पुन्हां आपली जागा काबीज करून बसली होती. एक गोष्ट ती आजसुद्धां हळूच माझ्या कानांत सांगे, "तुम्हीं कांहीं कमी नाहीं हो! ज्या वाटेनं तुम्हीं गेलांत त्याच वाटेनं माझं सर्वस्व माझ्या डोळ्यांदेखत निसटून जाईल हें कुठं कळलं होतं मला ? अंः!—केवढा भयंकर प्रसंग तो! आतां आठवण झाली कीं वाटतं, कीं ते दिवस मी घालवले तरी कसे ? श्वास कोंडून मेलें नाहीं कशी ?"

याला मी तरी काय उत्तर देणार ? नुसता मुकाट्यानं तिच्या तोंडाकडे पहात रहात होतों.

आतां माझ्या बाबतींत झालेली ही एवढी ढिलाई तिला सहन होत नसे. हजारों कामांत ती गुंतलेली असली तरी चट्कन केव्हां तरी माझ्या नकळत माझ्यावर नजर टाकून जाई. केव्हां अचानक येऊन माझ्याजवळ बसे. हातचं पुस्तक दूर

सारी आणि म्हणे, " डोळे झांकून जरा आडवे पडा ना. मी माथ्यावरून हात फिरवतें. असं सारखं वाचीत बसलं तर डोळे बिघडतील ना ? "

आनंद बाहेर येऊन तिथूनच म्हणे, " एक गोष्ट विचारून घ्यायची आहे— बाहेर येणं होईल का ? "

राजलक्ष्मी म्हणे, " बाहेर कां, तुला कुठं इथं यायची बंदी आहे आनंद ? " खोलींत आला कीं आनंद आश्चर्यचकित होई आणि म्हणे, " या अवेळीं यांना थोपटून झोंपी जायला लावते आहेस का ताई ? "

राजलक्ष्मी हंसून उत्तर देई, " त्यांत तुझं काय बिघडलं ? झोंपी गेले नाहींत तरी कांहीं ते तुझ्या शाळेंतलीं वासरं हाकायला यायचे नाहींत. "

" यांना तूं बिघडवून टाकते आहेस बरं ताई. "

नाहीं तर स्वतःच बिघडले असते कीं ! कांहीं सुद्धां काम यांच्या हातून झालं नसतं. "

" तुम्हां दोघांनाही केव्हां तरी वेड लागणार खास ? " असं म्हणून आनंद बाहेर निघून जाई.—

शाळा उभारायच्या कामगिरीमुळं आनंदाला श्वास घ्यायला सुद्धां फुरसत नव्हती. इस्टेट खरेदी करण्याच्या उठाठेवीमुळं राजलक्ष्मी घामाघुम होत होती. अशावेळीं कलकत्त्याच्या सगळ्या मुक्कामांतून फिरत मागंपुढं सारखे पोस्टाचे छाप बसलेलं नवीनचं एक भयंकर पत्र येऊन माझ्या हातीं पडलं—गोहर आसन्न मरण स्थितींत होता. केवळ माझ्या शेवटच्या भेटीची वाट पहात जीव धरून होता.

या बातमीनं माझ्या हृदयाला बाण बसला. बहिणीच्या घराकडून तो केव्हां आला तें कळलं नाहीं. त्याचं दुखणं या थराला गेलं हेंही कांहीं कळलं नाहीं— कळायचा मी प्रयत्न तरी कुठं केला होता ?—अन् आतां एकदम आली ही शेवटची बातमी.

पत्राची तारीख सहा दिवसांपूर्वीची होती. अजून जिवंत आहे कीं नाहीं कोण जाणे ? तार करून उत्तर मिळवायची सोय या गांवींही नव्हती अन् त्या गांवींही नव्हती. पत्र वाचतांच राजलक्ष्मी म्हणाली, " मग तुम्हांला गेलं पाहिजे तर. "

" हो. "

" चला. मीही येतें बरोबर. "

" तें कसं जमायचं ? आधीं तिथंच हें संकट—त्यांत तूं तिथं करणार काय ? "

प्रसंग मोठा बिकट होता हें तिलाही कळत होतं. अशा वेळीं तिथं जाणं गैरसोईचं आहे हेंही तिला पटत होतं. मुरारीपुरच्या आखाड्याची गोष्ट ती मुद्दाम बोलत नव्हती. ती म्हणाली, " कालपासून रतनला ताप येतो आहे. बरोबर जाणार कोण ? आनंदला विचारूं ? "

" छे ! छे ! तसल्या माणसाची सोबत मला नाहीं पटायची. "

" मग किसनला नेतां बरोबर ? "

" हो, चालेल. पण हवा कशाला कोण बरोबर ? "

" गेल्यावर रोज पत्र पाठवाल. "

" वेळ मिळाला तर पाठवीन. "

" नाहीं, तें चालायचं नाहीं. एक दिवस पत्र आलं नाहीं तर मी स्वतः येईन तिथं. मग तुम्हांला राग आला तरी चालेल. "

अर्थात मला कबुली द्यावी लागली. रोज पत्र पाठवण्याचं कबुल करून मी त्याच दिवशीं प्रवासाला निघालों. निघायच्या वेळीं राजलक्ष्मीचा चेहरा पांढराफटक पडला होता. एकदां डोळे पुसून तिनं मला अखेरचं म्हणून बजावलं, " प्रकृतीची हेळसांड करणार नाहीं ना ? "

" नाहीं—नाहीं—नाहीं ! "

" पुन्हां यायला एक दिवससुद्धां उशीर लावायचा नाहीं. आधीं कबूल करा."

" हो, हो, कबूल. "

शेवटीं एकदां आमची बैलगाडी रेल्वेस्टेशनकडे जायला निघाली.

आषाढांतल्या एका अपरान्हकालीं गोहरच्या सदर दरवाजावर येऊन उभा राहिलों. माझी हांक ऐकतांच नवीन जो बाहेर आला तो एकदम माझ्या पायांवर कोसळून पडला. शेवटीं ज्या दत्ताला भीत होतों तेंच घडून आलं होतं.

एवढा ताकदवान लंबाचौडा–पुरुष पण मला पहातांच काळीज फाटून रडूं लागला.

गोहरची मूर्ति नजरेसमोर आली. जसा गंभीर तसाच मोठा दिलदार अन् तसाच सच्चा. गोहरला आई नव्हती, बहीण नव्हती, बायको नव्हती, मुलगी नव्हती. शेवटच्या घटकेला या एकलकोंड्या माणसाला आसवांची माळ गळी घालायला तिथं कुणीच नव्हतं. तरीही या साऱ्या जागा एकट्या नवीननं भरून काढल्या होत्या. त्यानं शेवटच्या घटकेला कोणतीच कमतरता पडूं दिली नव्हती.

मोठ्या इतमानानं त्याची शेवटची यात्रा नवीननं पार पाडली.

कांहीं वेळानं नवीन उठून बसला तेव्हां मी विचारलं, " नवीन, गोहर केव्हां गेला ? "

" परवांच्या दिवशीं. काल सकाळींच आम्ही त्याला माती देऊन आलों."

" कुठं माती दिली ? "

" नदीच्या किनाऱ्यावर—आम्बराईत—सांगितलं होतं."

नवीन सांगूं लागला, " मागें बहिणीच्या घराकडून आले तेच ताप घेऊन आले—शेवटपर्यंत तो ताप निघाला नाहीं.

" पण औषधपाण्याची व्यवस्था झाली का ? "

" इथं होण्याजोगं होतं तेवढं सारं कांहीं केलं. पण सारं फुकट गेलं. बाबूंना स्वतःलाच कळून चुकलं होतं."

मी विचारलं, " आखाड्यांतले बडे गोसावी येत होते का ? "

नवीन म्हणाला, " मधून मधून येत होते. नवद्वीपहून त्यांचे गुरुजी आले होते तेव्हां रोज यायला त्यांना सवड होत नव्हती."

आणखी एका माणसाबद्दल विचारायला मला संकोच वाटूं लागला. तरीही मनाचा निश्चय करून मी विचारलं, " तिथून दुसरं कोणी येत नव्हतं का नवीन ? "

नवीन म्हणाला, " हो. एकटी कमललताच."

" ती केव्हां आली होती ? "

नवीन म्हणाला, " रोज येत होती. शेवटचे तीन दिवस तिनं कांहीं खाल्लं नाहीं, झोंप घेतली नाहीं, बाबूंचा बिछाना सोडून एक घडीभर सुद्धां दूर झाली नाहीं."

मी आणखी कांहीं विचारलं नाहीं. उगीच बसून राहिलों.

नवीन म्हणाला, " आतां कुठं जाणार ? आखाड्यावर ? "

" हो. "

" जरा थांबा. " असं म्हणून तो आंत गेला आणि एक टिनची पेटी आणून माझ्याकडे देऊन म्हणाला, " ही पेटी तुमच्याकडे द्यायला सांगितलीय त्यांनीं."

यांत काय आहे नवीन ? "

" उघडून पहा—" असं म्हणून त्यानें माझ्या हातीं चावी दिली. उघडून

पहातों तों आंत दोरीनं बांधलेल्या त्याच्या कवितेच्या चोपड्या होत्या. वर लिहिलं होतं, "श्रीकांत, रामायण पूर्ण करणं शेवटीं घडलं नाहीं. या चोपड्या बड्या गोसाईकडे द्या. त्यांनीं त्या मठांत ठेवाव्या. नष्ट करूं नयेत."

लाल शालूनं बांधलेली एक छोटीशी मोटली होती. उघडून पाहिलं, तों त्यांत वेगवेगळ्या रकमेच्या बऱ्याचशा नोटा होत्या. शिवाय माझ्या नांवाचं एक पत्र होतं. त्यांत लिहिलं होतं, "भाई श्रीकांत, मी आतां जगेनसं वाटत नाहीं. तुझी भेट होईल कीं नाहीं कोण जाणे. ही पेटी नवीनच्या हातीं देऊन ठेवली आहे. ती तूं ताब्यांत घे. हे पैसे तुझ्या स्वाधीन केले आहेत. कमललतेच्या कामीं लागतील असं वाटलं तर तिला दे. तिनं घेतले नाहींत तर तुझ्या मर्जीप्रमाणं त्यांची वासलात लाव. अल्ला तुझं भलं करो!—गोहर."

दानाचा अभिमान नाहीं—काकुळती-विनवणी नाहीं. मरण जवळ आलं आहे असं पाहून आपल्या शाळासोबत्याला उद्देशून त्यानं आपला शेवटचा निरोप सांगितला होता. भीति नाहीं, क्षोभ नाहीं, किंवा मृत्यु जवळ आलेला पाहून लागलेली हायहायही नाहीं.

तो कवि होता—मुसलमान फकिरवंशाचं रक्त त्याच्या नसांत सळसळत होतं—म्हणूनच शांत मनानं त्यानं आपलं हें शेवटचं लिखाण आपल्या बालमित्राला उद्देशून लिहिलं होतं.

हा वेळपर्यंत माझ्या डोळ्यांत आसवं आलीं नव्हतीं पण आतां मात्र तीं मला आवरतां येईनात. डोळ्याच्या कोपऱ्यांतून मोठमोठे अश्रुबिंदु पाझरून वाहूं लागले.

आषाढांतला मोठा दिवस त्यावेळीं मावळत आला होता. पश्चिम दिशा व्यापून काळ्या मेघाचा थर वर उठत होता. त्यांतल्याच एका लहानशा फटींतून अस्ताला जाणाऱ्या सूर्याचे किरण भिंतीजवळच्या वाळत आलेल्या जांभाच्या झाडावर पडले होते. याच झाडांच्या फांद्यावर गोहरच्या माधवी आणि मालतीच्या वेली पसरल्या होत्या.

त्या दिवशीं नुसत्या कळ्या होत्या. त्यांतल्या कांहीं काढून मला द्याव्या म्हणून तो म्हणत होता. पण काठमुंग्यांच्या भयानं त्याला त्या देतां आल्या नाहींत. आज त्या वेली झुपक्या झुपक्यांनीं फुलून निघाल्या होत्या. किती फुलं खालीं पडलीं होतीं तशींच कितीतरी वाऱ्यानं चौफेर उधळलीं होतीं. बालमित्राला शेवटची अंजली वहाण्यासाठीं त्यांतलीं कांहीं फुलं मी टिपून घेतलीं.

नवीन म्हणाला, "चला आतां—मी आपल्याला पोहोंचवून येतों."

मी म्हटलं, "नवीन, बाहेरची खोली एकदां उघडून दाखीव पाहूं."

नवीननं खोली उघडून दिली, चौकीच्या एका बाजूला बिछान्याची वळकटी आजही तशीच गुंडाळलेली होती. एक छोटी पेन्सिल, कांही कागदाचे कापलेले तुकडे पडले होते. बंदीवासांतल्या सीतेच्या दुःखाच्या कहाणीवर कविता रचायला गोहरनं सुरवात केल्याचं मी ऐकलं होतं. याच खोलींत मी कितीवेळ आलों होतों, किती वेळ जेवलों होतों, झोपलों होतों, दंगा केला होता. तें सारं ज्यांनीं ज्यांनीं हंसण्यावारी नेलं होतं त्यांतलं आतां कोणच हयात नव्हतं. येण्या-जाण्याची कल्पना आतां संपली, असा विचार करून मी बाहेर आलों.

अशीच एक नोटांची छोटी पुरचुंडी त्यानं नवीनच्या मुलाच्या हातीं दिल्याचं नवीनच्या तोंडून मला कळलं. शिल्लक राहिलेली कांहीं इस्टेट आतां त्याच्या मामेभाऊ आणि बहिणी यांजकडे जाणार होती आणि कांहीं भाग त्याच्या बापानं बांधलेल्या एका मशिदीच्या कामीं लागणार होता.

आश्रमांत येऊन पाहिलं, तों तिथं माणसांची गर्दी जमली होती. गुरुजीं-बरोबर त्यांचे बरेचसे शिष्य आणि शिष्यिणी आल्या होत्या. एकंदरींत त्यांनीं तिथं आपला जम चांगलाच बसवला होता. ते लोक लवकर जातील असं लक्षण दिसत नव्हतं. वैष्णवसेवा वगैरे रोजचे प्रकार चालत असावे असा मी अंदाज केला.

मला पहातांच द्वारकादासजींनीं माझं स्वागत केलं. मी कां आलों याची त्यांना कल्पना होती. गोहरबद्दल त्यांनीं दुःख प्रकट केलं खरं, पण त्यांच्या मुद्रेवर अशी कांहीं चमत्कारीक आणि बावरल्यासारखी छाया दिसत होती, कीं ती पाहून मी चकीत झालों. एवढी वैष्णव मंडळी आलेली, त्यांच्या बडदास्ती-मुळं त्यांना त्रास झालेला असावा असा मी अंदाज केला. या एकंदर गडबडीमुळं स्वस्थपणें बोलायला त्यांना फुरसत नव्हती.

मी आल्याचं कळतांच पद्मा आली. पण आज ती पूर्वीसारखी हंसतमुख दिसत नव्हती. तिला संकोच वाटत होता. कशीबशी भेट घेऊन एकदां निघून जावं असं तिला वाटत असावं.

मी विचारलं, "तुझी कमललताताई यावेळीं मोठ्या गडबडींत असेल, नाहीं पद्मा?"

"नाहीं. बोलवूं का तिला?" असं म्हणून ती निघून गेली

एकंदरींत वातावरण फार विलक्षण झाल्यासारखं दिसत होतं. जिकडे तिकडे प्रत्येकजण चोरासारखा वावरत असल्यामुळं माझा मीच साशंक झालों.

थोड्या वेळानं कमललता आली आणि मला नमस्कार करून म्हणाली, " चला गोसाई, माझ्या खोलींत जाऊन बसूं. "

बिछाना वगैरे बाकीचं सामान स्टेशनवर ठेवून मी नुसती माझी बॅग घेऊन आलों होतों. शिवाय ती गोहरची पेटीही नोकराच्या माथीं होती. कमललतेच्या खोलींत येतांच ती पेटी तिच्या स्वाधीन करून मी म्हटलं, " पेटी जरा काळजीपूर्वक ठेव. आंत बरीच मोठी रक्कम आहे. "

कमललता म्हणाली, " मला माहीत आहे. " खाटेच्या खालीं पेटी लोटून ठेवून तिनं मला विचारलं, " अजून तुम्हीं चहा घेतला नाहीं वाटतं ? "

" नाहीं. "

" केव्हां आलांत ? "

" दुपारीं. "

" तर मग थांबा. चहा तयार करून आणतें. " असं म्हणून नोकराला बरोबर घेऊन ती निघून गेली.

हातपाय धुवायला पाणी देऊन पद्मा तशीच निघून गेली. थांबली नाहीं.

पुन्हां मला वाटलं, हें आहे काय ?

थोडया वेळानं कमललता चहा घेऊन आली. बरोबर देवाचा प्रसाद म्हणून कांहीं फळंमुळं आणि मिठाईही होती. मी केव्हांचा उपाशीं होतों. लगेच फराळाला बसलों.

तितक्यांत देवाच्या संध्याकाळच्या आरतीच्या वेळचे शंख घंटा तास वाजूं लागले. मी विचारलं, " हें काय ? तूं कशी गेली नाहींस ? "

" नाहीं—मला बंदी आहे. "

" बंदी ? तुला ? म्हणजे ? "

म्लानपणें हंसून कमललता म्हणाली, " बंदी म्हणजे बंदी. अर्थात् देवघरांत पाऊल टाकायला मला बंदी आहे. "

माझं खाण्यावरचं लक्ष उडालं. मी विचारलं, " बंदी कुणी केली ? "

" बड्या गोसाव्यांच्या गुरुजींनीं—अन् त्यांच्या बरोबर जे जे आले आहेत त्यांनीं त्यांनीं. "

" काय म्हणणं आहे त्यांचं ? "

" ते म्हणतात, मी अपवित्र आहें, माझ्या सेवेनं देवाला विटाळ होईल. "

" तूं अपवित्र ? " विजेच्या झटक्यासारखी एकदम एक कल्पना आली. मी म्हटलं, " गोहरच्या बाबतींत हा आरोप आहे का ? "

" होय. तोच, "

मला कांहीं माहीत नव्हतं खरं, पण मी निःसंशय वृत्तीनं एकदम उद्गारलों. " खोटं—साफ खोटं. शक्य नाहीं. "

" काय शक्य नाहीं गोसाई ? "

" मला कांहीं माहीत नाहीं कमललता, पण हें निव्वळ कुभांड आहे. मृत्यू-शय्येवर पडलेल्या मित्राच्या निस्सीम सेवेचं हेंच का बक्षिस माणसानं द्यावं ? "

तिचे डोळे पाण्यानं भरून आले. ती म्हणाली, " आतां मी निश्चित झालें. अंतर्यामी देवाला सारं कांहीं माहीत आहे—त्याचं भय नव्हतं मला. शंका वाटत होती तुमच्याबद्दल. आज मी अगदीं निश्चित झालें गोसाई. "

" या एवढ्या प्रपंचांत तुला भीति वाटत होती काय ती माझ्याबद्दलच ! दुसऱ्या कुणाबद्दल नाहीं ? "

" नाही. कुणाबद्दलही नाहीं. फक्त तुमची काळजी होती मला. "

कितीतरी वेळ आम्ही दोघेंही स्तब्ध बसून राहिलों. शेवटीं मी विचारलं, " बडे गोसाई काय म्हणतात ? "

कमललता म्हणाली, " त्यांचा निरुपाय आहे. तसं केलं नाहीं तर कुठलाच वैष्णव यापुढं या मठांत येणार नाहीं. "

थोड्या वेळानं ती म्हणाली, " आतां इथं रहाणं शक्य नाहीं. केव्हां तरी मला जावं लागणार हें मला माहीतच होतं. पण अशा रीतीनं जावं लागेल असं मात्र वाटलं नव्हतं गोसाई. मन मागंपुढं होत होतं तें या पद्मेसाठीं. विचारी पोर—तिला कुणाचाच कुठं आधार नाहीं. बड्या गोसायांनीं नवद्वीपां-तून तिला कुठून तरी आणली. ताई निघून गेली कीं ती सारखी रडतां भुई थोडी करील. जमलं तर तिच्याकडे जरा नजर ठेवा. तिला इथं रहायचं नसलं तर माझा निरोप सांगा राजूला, अन् तिला तिच्या हवालीं करा. तिला जें योग्य वाटेल तें ती करील. "

आणखी कांहीं वेळ मुकाट्यानं बसण्यांत गेला. मी विचारलं, " या पैशाचं

काय करायचं ? घेणार आहेस ना तूं ? ”

“ नाहीं. मी भिकारीण, हे पैसे घेऊन मी काय करूं ? ”

“ कोणत्या ना कोणत्या कामीं उपयोगी पडतील—”

आतां मात्र कमललता हंसली आणि म्हणाली, “ खूप पैसा होता माझ्यापाशीं हो. पण तो कसल्या कामीं आला ? पण तशीच कांहीं जरूरी उत्पन्न झाली तर तुम्हीं आहांच कीं. जरूर लागली तर तुमच्याकडून मागून घेईन. परक्याचा पैसा मी कशाला घेऊं ? ”

तिला काय उत्तर द्यावें तें मला सुचेना. नुसता तिच्या तोंडाकडे पहात राहिलों.

ती पुन्हां म्हणाली, “ नाहीं गोसाई पैसा नको आहे मला. ज्याच्या पदकमलावर मी आत्मार्पण केलं आहे तो मला अंतर देणार नाहीं. जिथं कुठं जाईन तिथं तोच माझी गरज भागवील. समजलं ? कांहीं काळजी करूं नका माझी. ”

पद्मा खोलींत येऊन म्हणाली, “ नव्या गोसाव्यांना प्रसाद या खोलींत आणूं का ताई ? ”

“ हो, इथंच घेऊन ये. नोकराला दिलास ? ”

“ हो दिला. ”

तरीही पद्मा जाईना. क्षणभर मागंपुढं करून ती म्हणाली, “ अन् तूं जेवणार नाहींस का ताई ? ”

“ जेवीन ग काळतोंडे, जेवीन. तूं आहेस ना इथं ? मग आतां ताईला जेवल्याशिवाय कसं रहातां येईल ? ”

पद्मा निघून गेली.

सकाळीं उठलों तेव्हां कमललता कुठं दिसली नाहीं. ती दुपारीं येईल असं पद्मा म्हणाली. सारा दिवस ती कुठं असे तें कोणालाच माहीत नव्हतं. तरी मला खात्री वाटेना. रात्रीचं भाषण आठवलं. कुठं तरी एकदम निघून जाईल, भेट होणार नाहीं, अशी भीति वाटूं लागली.

बडे गोसायाच्या खोलींत गेलों. चोपड्या त्यांच्या हवालीं करून म्हणालों, “ हें गोहरचं रामायण—हें या मठांत रहावं अशी त्याची शेवटची इच्छा होती.”

द्वारकादासजींनीं चोपड्या आपल्या हातीं घेतल्या आणि म्हटलं, “ठीक आहे नवे गोसाई. मठांतले बाकीचे ग्रंथ जिथं ठेवतों तिथंच हेही ठेवून देईन. ”

एक दोन मिनटं आम्ही उगीच बसलों होतों. नंतर मी म्हटलं, “कमललतेच्या

नांवाशीं याचा संबंध जोडतात, हें पटतं का तुम्हांला गोसाई ?"

वर माझ्याकडे पाहून द्वारकादास म्हणाले, "मला ? मुळींच नाहीं."

"पण तिला जायला भाग पाडतां आहांत ?"

"मलाही जावं लागणार गोसाई ! निरपराधी माणसाला दूर करून जर मी स्वतः इथं राहिलों तर मग हा पंथ स्वीकारायचा तरी कशाला ? कशाला देवाचं नांव तोंडानं घ्यायचं ?"

"तर मग तिला कां घालवून देतां ? तुम्ही मठाचे मुख्य अधिकारी आहांत —मग ठेवून घ्या तिला."

"गुरू ! गुरू ! गुरू !" असं म्हणून द्वारकादास मान खालीं घालून बसले. मला कळून चुकलं. गुरूच्या हुकमापुढं त्या बिचाऱ्याचं चालत नव्हतं.

"आज मी जातों आहें गोसाई." असं म्हणून मी जायला निघालों त्यावेळी त्यांनीं तोंड वर करून माझ्याकडे पाहिलं. त्यांच्या डोळयांतून आसवं वहात होतीं. दोन्ही हात वर उचलून त्यांनीं मला नमस्कार केला—प्रतिनमस्कार करून मीहि निघून आलों.

दुपारची संध्याकाळ झाली—संध्याकाळची रात्र झाली—तरी कमललतेचा पत्ता नव्हता. नवीनकडचा माणूस आला, तो मला स्टेशनवर घेऊन जाणार होता. बॅग माथीं घेऊन किसन जायला तयार झाला होता. आतां मुळींच अवधि नव्हता—पण कमललता आली नाहीं.

ती इतक्यांत येईल असं पद्मेला वाटत होतं. पण मला वाटलं, ती येणार नाहीं. शेवटीं माझा संशय खरा ठरला.

शेवटचा निरोप घेण्याचा प्रसंग टाळण्यासाठीं तिनं सकाळींच पळ काढला होता. दुसरं वस्त्रसुद्धां बरोबर घेतलं नव्हतं. आपण भिकारीण आहें असं काल ती म्हणाली, आज तिनं तें खरं करून दाखवलं.

मी जायला निघालें तेव्हां पद्मा रडूं लागली. माझा पत्ता मी तिला लिहून दिला आणि मी म्हटलं, "तुझ्या ताईनं सांगितलं आहे, कीं जेव्हां तुला गरज पडेल तेव्हां मला पत्र लिही. अगदीं मोकळया मनानं मला पत्र लिही पद्मा."

"पण मला चांगलंसं लिहितां येत नाहीं गोसाई."

"जसं लिहितां येईल तसं लिही. मी तें वाचून घेईन."

"ताई येईपर्यंत रहात नाहीं तुम्हीं ?"

" पुन्हां केव्हांतरी भेट होईल पद्मा, आतां मी जातों " असं म्हणून मी बाहेर निघालों.

# १४

येतांना रस्त्यावर अंधारांतसुद्धां माझे डोळे जिला धुंडाळीत होते तिची भेट झाली रेल्वे स्टेशनवर. लोकांच्या गर्दीपासून दूर एका बाजूला ती उभी राहिली होती. मला पहातांच ती जवळ आली आणि म्हणाली, " मला एक तिकीट काढून द्यायला हवं गोसाई."

" खरोखरच सर्वांना टाकून चाललीस तर—? "

" त्याखेरीज दुसरा उपायच नाहीं."

" जायचं जिवावर येत नाहीं तुझ्या कमललता ? "

" हें कशाला विचारतां गोसाई ? तुम्ही सारं कांहीं जाणतां.

" कुठं जाणार आहेस ? "

" वृंदावनला. पण इतक्या लांबचं तिकिट नको आहे मला—जवळच्याच कुठल्या तरी स्टेशनचं एक तिकिट काढून द्या. "

" म्हणजे तेवढंच माझं ऋण कमी ?—इथून सुरू व्हायची भिक्षा, ती शेवटच्या मुक्काम गांठीपर्यंत ? असंच ना ? "

" भिक्षा मागायला आज का सुरवात करतें आहें गोसाई ? यापूर्वी नव्हती का मागितली ? "

मी उगीच राहिलों. माझ्याकडे एकदां पाहून तिनं नजर फिरवली आणि म्हटलं, " द्या तर मग—वृंदावनचंच तिकिट काढून द्या. "

" चल तर, बरोबरच जाऊं ? "

" याच बाजूला जाणार आहां का तुम्हीं "

मी म्हटलं, " नाहीं. मुक्कामापर्यंत नव्हे, पण जोंपर्यंत जमेल तोंपर्यंत जाऊं. "

गाडी आली. दोघंही गाडींत बसलों. शेजारच्या बांकावर मी आपल्या हातांनीं तिला बिछाना घालून दिला.

कमललता अस्वस्थ होऊन म्हणाली, " हें काय चाललं आहे गोसाई ? "

" आजपर्यंत कुणासाठींही कधींच केलं नव्हतं तें ! जन्मभर आठवण रहावी म्हणून !—"

" खरोखरच का आठवण रहायला हवी ? "

" खरोखरच आठवण रहायला हवी कमललता ! तुझ्याखेरीज मात्र कुणाला कळतां नये. "

" पण मला दोष लागेल ना गोसाई ? "

" छे, मुळींच नाहीं. यांत कांहींच दोष नाहीं. तूं खुशाल बैस. "

कमललता बसली—संकोचानं एका बाजूला बसली. गाडी चालू झाली. किती गावं, किती नगरं, किती माळ एकामागून एक जात होते. जवळच बसून ती हळुहळू आपल्या जीवनाची कहाणी सांगूं लागली होती. रस्त्यावर भटकत असल्याची हकिकत, मथुरा, वृंदावन, गोवर्धन, राधाकुंड वगैरे ठिकाणीं केलेले मुक्काम, वेगवेगळया तीर्थयात्रा करीत शेवटीं द्वारकादासाच्या आश्रमांत मुरारीपुरला येऊन राहिल्याच्या हकीकती तिनं सांगितल्या.

मी जायला निघालों तेव्हां द्वारकादासचं झालेलं भाषण आठवलं. मी म्हटलं, " तुला माहित आहे कमललता, बडे गोसायांना तूं दोषी आहेस असं वाटत नाहीं ! "

" वाटत नाहीं ? "

" मुळींच नाहीं. मी जायला निघालों त्यावेळीं त्यांच्या डोळयाला पाणी आलं. ते म्हणाले, ' निर्दोषी माणसाला घालवून देवून मी जर इथं राहिलों तर कशाला देवाचं नांव घ्यायचं ?—कशाला ही दीक्षा स्वीकारायची ? " ते आतां मठांत रहाणार नाहींत कमललता. असला निष्पाप आणि मधुर आश्रम एकदम कोसळून पडणार खास. "

" नाहीं. ते जाणार नाहींत. देव खात्रीनं कांहीं तरी मार्ग दाखवील. "

" कधीं तुला बोलावणं आलं तर जाशील का तिकडे ? "

" नाहीं. "

" पश्चात्ताप होऊन त्यांनीं पुन्हां बोलावलं तरीसुद्धां ? "

" तरीसुद्धां नाहीं. "

थोडा वेळ स्वस्थ राहून विचार करून ती म्हणाली, " जाईन. पण एक तुम्ही सांगितलंत तर. दुसऱ्या कुणाचं नाहीं ऐकणार. "

" पण तुमची भेट होईल कुठं ? "

या प्रश्नाचं तिनं उत्तर दिलं नाहीं. ती उगीच बसून राहिली. पुन्हां कांहींच

न बोलतां किती तरी वेळ गेला. मी तिला हांक मारली पण उत्तर मिळालं नाहीं. पाहिलं, तों ती गाडीच्या एका कोंपऱ्यांत डोळे झांकून स्वस्थ बसली होती. साऱ्या दिवसाच्या श्रमानं तिला झोंप लागली असेल अशी कल्पना करून मी तिला जागी करायचा प्रयत्न केला नाहीं. त्यानंतर माझा डोळा केव्हां लागला तेंच मला कळलं नाहीं.

एकदम कानीं शब्द आले, " नवे गोसाई."

डोळे उघडून पाहिलं तो ती माझ्या आंगावर हात ठेवून मला हांक मारीत होती. ती म्हणाली, " उठा, तुमचं सांईथिया स्टेशन आलं."

घाईघाईनं मी उठून बसलों. शेजारच्या डब्यांत किसन होता त्याला बोलावून आणून बॅग खालीं उतरून घेतली. बिछाना बांधायला गेलों तेव्हां दिसून आलं, कीं तिला अंथरायला जें कांहीं दिलं होतं तें तिनं यापूर्वीच घडी घालून बायकाच्या एका बाजूला ठेवून दिलं होतं. मी म्हटलं, " हेंसुद्धां परत केलंस ? परत घेणार नाहींस ?"

" किती वेळ चढउतर करायची आहे—हा बोजा घेणार कोण ?"

" दुसरं वस्त्रसुद्धां बरोबर आणलं नाहींस ! तो देखिल बोजाच का ? एकाद-दुसरं वस्त्र देऊं का काढून ?"

" जशी तुमची मर्जी. पण भिकाऱ्याच्या अंगावर तुमचीं वस्त्रं शोभतील कशीं ?"

मी म्हटलं, " वस्त्रं शोभणार नाहींत कदाचित्—पण भिकाऱ्याला खायला हवं ना ? पोचायला अजून एक दोन दिवस लागतील. काय खाणार आहेस इथं गाडींत ? थोडं फराळाचं आहे बरोबर-तेंसुद्धां फेकून देऊं का ?—तूं शिवणार नाहींस त्याला ?"

यावेळीं कमललता हंसून म्हणाली, " रागावलांत वाटतं ! अहो शिवेन बरं शिवेन !—ठेवा तें तिथं—तुम्हीं गेलांत कीं एकदां पोटभर गिळून घेईन."

गाडी सुटायची वेळ झाली होती. मी उतरतांना ती म्हणाली, " जरा थांबा ना गोसाई, इथं कुणी नाहीं—तोंपर्यंत एक चोरटा नमस्कार करून घेते." असं म्हणून खालीं वांकून माझ्या पायाला हात लावून तिनं प्रणाम केला.

मी प्लॅटफॉर्मवर उतरलों. रात्र अजून संपली नव्हती. खालच्या आणि वरच्या अंधकाराच्या थरांत भागाभागी सुरू झाली होती. आकाशाच्या एका भागांत कृष्ण त्रयोदशीचा क्षीण चंद्र दिसत होता, तर दुसऱ्या भागाला उषा उमवत होती.

त्या दिवसाची आठवण झाली—अगदीं याच वेळेला देवपूजेसाठीं फुलं काढायला तिला सोबत म्हणून गेलों होतों. आणि आज ?

गाडीची शिटी झाली. हिरवा दिवा हालवीत गार्डसाहेबानं गाडी सुरू व्हायची खूण केली. खिडकी बाहेर हात काढून कमललतेनं या पहिल्याच खेपेला माझा हात धरला. तिच्या काकुळतवाण्या आवाजाचं वर्णन कसं करूं ? ती म्हणाली " आजवर तुमच्याकडून मागणं मागितलं नाहीं,—आज माझं एक ऐकाल ? "

" ऐकेन ! " असं म्हणून मी पहात राहिलों—

बोलायला तिला क्षणभर वेळ लागला. त्यानंतर ती म्हणाली, " माझ्याबद्दल तुम्हांला किती लोभ वाटतो तें मी जाणतें. आज श्रद्धा ठेवून तुम्हीं मला देवाच्या पायावर घालून निश्चिंत व्हा—निर्भय व्हा. माझी काळजी करीत यापुढं मनाला लावून घेऊं नका गोसाई, एवढीच प्रार्थना आहे. "

गाडी चालू झाली. तिचा हात तसाच हातीं घेऊन मी कांहीं पावलं चालत म्हणालों, " तुला आतां त्यालाच देऊन टाकलीय कमललता. तोच तुझा भार वाहील. तुझा मार्ग,—तुझी साधना, सुखानं चालू राहो. आपलेपणा दाखवून मी यापुढं तुला लाजवणार नाहीं. "

मी हात सोडून दिला. गाडी पुढंपुढं जाऊं लागली. तिनं मान खालीं घातली होती. स्टेशनवरच्या एका दिव्याचा प्रकाश एकएकदां खिडकींतून तिच्या चेहऱ्यावर पडत होता.

पुन्हां जिकडे तिकडे अंधार झाला.

हात वर उचलून तिनं शेवटचा नमस्कार केला असावा असं मला वाटलं.

समाप्त

जप्तीनंतर पुनः नवीन स्वरूपांत—

*आदर्श राजकीय कादंबरी*

डॉ. शरच्चंद्र चतर्जीकृत

# भारती

पृष्ठें ४२५ : किं. ६ रु.

अनुवादक—श्री. पु. बा. कुळकर्णी

पुणें येथें 'मराठी राजकीय कादंबरी' वर मोठी सडेतोड चर्चा झाली, तिच्या कसोटीला 'भारती' उतरली—

त्या चर्चेंत ठरलें:—"बंगालीवरून अनुवादित झालेली डॉ. शरचंद्र चट्टोपाध्याय यांची 'भारती' ही उत्कृष्ट राजकीय कादंबरी सर्व दृष्टींनीं आदर्श आहे—

भारतींत खरेंखरें जातिवंत राजकीय वातावरण आहे, हींत देशभक्तीची कळकळ नि निष्ठा आहे. 'भारती' म्हणजे स्वातंत्र्यासाठीं प्राणाहुति देण्यास सिद्ध झालेल्या वीराचा आत्मयज्ञ !"

**नवभारत प्रकाशनसंस्था, गिरगांव, मुंबई ४**